—॥ श्रीवीतरागाय नमः ॥—



नेमिचंद्र सिद्धान्तचक्रवर्तिविरचित

# श्रीगोम्मटसारः

मराठी भाषानुवादसहितं.

GOMMO




अनुवादक व प्रकाशक,

नेमचंद वालचंद गांधी वकील

धाराशिव.


-==*==-


मुद्रक,

वर्धमान पार्श्वनाथ शास्त्री

श्रीकल्याण पॉवर प्रिंटिंग प्रेस, सोलापूर.

प्रथमावृत्ति १००० | वीर संवत् २४६५. सन १९३९. | मूल्य रु० ५



या ग्रंथाचे अनुवादक व प्रकाशक;

श्री. नेमचंद वालचंद गांधी धाराशिवकर.

# मी काय केलें ?

जैनागमांत कर्मसिद्धांताचें वर्णन जितकें सविस्तर, विशद व सूक्ष्मपणें केलें आहे तितकें जगांतील कोणत्याही ग्रंथांत केलेलें आढळत नाहीं. अनंत जीव संसारांत परिभ्रमण करितात पण ते कां परिभ्रमण करितात? कोणी सुखी, कोणी दुःखी, कोणी श्रीमंत, कोणी दरिद्री, कोणी मनुष्यजन्माला जातो, कोणी देवगतींत जातो कोणी नारकी होतो, कोणी तिर्यंच योनींत जन्म घेतो अशी ही विषमावस्था कां होते, हें एकाही दार्शनिकाला नीट सांगता आलें नाहीं. बहुतेक दार्शनिक प्राण्यांच्या या विषमावस्थेला एक ईश्वर कारण आहे असें मानतात. ईश्वराच्या आज्ञेशिवाय झाडाचें पान सुद्धां हालत नाहीं असें म्हणणारेच फार. ईश्वराच्या कर्तृत्ववादाचें खंडन पुष्कळ ग्रंथांतून होऊन गेलें आहे. पुनः या ठिकाणीं त्याचा उहापोह करणें अप्रस्तुत होईल. ३६३ प्रकारचे एकांतवाद तसेंच पौरुषवाद, दैववाद, संयोगवाद, लोकवाद आणि हें करणारांनाही या कर्मसिद्धांताचा उलगडा झाला नाहीं. ( गोम्मटसार कर्मकांड गाथा ८७६ ते ८९५ पहा. )

गोम्मटसार या ग्रंथांत कर्म कशास म्हणावें ? कर्मबंध कसा होतो ? त्याचा उदय व निर्जरा कशी आणि केव्हां होते ? व कर्म किती प्रकारचें असतें ? आणि त्याचें अस्तित्व कोठपर्यंत राहतें ? याचें सविस्तर वर्णन केलें गेलें आहे. प्रातःस्मरणीय श्रीनेमिचन्द्र सिद्धांत चक्रवर्तींनीं हा मूल ग्रंथ प्राकृतभाषेंत ( गाथा ९७२ मध्यें ) इसवीसनाच्या आठव्या शतकांत लिहिला व त्याचवेळीं वीरमार्तंड चामुंडराय यांनीं त्यावर कर्नाटक भाषेंत टीका लिहिली. त्या कर्नाटक टीकेवरून श्रीकेशववर्णी व अभयचन्द्र सिद्धांतचक्रवर्ति यांनीं संस्कृत टीका लिहिली. या संस्कृत टीकेचें भाषांतर विद्वन्मुकुटमणि टोडरमलजींनीं हिंदी भाषेंत केलें आहे. मूल ग्रंथ, संस्कृत टीका व हिंदी टीका भारतीय जैनसिद्धांत प्रकाशिनी संस्था कलकत्ता येथें छापून प्रसिद्ध झाली आहे, त्या संस्कृत व हिंदी टीकेवरून हा मराठी ग्रंथ मी लिहिला आहे. वस्तुतः हा ग्रंथ लिहिण्याची माझी योग्यता नाहीं परंतु हा ग्रंथ आपण कोणाकडून तरी समजाऊन घ्यावा असें मला फार दिवसांपासून वाटत होतें. अनायासें श्री. ब्रह्मचारी शीतलप्रसादजी धाराशिवला आले असतांना ता. २० जुलै सन् १९२९ ला हा ग्रंथ त्यांजपाशीं पहाण्यास मी आरंभ केला. श्री. ब्रह्मचारी शीतलप्रसादजी कांहीं दिवस तेथें रहात व बाहेरगांवीं निघून जाऊन पुनः ते धाराशिवला आले म्हणजे पुनः त्या ग्रंथाचें वाचन सुरू होई. याप्रमाणें कित्येक वेळां ते धाराशिवला आले व त्यांच्या सहवासांत तो ग्रंथ मी ता. २२ फेब्रुवारी

१९३७ ला वाचून संपविला. वाचनाबरोबरच मी मराठी लिहून काढीत असें. याप्रमाणें हा ग्रंथ लिहिण्यास सुमारें ७॥ वर्षें लागलीं. ब्रह्मचारीजींच्या चिकाटीमुळेंच हें काम माझ्या हातून पार पडलें आहे. ग्रंथ फार कठिण आहे. मला तो सर्व समजला असें नाहीं पण ब्रह्मचारीजी हिंदी भाषेंत सांगत व तदनुसार मी मराठींत लिहून काढीत असें. या कृतींत जें कांहीं चांगलें असेल त्याचें सर्व श्रेय श्री. ब्रह्मचारी शीतलप्रसादजींना आहे.

गोम्मटसार ग्रंथावर संस्कृत, हिंदी, इंग्रजी भाषेंत सविस्तर टीका प्रसिद्ध झाल्या आहेत. रायचन्द्र जैन शास्त्रमालेंतून मूल गाथा व संक्षिप्त टीका प्रसिद्ध झाली आहे परंतु मराठी भाषेंत आजपर्यंत या ग्रंथावर सविस्तर किंवा संक्षिप्त टीका मुळींच कोणी केली नाहीं.

एक विषय एके ठिकाणींच पहावयास मिळावा म्हणून कांहीं गाथांचें सार एकदमच द्यावें लागलें आहे. त्याचप्रमाणें कांहीं गाथांचें मिळून एकच कोष्टक करावें लागलें आहे आणि या अडचणीमुळेंच मूळ गाथा वेगळ्याच छापून काढाव्या लागल्या. कोष्टक तयार केल्यामुळें वाचकांस व विद्यार्थ्यांस विषयाचें आकलन सौकर्यानें होऊं शकेल.

पारिभाषिक शद्बांचा संक्षिप्त कोशही दिला आहे व कांहीं शद्बांचे अर्थ कोणत्या गाथांत पहावयास सांपडतील हें कळण्याकरितां त्या शद्बापुढें गाथांचे आंकडेही घातले आहेत. ग्रंथविस्ताराच्या भयानें सर्व शब्दांचे सविस्तर अर्थ दिले नाहींत. शब्दकोशांत सर्वच शब्द आले आहेत असें नाहीं. या शब्दकोशांत गाथांचा निर्देश केल्यामुळें तो विषय कोणत्या गाथेंत सांपडेल हें सहज कळूं शकेल, व एक प्रकारें हा कोश अनुक्रमणिकेचेंही काम देऊं शकेल.

याच गोमटसार कर्मकांड विषयावर श्री अमितगति आचार्यांनी पंचसंग्रह नामक संस्कृत कविताबद्ध ग्रंथ लिहिला आहे त्यावर पं. वंशीधरजी ( सोलापूर ) यांजकडून मीं हिंदी टीका करविली आहे व तीही छापून प्रसिद्ध होऊन चुकली आहे.

या ग्रंथाचा विषय इतका कठिण आहे की विद्वच्छ्रेष्ठ टोडरमलजी यांनीं सुद्धां कित्येक ठिकाणीं "हा विषय दुर्गम आहे विद्वानांनीं विचार करावा" या अर्थाची सूचना दिली आहे. या अशा दुर्गम ग्रंथाची मराठी टीका माझ्यासारख्या अल्पज्ञाकडून लिहिण्यांत चुका होणें संभवनीय आहे. ज्या चुका दिसून येतील त्या विद्वान् वाचकांनीं सुधारून मला मित्रभावानें कळविल्यास मी त्यांचा आभारी होईन.

परमकारुणिक टोडरमलजी यांनीं या ग्रंथावर हिंदी टीका लिहून जैनजनतेवर जे अनंत उपकार करून ठेवले आहेत त्यांचा विसर पडणें केव्हांही शक्य नाहीं. त्या महापंडितांनीं जर हिंदी टीका करून ठेवण्याचा उपकार केला नसता तर या कालांत बहुतेक तो ग्रंथ दुर्बोधच राहिला असता.

ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याची पद्धति आहे व त्या प्रस्तावनेंत ग्रंथकाराचा शक्य तितका इतिहास वगैरे दिला जातो. रायचंद्र जैनशास्त्र मालेंतून सटीक बृहद्द्रव्यसंग्रह ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे त्यांत प्रस्तावनेमध्यें जवाहरलाल शास्त्री यांनीं ग्रंथकार श्री. पू. नेमिचंद्र सिद्धांत चक्रवर्ति यांचा शक्य तो परिचय करून दिला आहे त्याचप्रमाणें गोम्मटसार ग्रंथावर पंडित मनोहरलालजी यांनीं जी संक्षिप्त टीका लिहून त्याच मालेंतून प्रसिद्ध केली आहे त्या गोम्मटसार ग्रंथांतही त्यांनीं ग्रंथकारांचा थोडा परिचय करून दिला आहे. याकरितां या ग्रंथास वेगळी प्रस्तावना लिहिण्याची आवश्यकता वाटली नाहीं.

या ग्रंथाची प्रेसकॉपी करण्यांत श्रीयुत डॉ. जीवंधर यांचें मला फार सहाय मिळालें आहे यामुळें मी त्यांचा आभारी आहे. त्याचप्रमाणें श्रीयुत जिनदास शास्त्री यांनीं सर्व ग्रंथ आरंभापासून तपासून पाहून प्रूफ संशोधनाचें कामही त्यांनीच केलें असल्यामुळें त्यांचा व श्रीवर्धमानजी शास्त्री यांनीं आपल्या छापखान्यांत हा ग्रंथ छापून दिल्यामुळें त्यांचाही मी आभारी आहे.

छपाईंत विरामचिन्हाच्या व शब्दांची पदें तोडण्याच्या बऱ्याच चुका राहून गेल्या आहेत. आवश्यकते पुरतें शुद्धिपत्र दिलें आहे.

नेमचंद वालचंद गांधी, धाराशिवकर.

# गोम्मटसारसूचिपत्र.

**सत्त्वप्रकरण.**



**मार्गणांत असत्त्व सत्त्व व व्युच्छित्ति.**

## ३ सत्त्वस्थान भंगाधिकार [ तृतीय ] ३५८.ते.३९७

## ४ त्रिचूलिका नामक चतुर्थाधिकार. ३९८ते४५०



# सिद्धान्तचक्रवर्ति श्रीनेमिचन्द्राचार्यकृत
# गोम्मटसार कर्मकाण्ड (मराठी)

## [ १ ] प्रकृति–समुत्कीर्तनाधिकार.

**गाथा १**–नेमिनाथ तीर्थंकरांना नमस्कार करून मूळ व उत्तर प्रकृतींचें ( ज्ञानावरणादि प्रकृतींचें ) समुत्कीर्तन म्हणजे व्याख्यान ज्यांत आहे • अशा प्रकृतिसमुत्कीर्तन ग्रंथाला मी सांगेन. नेमितीर्थंकर हे ज्ञानादि गुणरूपी रत्नांनीं विभूषित असून महावीर [ असहाय पराक्रमी ] आहेत व क्षायिकसम्यक्त्वी आहेत.

**गाथा २**–प्रकृति म्हणजे वस्तूचा सहज स्वभाव यास शीलही म्हणतात. रागादिरूप परिणमणें हा जीवाचा स्वभाव व रागादि उत्पन्न करणें हा कर्माचा स्वभाव आहे. जीव व कर्माचा अनादि संबंध कनकपाषाणवत् स्वयं सिद्ध आहे.

**गाथा ३**–औदारिकादि पांच शरीरांपैकीं कार्मणशरीर नामकर्माच्या उदयानें योगासहित जीव ज्ञानावरणादि आठ कर्मांचें ग्रहण करितो. बाकीच्या चार शरीरनामकर्मांच्या उदयानें नोकर्मांचें ग्रहण करितो. तप्त लोहपिंड ज्याप्रमाणें चोहींकडून जलग्रहण करितो त्याप्रमाणें आत्मा शरीर–नामकर्मांच्या उदयानें समयासमयास कर्म व नोकर्म यांचें ग्रहण करितो.

**गाथा ४**–सिद्धराशीच्या अनंताव्या भागा इतका व अभव्यराशीच्या अनंतपट परमाणुसमूहाचा ( समयप्रबद्धाचा ) बंध समयासमयाला होतो त्याला समयप्रबद्ध म्हणतात. योगामुळें विसदृश बंध होतो–कधीं अधिक व कधीं कमी परमाणूंचा बंध होतो.

**गाथा ५**–समयासमयाला एकेका समयप्रबद्धाची निर्जरा होते म्हणजे तो उदयरूप होतो किंवा सातिशय क्रियेनें युक्त जो आत्मा त्याला सम्यक्त्वादिकांचा योग झाला असतां एका समयांत अनेक समयप्रबद्धांची निर्जरा होते. गुणस्थानाधिकारांत निर्जरेचीं अकरा स्थानें सांगितलीं आहेत तदनुसार ही निर्जरा होते• व द्वीडगुणहानीच्या प्रमाणानें समयप्रबद्धाला गुणून जें प्रमाण येईल तितके परमाणु सत्तेंत राहतात. ज्यास्त परमाणु सत्तेंत कसे राहतात ह्या शंकेचें समाधान योगमार्गणेंत [ जीवकाण्डामध्यें ] केलें आहे व पुढें ही कथन येणार आहे. [ गाथा २६० कोष्टक ५८ व गाथा ९४४ हीं पहावींत ]

**गाथा ६**–कर्मांचे दोन भेद आहेत. एक द्रव्यकर्म व दुसरा भावकर्म, ज्ञानावरणादिरूप पुद्गलपिंडास द्रव्यकर्म म्हणतात व त्या पिंडांत जी फलदानशक्ति असते तें भावकर्म होय. कार्यांत कारणाचा उपचार केल्यास अज्ञानादिक व क्रोधादिक यांनाही भावकर्म म्हणतात.

**गाथा ७**–सामान्य कर्माचे प्रकार ८ किंवा १४८ आहेत व असंख्यात लोक प्रमाण प्रकारही आहेत. घाति व अघाति अशी वेगवेगळी त्यांची संज्ञा आहे.

**गाथा ८–९**–ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अंतराय हीं चार घातिकर्मे होत. कारण हीं जीवाच्या गुणांचा घात करतात व आयु, नाम, गोत्र व वेदनीय हीं चार कर्मे जीवाच्या गुणांचा घात करीत नाहींत म्हणून तीं अघातिकर्मे होत. या प्रमाणें कर्माच्या ह्या आठ मूलप्रकृति आहेत. त्यांचा क्रम असा. १ ज्ञानावरण, २ दर्शनावरण, ३ वेदनीय, ४ मोहनीय, ५ आयु, ६ नाम, ७ गोत्र, ८ अंतराय.

**गाथा १०**–केवलज्ञान, केवलदर्शन, अनंतवीर्य, क्षायिकसम्यक्त्व, क्षायिकचारित्र, क्षायिकदानादिक पांच, हे जीवाचे क्षायिकभाव व मति, श्रुत, अवधि, मनःपर्ययज्ञानादिक हे क्षायोपशमिक भाव हे सर्व जीवाचे गुण होत. या गुणांचा घात ज्ञानावरणादि कर्मे करितात ह्मणून त्यांना घातिकर्मे ह्मणतात.

**गाथा ११**–अनादिकर्मकृतसंसारांत चारहि गतींमध्यें जीवाचें अवस्थान ज्यामुळें होतें तें आयुःकर्म होय. ज्याप्रमाणें लाकडाचा खोडा पायाला अडकवून ठेवतो त्याप्रमाणें आयुःकर्म जीवाला शरीरांत अडकवून ठेवतें.

**गाथा १२**–गत्यादिक अनेक प्रकारच्या नामकर्मामुळें नारकादि जीवपर्यायाचे भेद, औदारिकादि शरीर भेद वा एका गतींतून दुसऱ्या गतींत जाणें हीं कार्ये होतात म्हणून तें नामकर्म जीवविपाकी, पुद्गलविपाकी, क्षेत्रविपाकी व भवविपाकी असतें असें समजावें.

**गाथा १३**–अनुक्रम परिपाटीपासून चालत आलेलें जें आचरण त्यास **गोत्र** ह्मणतात. जेथें उत्कृष्ट आचरण असतें तेथें **उच्चगोत्र** व नीच आचरण असेल तेथें **नीचगोत्र** समजावें.

**गाथा १४**–इंद्रियांनीं आपापल्या विषयाला जाणणें अथवा अनुभवणें तें वेदनीय होय. सुखस्वरूप साता व दुःखस्वरूप असाता वेदनीय समजावें, त्या सुख-दुःखाला जें अनुभववितें तें **वेदनीय** कर्म.

**गाथा १५**–संसारी जीव अगोदर पदार्थाला पाहतो आणि नंतर त्या पदार्थाला तो जाणतो व अस्तिनास्ति इत्यादि सप्तभंगांनीं निश्चय करून नंतर श्रद्धान करतो. या प्रमाणें पाहणें तें **दर्शन**, जाणणें तें **ज्ञान** व श्रद्धान करणें तें **सम्यक्त्व** हे जीवाचे गुण आहेत.

**गाथा १६**—आत्म्याच्या सर्व गुणांत ज्ञान हें पूज्य आहे ह्मणून तें प्रथम सांगितलें आहे, त्यानंतर दर्शन व नंतर सम्यक्त्व सांगितलें आहे. वीर्य आहे ते ज्ञानादिकांच्या शक्तिरूपानें जीवांत आढळून येतें व शरीरादिकांच्या शक्तिरूपानें पुद्गलांत दिसून येतें ह्मणून तें वीर्य शेवटीं सांगितलें आहे. यामुळें ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अंतराय असा चार घातिकर्मांचा क्रम जाणावा.

**गाथा १७**—अंतरायकर्म घाति आहे तथापि तें अघातिप्रमाणें आहे. जीवाच्या सर्व गुणाचा घात करण्याचें त्यांत सामर्थ्य नाहीं. नाम, गोत्र व वेदनीय या तीन कर्मांच्या निमित्तानें हें अंतराय कर्म आहे ह्मणून तें अघाति कर्मानंतर शेवटीं सांगितलें आहे.

**गाथा १८**—आयु नामक कर्मबलामुळें चतुर्गतिरूप भवांत अवस्थिति होते. हा चतुर्गतिरूप भव नामकर्मामुळें होतो, व चतुर्गतिरूप भवाच्या आश्रयानें नीचपणा व उच्चपणा प्राप्त होतो म्हणून अगोदर आयु व नामकर्म सांगून मग गोत्रकर्म सांगितलें.

**गाथा १९**—वेदनीयकर्म घातिकर्माप्रमाणें रति, अरति कर्मांच्या ( मोहनीयाचे भेद ) उदयाच्या बलानें जीवाचा घात करितें, सुखःदुख स्वरूप साता असाताला कारण असे जे इंद्रियविषय त्यांचा अनुभव करवून धात करितें म्हणून घातिकर्मामध्यें मोहनीय कर्मांच्या अगोदर वेदनीय कर्म सांगितलें आहे.

**गाथा २०**—आतां ज्ञानावरणादि शब्दांची निरुक्ति सांगतात.

१ ज्ञानं आवृणोति इति ज्ञानावरणीयं म्हणजे ज्ञानाला आच्छादन करतें तें. जसें—देवतेच्या मुखावर वस्त्र झाकणें.

१ दर्शनं आवृणोति इति दर्शनावरणीयं दर्शनाला आच्छादन करतें तें. जसें—राजदर्शनाला द्वारपाल प्रतिबंध करितो.

१ वेदयति इति वेदनीयं म्हणजे सुखःदुखाचा अनुभव करवितें तें. जसें—मधानें माखलेली तरवारीची धार.

१ मोहयति इति मोहनीयं म्हणजे जें असावध करितें तें. जसें—मद्य, धोतरा इत्यादि.

१ भवधारणाय एति गच्छति इति आयुः ह्मणजे जन्म धारण करवितें तें. जसें—खोड्यांत पाय अडकविला जातो तसें.

१ नाना मिनोति इति नाम म्हणजे नाना प्रकारचें कार्य निष्पादन करतें तें. नरनारकादि अनेक रूप धारण करवितें, जसें—चित्राकार.

१ गमयति इति गोत्रं म्हणजे उच्च नीचत्वाला प्राप्त करवितें तें जसें-कुंभार लहान मोठीं गाडगीं तयार करतो.

१ अंतरं एति इति अंतरायं ह्मणजे दात्यांत व पात्रांत अंतर पाडितें तें. जसें—खजिनदार ( भांडागारिक )

**गाथा २१**–कर्माच्या स्वभावाचीं उदाहरणें—

१ ज्ञानावरण–देवतांच्या मुखांवर वस्त्र, २ दर्शनावरण–राजद्वारांतील द्वारपाळ, ३ वेदनीय–मधुलिप्त असिधारा, ४ मोह–मदिरा, ५ आयु–खोडा, ६ नाम–चितारी, ७ गोत्र–कुंभार, ८ अंतराय–भांडागारिक.

**गाथा २२**–ज्ञानावरणाच्या उत्तरप्रकृति ५, दर्शनावरणाच्या ९ वेदनीयाच्या २, मोहनीयाच्या २८, आयुच्या ४, नामकर्माच्या ९३, गोत्रकर्माच्या २, अंतरायाच्या ५ मिळून १४८ उत्तर प्रकृति आहेत.

**गाथा २३**–१ 'स्त्यानगृद्धि' चा उदय ज्याला झाला आहे त्याला उठविलें असतांही तो झोपतो व झोपेंत अनेक कामें करितो व बोलतो. '२ निद्रानिद्रा' कर्माच्या उदयामुळें तो पुष्कळ प्रकारें सावधानी ठेवूं इच्छितो परंतु त्याचे डोळे उघडत नाहींत.

**गाथा २४**–३ 'प्रचलाप्रचला' कर्माच्या उदयानें तोंडांतून लाळ गळते, व हातपाय हलतात, ४ 'निद्रेच्या' उदयानें चालतां चालतां उभा राहतो, खालीं बसतो व पडतो.

**गाथा २५**–५, 'प्रचलेच्या' उदयानें जीव किंचित् डोळे उघडे ठेवून निजतो, निजला असतांही कांहीं कांहीं जाणतो, वारंवार जागतो व निजतो असें करतो.

वेदनीय कर्माचे दोन प्रकार—१ सात २ असात.

रतिमोहनीयकर्माच्या उदयाच्या बलानें जीवाला सुखोत्पादक इंद्रिय–विषयांचा जें अनुभव करवितें तें **सातवेदनीय** व अरतिमोहनीयकर्माच्या उदयाच्या बलानें जीवाला दुःखोत्पादक इंद्रियविषयांचा जें अनुभव करवितें तें **असातवेदनीय**.

मोहनीयाचे प्रकार २—१ दर्शनमोहनीय २ चारित्रमोहनीय

बंधाच्या अपेक्षेनें मिथ्यात्व हा एकच प्रकार दर्शनमोहनीयाचा होतो व उदय आणि सत्व यांच्या अपेक्षेनें १ मिथ्यात्व २ सम्यङ्मिथ्यात्व ३ सम्यक्त्वप्रकृति असे तीन प्रकार दर्शनमोहनीयाचे होतात.

**गाथा २६**–यंत्रानें कोद्रू दळले म्हणजे कोंडा, तांदूळ व कणी निघते त्याप्रमाणें प्रथमोपशमसम्यक्त्वरूप भावयंत्रानें एका मिथ्यात्व कर्माचे परमाणु मिथ्यात्व, सम्यङ्मिथ्यात्व व सम्यक्त्वप्रकृतिरूप होतात.

आयुःकर्माला सोडून सात कर्मप्रकृतींच्या परमाणूंचें प्रमाण–समयप्रबद्ध संख्येला दीड गुणहानीनें गुणून जी संख्या येते ती सात कर्मांच्या परमाणूंची संख्या जाणावी.

समयप्रबद्धाची संख्या ६३०० गृहीत धरली.

गुणहानीची संख्या ८ ,, ,,

म्हणजे ६३००×१२ (दीड गुणहानि)=७५६०० सात कर्मांचें परमाणु होतील.

सात कर्मांचे परमाणु ७५६०० तर १ मोहनीय कर्माचें १०८०० इतके परमाणु होतील. आतां या मोहनीयकर्म परमाणूंची वांटणी २५ चारित्रमोहनीय व १ दर्शनमोहनीय मिळून २६ कर्मांत कशी होईल तें दाखवितात:—

२६ प्रकृतींपैकीं १६ कषाय व १ मिथ्यात्व मिळून १७ प्रकृति सर्वघाति आणि बाकीच्या ९ प्रकृति देशघाति आहेत.

मोहनीयकर्माच्या परमाणूंना अनंताचा भाग देऊन जो भागाकार येईल ती संख्या सर्वघातींची आणि बाकीची संख्या देशघातींची समजावी म्हणजे मोहनीयकर्मपरमाणूंची संख्या १०८०० कल्पिली व अनंताची संख्या ८ कल्पिली. त्या अनंताच्या ८ संख्येनें १०८०० स भागल्यास १३५० भागाकार येईल. ही संख्या १७ सर्वघातींची.

या संख्येस १७नीं भागल्यास जो भागाकार येईल तो प्रत्येक सर्वघातीचा समजावा.

१०८०० यांतून १३५० ( सर्वघातींची संख्या ) उणी केली म्हणजे ९४५० इतके परमाणु देशघातींचे राहिले.

१३५० ÷ १७=७९$\frac{७}{१७}$ इतके परमाणु मिथ्यात्वाच्या वांट्यास येतील. ७९$\frac{७}{१७}$ च्या असंख्याताव्या भागा इतके सम्यङ्मिथ्यात्वाचे परमाणु समजावे व सम्यङ्मिथ्यात्वाच्या असंख्याताव्या भागा इतके परमाणु सम्यक्त्वप्रकृतीचे व बाकीचे सर्व परमाणु मिथ्यात्वाचे समजावेत.

चारित्रमोहनीयाचे २ प्रकार—कषायवेदनीय व नोकषायवेदनीय. कषायवेदनीयाचे प्रकार १६. क्षयाच्या अपेक्षेनें त्या १६ कषायांचा अनुक्रम— अनंतानुबंधी क्रोध, मान, माया, लोभ. अप्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ. प्रत्याख्यान क्रोध, मान, माया, लोभ. संज्वलन क्रोध मान, माया, लोभ.

प्रदेशबंधांत परमाणूंची वाटणी होते त्या अपेक्षेनें १६ कषायांचा अनुक्रम खालील प्रमाणें होतो.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अनंतानुबंधी | लोभ, | माया, | क्रोध, | मान |
| संज्वलन | ,, | ,, | ,, | ,, |
| प्रत्याख्यान | ,, | ,, | ,, | ,, |
| अप्रत्याख्यान | ,, | ,, | ,, | ,, |

नोकषायवेदनीयाचे प्रकार ९— ३ वेद १ रति १ अरति १ हास्य १ शोक १ भय १ जुगुप्सा.

आयु: कर्माचे प्रकार ४—नारक, तिर्यंच, मनुष्य, देव.

पिंड अपिंडाच्या भेदानें नामकर्माचे ४२ प्रकार आहेत.

१ गति २ जाति ३ शरीर ४ बंधन ५ संघात ६ संस्थान ७ अंगोपांग ८ संहनन ९ वर्ण १० गंध ११ रस १२ स्पर्श १३ आनुपूर्व्य १४ अगुरुलघु १५

उपघात १६ परघात १७ उच्छ्वास १८ आतप १९ उद्योत २० विहायोगति २१ त्रस २२ स्थावर २३ बादर २४ सूक्ष्म २५ पर्याप्त २६ अपर्याप्त २७ प्रत्येकशरीर २८ साधारण शरीर २९ स्थिर ३० अस्थिर ३१ शुभ ३२ अशुभ ३३ सुभग ३४ दुर्भग ३५ सुस्वर ३६ दुस्वर ३७ आदेय ३८ अनादेय ३९ यशःकीर्ति ४० अयशःकीर्ति ४१ निर्माण ४२ तीर्थंकर.

यात पिण्डप्रकृति १४ आहेत.

१ गति (४) २ जाति (५) ३ शरीर (५) ४ बंधन (५) ५ संघात (५) ६ संस्थान (६) ७ अंगोपांग (३) ८ संहनन (६) ९ वर्ण (५) १० गंध (२) ११ रस (५) १२ स्पर्श (८) १३ आनुपूर्व्य (४) १४ विहायोगति (२) एकूण १४ पिण्डप्रकृतींची उत्तर संख्या ६५ होते व अपिण्डप्रकृति २८ ( ४२–१४=२८ ) मिळून ६५+२८=९३ नामकर्माच्या प्रकृति.

**गाथा** २७–औदारिक, वैक्रियिक, आहारक या तिहींत तैजस व कार्मण यांचा संयोग केल्यास चार चार भंग होतात.

१ औदा. औदा. २ औदा. तै. ३ औदा. का. ४ औदा. तै. का. =४
१ वैक्रि. वैक्रि. २ वैक्रि. तै. ३ वैक्रि. का. ४ वैक्रि. तै. कार्मण. =४
१ आ. आ. २ आ. तै. ३ आ. का. ४ आ. तै. का. =४

तैजस कार्मणाच्या संयोगानें दोन [ भेद ] भंग होतात.

१ तैजस तैजस, २ तैजस कार्मण. =२

कार्मण कार्मणाच्या संयोगानें एक भंग होतो.

१ कार्मण कार्मण. =१

असे सर्व मिळून १५ भेद होतात. १५

वर औदारिकादि शरीरें सांगितलीं होतीं त्यांत औदारिक-औदारिक, वैक्रि.-वैक्रि, आहा.-आहा., तैजस-तैजस, कार्मण-कार्मण, हे पांच भेद गर्भित होतात. ह्मणून १५–५=१० राहिले. ते नामकर्माच्या ९३ प्रकृतींत मिळविले ह्मणजे नामकर्माच्या प्रकृति १०३ होतात. बंधननामकर्माचे पांच प्रकार [ १ औदारिक शरीर बंधन, २ वैक्रि. श. बं, ३ आहारक श. बं, ४ तैजस श. बं, ५ कार्मण श. बं. ]

संघात नामकर्माचे ५ प्रकार—औदारिकादि ५ शरीरसंघात.

संस्थान ६ प्रकार—१ समचतुरस्र, २ न्यग्रोध, ३ कुब्ज, ४ स्वाति, ५ वामन, ६ हुंड संस्थान.

अंगोपांग ३ प्रकार—१ औदारिकशरीर अंगो० २ वैक्रियिकशरीर अंगो० ३ आहारक श. अंगो०, तैजस व कार्मणशरीराला अंगोपांगें नसतात.

नोट:—चक्रवर्ती आपल्या एका औदारिक शरीरापासून ९६००० शरीरें बनविते तीं औदारिक औदारिक शरीरें होत.

१५ प्रकारच्या शरीरांचे दृष्टांत आग्रानिवासी पांडे हेमराजजी यांनीं प्रकृतिसमुत्कीर्तन अधिकाराच्या टीकेंत खालीं लिहिल्याप्रमाणें दिले आहेत.

(१) औदारिक औदारिक—चक्रवर्ती स्त्रियांचा उपभोग घेतांना आपल्या शरीरापासून अनेक औदारिक शरीरें बनवितात तीं.

(२) औदारिकतैजस—तैजस समुद्धाताच्या वेळीं मुनि जे तैजसशरीर बनवितात तें.

(३) औदारिककार्मण—मारणांतिक समुद्धाताच्या वेळीं आत्मप्रदेश कार्मण शरीरासह भाविशरीराच्या स्थानाला स्पर्श करण्यास जातात तें.

(४) औदारिकतैजसकार्मण—औदारिक शरीरांतून तैजसशरीर निघतें त्यावेळीं कार्मणशरीरही त्याबरोबर निघतें तें.

(५) वैक्रियिकवैक्रियिक—देव क्रीडादिकांकरितां एका शरीरापासून दुसरीं शरीरें करितात तीं.

(६) वैक्रियिकतैजस—देवांना क्रोध येतो त्या आवेशांत तैजसशरीर बनवितात तें.

(७) वैक्रियिककार्मण—देव नारकीयांच्या मारणांतिक समुद्धाताच्या वेळीं आत्मप्रदेश कार्मणशरीरासह भाविशरीराच्या स्थानाला स्पर्श करण्यास जातात तें.

(८) वैक्रियिकतैजसकार्मण—देवाच्या क्रोधावेशांत तैजसशरीर निघतें त्यावेळेस कार्मणही निघतें तें.

(९) आहारक आहारक—आहारक शरीराची स्थिति एक अंतर्मुहूर्ताची असते. मुनि संशयनिवृत्ति करितां एक आहारक शरीर बनवून केवलीकडे पाठवितात, एका अंतर्मुहूर्तांत केवलिदर्शन न होऊं शकल्यास त्या पहिल्या आहारक शरीरापासून दुसरें आहारक शरीर बनतें तें.

(१०) आहारकतैजस—आहारक शरीराच्या गमनमार्गांत एखाद्या मुनीला उपसर्ग झालेला पाहून त्याच्या निवारणार्थ आहारकापासून जें शुभ तैजसशरीर निघतें तें.

(११) आहारककार्मण—मुनीचें आहारक शरीर निघतें त्याबरोबर कार्मण शरीरही निघतें तें.

(१२) आहारकतैजसकार्मण—आहारक शरीरापासून तैजसशरीर निघते त्याबरोबर कार्मणशरीर ही निघतें तें.

(१३) तैजसतैजस—शत्रूंना मारण्याकरितां किंवा मित्रांना सुखी करण्याकरितां जें तैजसशरीर निघतें व शत्रु मित्रांकडे जातें तेथें शत्रु मित्र न मिळाल्यास पुनः तैजसापासून जें दुसरें तैजसशरीर होतें तें.

(१४) तैजसकार्मण—मुनि—शरीरापासून तैजसशरीर निघतें त्याबरोबर कार्मण-शरीरही निघत असतें तें.

(१५) कार्मणकार्मण—मुनिशरीरापासून आहारक व तैजसशरीर निघतें त्यावेळीं त्याबरोबर कार्मणशरीरही असतें आहारकापासून आहारक किंवा तैजसापासून तैजसशरीर बनतें त्याबरोबरच कार्मणही असतें तें.

**गाथा २८**—दोन पाय, दोन हात, नितंब, पाठ, उर, ( हृदय ) मस्तक हीं आठ अंगें आणि याशिवाय बाकी सर्व उपांगें.

संहननें ६—१ वज्रवृषभनाराच २ वज्रनाराच ३ नाराच ४ अर्धनाराच ५ कीलित ६ असंप्राप्तासृपाटिक.

**गाथा २९**—

| कोणत्या संहननाचा जीव | कोणत्या गतीस जातो. |
|---|---|
| १ सृपाटिक ६ वें संहननवाला | १ ते ८ व्या स्वर्गापर्यंत जातो. |
| १ कीलित ५ वें संहननवाला | ९ ते १२ व्या स्वर्गापर्यंत जातो. |
| १ अर्धनाराच ४ थें संहननवाला | १३ ते १६ व्या स्वर्गापर्यंत जातो. |

**गाथा ३०**—

| | |
|---|---|
| १ नाराच ३ रें संहननवाला | नवग्रैवेयकापर्यंत जातो. |
| १ वज्रनाराच २ रें संहननवाला | नवअनुदिशपर्यंत जातो. |
| १ वज्रवृषभनाराच १ लें संहननवाला | पांच अनुत्तरापर्यंत जातो. |

**गाथा ३१**—

| | | |
|---|---|---|
| सहाही संहननवाले जीव | तिसऱ्या नरकापर्यंत | जातात. |
| सृपाटिक सोडून कीलितादि ५ संहननवाले | पांचव्या नरकापर्यंत | ,, |
| अर्धनाराचादिक चार संहननवाले | सहाव्या ,, | ,, |
| वज्रवृषभ नाराच संहननवाला | सातव्या ,, | ,, |

**गाथा ३२**—कर्म भूमींतील स्त्रियांस १ सृपाटिक १ कीलित १ अर्धनाराच हीं शेवटचीं तीन संहननें होतात.

**गाथा ३३**—आताप प्रकृतीचा उदय सूर्यबिंबांत जे बादरपर्याप्त पृथ्वीकाय जीव उत्पन्न होतात त्यांना होतो. अग्नींतील जीवांना आतापाचा उदय नसतो. त्यांना स्पर्श

प्रकृतींतील उष्णतेचा उदय असतो. उष्णतारहित जी प्रभा असते तेथें उद्योताचा उदय समजावा.

आत्मप्रदेशांत कर्मरूप होण्यायोग्य कार्मणवर्गणा आत्म्याशीं एक-क्षेत्रावगाही होते त्यास बंध ह्मणतात, एका पात्रांत घातलेले नानाप्रकारचे रस, बीज, फूल, फल हीं मदिरा-भावाला प्राप्त होतात. त्याचप्रमाणें कार्मणवर्गणारूप पुद्गल योगकषायांच्या निमित्तानें कर्म-भावास प्राप्त होतात. एकवेळीं भक्षण केलेलें अन्न जसें रस रुधिर मांसादिक अनेक रूप होऊन परिणमतें तसेंच आत्म्याच्या परिणामानें ग्रहण केलेले पुद्गल ज्ञानावरणादिक अनेक भेदरूप होऊन परिणमतात.

पर्याप्ति ६ आहेत--१ आहार १ शरीर १ इंद्रिय १ श्वासोच्छ्वास १ भाषा १ मन.

हिंदीटीकेंत सर्व कर्मांचीं कार्यें व निरुक्ति लिहिली आहे. विस्तारभयास्तव येथें लिहिली नाहीं.

**गाथा ३४-३५**-नामकर्माच्या प्रकृति ९३ त्यांत खालील २६ प्रकृति बंधांत गणल्या जात नाहींत.

५ बंधन+५ संघात+१६ वर्णादिक [ २० पैकीं ४ बंधांत धरतात ह्मणून ]=२६ म्हणजे ९३-२६=६७ प्रकृतींचा बंध मानला जातो. बंध ९३ चा होतो परंतु हिशेबांत २६ धरीत नाहींत म्हणून ६७ बंधयोग्य प्रकृति मानतात. याशिवाय १ मिश्र व १ सम्य-क्त्वप्रकृति या दोन प्रकृति बंधयोग्य नाहींत.

एकंदर कर्मप्रकृति १४८ त्यांत २ प्रकृति गेल्या म्हणजे १४६ बंधयोग्य प्रकृति राहतात त्यांतून २६ प्रकृति बंधांत मानीत नाहींत. त्या कमी करून १२० प्रकृतींचा बंध मानितात.

**गाथा ३६-३७-३८**-

कर्मप्रकृति १४८ त्यांत २६ प्रकृतींचा उदय गणला जात नाहीं म्हणजे १२२ उदययोग्य मानतात तरी १४८ चा उदय असतो. २६ प्रकृति दुसऱ्या प्रकृतींत गर्भित असल्यामुळें त्या हिशेबांत धरीत नाहींत.

शरीर, बंधनें, संघात मिळून पैकीं शरीरामध्यें बंधन व संघात गर्भित धरल्यामुळें

५ + ५ + ५ = १५      ५

१० प्रकृति कमी झाल्या व वर्ण, रस, गंध, स्पर्श यांत फक्त वर्ण रस गंध स्पर्श अशा

५ + ५ + २+८ =२०      १ १ १ १

४ प्रकृति धरतात त्या वजा केल्या म्हणजे १६ बाकी राहतात. त्या व वरील मिळून प्रकृतींचा उदय गणला जात नाहीं.      १६ + १० =२६

## सर्वघाति-प्रकृति २१

**गाथा** ३९–१ केवलज्ञानावरण
६ दर्शनावरण [ १ केवलदर्शनावरण+५ निद्रा ]
१२ कषाय [ संज्वलन ४ कषाय सोडून ]
१ मिथ्यात्व
——
२० या वीस प्रकृति बंधापेक्षेनें
१ सम्यङ्मिथ्यात्व–सत्ता व उदयाच्या अपेक्षेनें
——
२१ या एकवीस प्रकृति सर्वघाति आहेत.

सम्यङ्मिथ्यात्व प्रकृतीला जात्यंतर सर्वघाति म्हणतात. कारण मिथ्यात्वादि प्रकृति-प्रमाणें ही प्रकृति पूर्णपणें घात करीत नाहीं व ही प्रकृति बंधयोग्य नाहीं.

## देशघाति-प्रकृति २६

**गाथा** ४०–४ ज्ञानावरण [ मति, श्रुत, अवधि, मनःपर्यय ]
३ दर्शनावरण [ चक्षु, अचक्षु, अवधि ]
१ सम्यक्त्वप्रकृति
४ संज्वलन कषाय
९ नोकषाय [ हास्य, रति, अरति, शोक, भय, जुगुप्सा व तीन वेद ]
५ अंतराय
——
२६

## प्रशस्त प्रकृति ६८

**गाथा** ४१–४२–१ सातवेदनीय ३ तिर्यंच, मनुष्य, देव [ आयु ] १ उच्चगोत्र २ मनुष्यगति, मनुष्यगत्यानुपूर्व्य २ देवगति-देवगत्यानुपूर्व्य १ पंचेंद्रियजाति ५ पंचशरीर ५ पंचबंधन ५ पंचसंघात ३ अंगोपांग २० शुभवर्ण, गंध, रस, स्पर्श १ समचतुरस्रसंस्थान १ वज्रवृषभनाराचसंहनन १ अगुरुलघु १ परघात १ उच्छ्वास १ आतप १ उद्योत १ प्रशस्त विहायोगति १ त्रस १ बादर १ पर्याप्त १ प्रत्येक शरीर १ स्थिर १ शुभ १ सुभग १ सुस्वर १ आदेय १ यशःकीर्ति १ निर्माण १ तीर्थंकर.

याप्रमाणें ६८ अडसष्ट प्रकृति भेदापेक्षेनें प्रशस्त पुण्यरूप आहेत. अभेदविवक्षेनें ५ बंधन ५ संघात व १६ वर्णादिक कमी केल्यास ४२ प्रकृति प्रशस्त आहेत. तत्त्वार्थांतहि ' सद्वेद्यशुभायुर्नामगोत्राणि पुण्यं ' असें सूत्र आहे.

**गाथा ४३–४४–** **अप्रशस्त प्रकृति १००**

४७ घातिकर्मांच्या सर्व प्रकृति अप्रशस्तच आहेत. १ नीच गोत्र १ असातवेददनीय १ नरकायु २ नरकगति–नरकगत्यानुपूर्व्य २ तिर्यंचगति–तिर्यंचगत्यानुपूर्व्य ४ एकेंद्रियादि चार जाति. ५ न्यग्रोधपरिमंडलादि पांच संस्थानें ५ वज्रनाराचादि पांच संहननें २० अशुभवर्ण, गंध, रस, स्पर्श. १ उपघात १ अप्रशस्तविहायोगति १ स्थावर १ सूक्ष्म १ अपर्याप्त १ साधारण १ अस्थिर १ अशुभ १ दुर्भग १ दुःस्वर १ अनादेय १ अयशस्कीर्ति.

याप्रमाणें १०० प्रकृति उदयरूप अप्रशस्त आहेत. भेदविवक्षेनें बंधरूप ९८ प्रकृति आहेत कारण ४७ घातिप्रकृति पैकीं १ सम्यक्त्व प्रकृति व १ सम्यग्मिथ्यात्व या दोन प्रकृतींचा बंध होत नाहीं–अभेद विवक्षेनें वर्णादि २० प्रकृतींतून १६ प्रकृति कमी केल्यास ८२ प्रकृति बंधरूप राहतात व उदयरूप ८४ प्रकृति आणि सत्तारूप १०० प्रकृति असतात+६८ पुण्यप्रकृति=१६८–२० पुण्य व पापरूप प्रकृति=१४८

**गाथा** ४५–अनंतानुबंधी कषाय सम्यक्त्वाचा, अप्रत्याख्यान कषाय देशचारित्राचा, प्रत्याख्यान कषाय सकलचारित्राचा, व संज्वलन कषाय यथाख्यात चारित्राचा, घात करितात.

अनंत संसाराला कारण मिथ्यात्व असतें म्हणून मिथ्यात्वाला अनंत म्हणतात. त्या मिथ्यात्वाचा बंध ज्यायोगें होतो त्यास अनंतानुबंधी कषाय म्हणतात.

अप्रत्याख्यान म्हणजे ईषत्–देशचारित्र त्याला कषन्ति म्हणजे घातितात ते अप्रत्याख्यान कषाय. प्रत्याख्यान म्हणजे सकलसंयम त्याला घातितात ते प्रत्याख्यान कषाय. सं म्हणजे सह ज्वलति म्हणजे प्रगट राहतो तो संज्वलन कषाय. हा कषाय विद्यमान असतांनाही संयम प्रकट राहतो म्हणून त्यास संज्वलन कषाय म्हणतात. याप्रमाणें कषायांचीं नांवें सार्थ आहेत. नोकषाय व ज्ञानावरणादिकही सार्थक नामधारकच आहेत.

## १६ कषायांचा वासनाकाल.

**गाथा** ४६–' उदयाभावेऽपि तत्संस्कारकालो वासनाकालः ' म्हणजे कषायांचा उदय नसतांही जो पर्यंत त्यांचा संस्कार कायम असतो त्यास वासनाकाल म्हणतात.

| | |
|---|---|
| संज्वलनाचा वासनाकाल | अन्तर्मुहूर्त |
| प्रत्याख्यानाचा ,, | १५ दिवसकाल [ पक्ष ] |
| अप्रत्याख्यानाचा ,, | ६ महिने |
| अनंतानुबंधीचा ,, | संख्यात, असंख्यात, अनंतकाल. |

**गाथा ४७–४८–४९–५०–५१–**

पुद्गलविपाकी प्रकृति ६२, भवविपाकी प्रकृति ४, क्षेत्रविपाकी प्रकृति ४ व जीवविपाकी प्रकृति ७८ यांचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें:–

६२ पुद्गलविपाकी म्हणजे पुद्गलांत उदय पावणाऱ्या प्रकृति

५ शरीरें, ५ बंधनें, ५ संघात, ६ संस्थानें, ३ अंगोपांग, ६ संहननें, ५ वर्ण, २ गंध, ५ रस, ८ स्पर्श, १ निर्माण, १ आतप, १ उद्योत, १ स्थिर, १ अस्थिर, १ शुभ, १ अशुभ, १ प्रत्येक, १ साधारण, १ अगुरुलघु, १ उपघात, १ परघात मिळून ६२.

४ भवविपाकी—४ आयु.

४ क्षेत्र विपाकी—४ आनुपूर्व्य [ यांचा उदय विग्रहगतींत असतो ]

७८ जीवविपाकी—

२ वेदनीय, २ गोत्र, ४७ घाति, २७ नामकर्माच्या एकूण ७८

नामकर्माच्या २७ प्रकृतींचा तपशील.

१ तीर्थंकर १ उच्छ्वास १ बादर १ सूक्ष्म १ पर्याप्त १ अपर्याप्त
१ सुस्वर १ दुःस्वर १ आदेय १ अनादेय १ यश १ अयश १ त्रास
१ स्थावर २ प्रशस्तअप्रशस्तविहायोगति १ सुभग १ दुर्भग ४ गति
५ जाति मिळून २७

---

१४८

## कर्माच्या अपेक्षेनें ४ निक्षेपांचें स्वरूप.

**गाथा** ५२—सामान्य कर्माचे ४ भेद—१ नाम १ स्थापना १ द्रव्य १ भाव. प्रकृति, पाप, कर्म, मल हीं किंवा अशीं जीं नांवें तीं ' नामनिक्षेपरूप कर्म ' समजावीं.

**गाथा** ५३—कर्मासारखें किंवा कर्मासारखें नाहीं असें जें द्रव्य त्या ठिकाणीं अशी प्रतिष्ठा करणें कीं जीवाच्या प्रदेशसमूहांत जें सामान्य कर्म आहे तें हेंच याला ' स्थापना निक्षेपरूप कर्म ' म्हणतात.

**गाथा** ५४—द्रव्यनिक्षेपरूप कर्माचे २ भेद—१ आगमद्रव्यकर्म २ नोआगमद्रव्य कर्म. कर्मस्वरूपाचें वर्णन करणाऱ्या आगमाला जाणणारा असून तत् चिंतनरूप परिणाम नसेल व त्याचा उपयोग अन्य ठिकाणीं असेल तेव्हां तो जीव ' आगमद्रव्यकर्म ' होय.

**गाथा** ५५—नोआगम द्रव्यकर्माचे ३ प्रकार—१ ज्ञायकशरीर, २ भावि, ३ तद्व्यतिरिक्त. कर्माचें स्वरूप जाणणाऱ्या जीवाच्या शरीराला ज्ञायकशरीर नोआगमद्रव्यकर्म म्हणतात. ज्ञायकशरीराचे प्रकार ३—१ भूत, २ वर्तमान, ३ भावि. ज्या शरीरानें युक्त जीव कर्मस्वरूप जाणणारा असेल तें वर्तमान शरीर, या पूर्वी जें शरीर सोडलें तें भूत शरीर व पुढें जें शरीर धारण करील तें भावि शरीर.

**गाथा** ५६–ज्ञायकाचें भूतशरीर तीन प्रकारचें असतें–१ च्युत, २ च्यावित, ३ त्यक्त. **च्युत**—'स्वपाकेन पतितं' म्हणजे आपल्या आपण आयुःकर्माच्या नाशानें [ कदलीघात व संन्यासविरहित ] जें मरण येतें तें.

**गाथा** ५७–५८–**च्यावित**— ज्ञायकाचें भूतशरीर कदलीघातानें पडून नष्ट झालें असेल व संन्यासरहित असेल तें च्यावित.

कदलीघात मरण—विष, वेदना, रक्तक्षय, भय, शस्त्रघात, संक्लिष्ट परिणाम, उच्छ्वासनिरोध, आहारनिरोध यांच्या निमित्तानें आयुःकर्माचा क्षय होऊन जें मरण येतें तें कदलीघात मरण.

**त्यक्त**—कदलीघातानें किंवा कदलीघातावांचून संन्यासानें शरीर नष्ट होतें तें त्यक्त.

**गाथा** ५९.–त्यक्तशरीराचे तीन प्रकार—१ भक्तप्रतिज्ञा, २ इंगिनी, ३ प्रायोपगमन, भक्तप्रतिज्ञेचे तीन भेद—१ जघन्य, २ मध्यम, ३ उत्कृष्ट.

**गाथा** ६०–भोजनाची प्रतिज्ञा करून जें संन्यास मरण येतें तें **भक्तप्रतिज्ञा-मरण** याचा काल जघन्य अन्तर्मुहूर्त व उत्कृष्ट बारा वर्षे या दोहोंमधील जो काल तो मध्यमकाल असे हे कालाच्या अपेक्षेनें तीन भेद सांगितले आहेत.

**गाथा** ६१–**इंगिनीमरण**—दुसऱ्याकडून उपचार, वैय्यावृत्य न करवितां आपल्या आपण उपचार करून संन्यास धारणानें जें मरण येतें तें.

**प्रायोपगमनमरण**—स्वतः किंवा इतरांकडून उपचार न करितां संन्यास धारण करून जें मरण येतें तें.

**गाथा** ६२–कर्मस्वरूपाचें प्रतिपादन करणाऱ्या आगमाला जो जीव भविष्य-त्काळीं जाणील तो जीव ज्ञायकशरीरभावी होय.

**गाथा** ६३–तद्व्यतिरिक्तनोआगमद्रव्यकर्म दोन प्रकारचें आहे. १ कर्म, २ नोकर्म. कर्म—जें पुद्गलद्रव्य ज्ञानावरणादि मूळ वा उत्तर प्रकृतिरूप परिणमतें त्या पुद्गल द्रव्याला तद्व्यतिरिक्तनोआगमद्रव्यकर्म समजावें.

**गाथा** ६४–कर्मानें होणाऱ्या कार्याला बाह्य कारणभूत जी वस्तु तिला नोकर्मरूप-तद्व्यतिरिक्त नोआगमद्रव्यकर्म समजावें.

भावनिक्षेप कर्माचे प्रकार दोन— १ आगमभावकर्म, २ नोआगमभावकर्म.

**गाथा** ६५–कर्माचें स्वरूप ज्यांत वर्णिलें आहे असें शास्त्र जाणणारा व वर्तमानकाळीं त्याच्या चिंतनांत उपयोग लावणारा जीव ' आगमभावकर्म ' म्हणवितो.

**गाथा** ६६–कर्मोदयाचें फळ भोगणारा जो जीव तो 'नोआगमभावकर्म' समजावा. गाथा ५२ ते ६६ पर्यंत कर्माचे जे प्रकार सांगितले ते सौकर्यानें समजावे म्हणून त्याचा वृक्ष खालीं दाखविल्याप्रमाणें तयार केला आहे.




**गाथा** ६७–सामान्य कर्माचे नाम, स्थापना, द्रव्य व भाव असें वर्णन केलें त्याचप्रमाणें मूलप्रकृति व उत्तर प्रकृतींचें ही समजावें. तिथें सामान्य कर्माच्या अपेक्षेनें सांगितलें. इथें ज्या त्या कर्माच्या अपेक्षेनें नाम स्थापना वगैरे समजावेत.

**गाथा** ६८–नोकर्म तद्व्यतिरिक्त, नोआगमभावकर्म हीं समजायला कठिण आहेत म्हणून तीं मूलप्रकृति वा उत्तर प्रकृतींना जोडून दाखवितात. पूर्वीं द्रव्यनिक्षेपाचे २ भेद केले १ आगम २ नोआगम–या नोआगमाचे ३ भेद सांगितले–१ ज्ञायकशरीर २ भावि ३ तद्व्यतिरिक्त. तद्व्यतिरिक्ताचे २ भेद–१कर्म २ नोकर्म. नोकर्म द्रव्यकर्म या शद्बांनीं नोकर्म तद्व्यतिरिक्त नोआगमद्रव्य समजावें व जी जी वस्तु ज्या ज्या प्रकृतीच्या उदय फलरूप कार्याला कारणभूत असेल ती वस्तु त्या प्रकृतींचें नोकर्मद्रव्यकर्म समजावें.

**गाथा ६९– मूल प्रकृतींचीं नोकर्में**

ज्ञानावरण कर्माचें नोकर्मद्रव्यकर्म झिरझिरें वस्त्र, दर्शनावरणाचें द्वारपाल, वेदनीयकर्माचें मधुलिप्तखड्गधारा, मोहनीयाचें मदिरा, आयूचें चार प्रकारचा आहार, नामकर्माचें औदारिकादि शरीर, गोत्रकर्माचें उच्चनीच शरीर, अंतरायाचें भंडारी.

## उत्तर प्रकृतींचीं नोकर्में

**गाथा** ७०–मतिज्ञानावरणाचें नोकर्मद्रव्यकर्म वस्त्र वगैरे, श्रुतज्ञानाचें नोकर्मद्रव्यकर्म श्रुतज्ञानाला रोकणारे इंद्रियाचे विषय वगैरे.

**गाथा** ७१–अवधिज्ञान व मनःपर्ययज्ञान यांचें नोकर्मद्रव्यकर्म या ज्ञानाचा नाश करायला कारणीभूत असे संक्लेशादि परिणाम ज्या बाह्य पदार्थांनीं होतात ते पदार्थ. केवलज्ञान क्षायिक असतें म्हणून त्याचें नोकर्मद्रव्यकर्म नाहीं. अवधि व मनःपर्ययज्ञान क्षायोपशमिक असल्यामुळें त्याचें नोकर्मद्रव्यकर्म संभवतें.

**गाथा** ७२–पंच निद्रारूप दर्शनावरणाचें नोकर्म द्रव्यकर्म म्हशीचें दहीं, लसूण, पेंड वगैरे, चक्षु व अचक्षु आदिचें नोकर्म द्रव्यकर्म वस्त्रादि वस्तु

**गाथा** ७३–अवधिदर्शनावरण व केवलदर्शनावरणाचें नोकर्मद्रव्यकर्म अवधिज्ञान व केवलज्ञानाप्रमाणें जाणावें. सातावेदनीचें इष्ट वस्तु व असातावेदनीयाचें अनिष्टवस्तु.

**गाथा** ७४–सम्यक्त्वप्रकृतीचीं नोकर्मद्रव्यकर्में १ जिन, २ जिनमंदिर, ३ जिनागम, ४ जिनागमधारक, ५ तप, ६ तपोधारक हीं आयतनें होत व ६ अनायतनें [ कुदेवादि ] हीं मिथ्यात्वाचीं नोकर्मद्रव्यकर्में व आयतन आणि अनायतन यांचें मिश्रण तें सम्यग्मिथ्यात्वाचें नोकर्मद्रव्यकर्म.

**गाथा** ७५–अनंतानुबंधिकषायांचें नोकर्मद्रव्यकर्म मिथ्यात्वायतन कुदेव वगैरे व बाकीच्या १२ कषायांचें नोकर्मद्रव्यकर्म देशचारित्र, सकलचारित्र व यथाख्यातचारित्र यांचा घात करणारीं जीं काव्यें, नाटकें, कोकशास्त्रादि, वा पापी पुरुषांचे समागम वगैरे.

**गाथा** ७६–स्त्रीवेद व पुरुषवेद यांचें नोकर्मद्रव्यकर्म स्त्रीपुरुषांचें शरीर व नपुंसकवेदाचें नोकर्मद्रव्यकर्म स्त्री-पुरुष व नपुंसकाचें शरीर, हास्याचें नोकर्मद्रव्यकर्म विडंबना करणारे भूत किंवा बहुरूपी वगैरे, रतिचें नोकर्मद्रव्यकर्म सत्पुत्रादि

**गाथा** ७७–अरतिचें इष्टवियोग व अनिष्टसंयोग, शोककर्माचें नोकर्मद्रव्यकर्म पुत्रमरण वगैरे, भयाचें सिंहादि भयकारी वस्तु व जुगुप्सेचें निंद्यवस्तु वगैरे.

**गाथा** ७८–नरकायूचें नोकर्मद्रव्यकर्म अनिष्टाहार व विषरूपमाती [ नरकांतील ] अवशिष्ट तीन आयूंचें नोकर्मद्रव्यकर्म इष्ट अन्नादि वस्तु--सामान्यपणें गतिनामकर्माचें नोकर्मद्रव्यकर्म चतुर्गतीचें क्षेत्र समजावें.

**गाथा** ७९–नरकादि गतीचें नोकर्मद्रव्यकर्म आपापल्या गतीचें क्षेत्र. जातिनामकर्माचें नोकर्मद्रव्यकर्म द्रव्येंद्रियरूप पुद्गल.

**गाथा** ८०–एकेंद्रियादि जातीचें नोकर्मद्रव्यकर्म आपापलीं द्रव्येंद्रियें व शरीरनामकर्माचें नोकर्मद्रव्यकर्म शरीरस्कंधरूप पुद्गल.

**गाथा** ८१–औदारिक, वैक्रियिक, व आहारक तैजस या शरीर नामकर्माचें नोकर्मद्रव्यकर्म शरीर वर्गणा, कार्मणाचें नोकर्मद्रव्यकर्म विस्रसोपचय [ कर्मबंध होण्यायोग्य परमाणु ] होय.

**गाथा** ८२–बाकीच्या पुद्गलविपाकी व जीवविपाकी प्रकृतींचें नोकर्मद्रव्यकर्म शरीर आहे. क्षेत्रविपाकी जी आनुपूर्वी प्रकृति तिचें नोकर्मद्रव्यकर्म तें तें क्षेत्र समजावें.

**गाथा** ८३–थिर प्रकृतींचें नोकर्मद्रव्यकर्म थिर रस रुधिरादिक, अथिर प्रकृतीचें अथिर रस रुधिरादिक, शुभ प्रकृतीचें शुभ शरीरावयव, अशुभाचें अशुभशरीरावयव, स्वर प्रकृतींचें सुस्वर दुःस्वररूप परिणमलेले पुद्गलस्कंध नोकर्मद्रव्यकर्म होत.

**गाथा** ८४–उच्चगोत्राचें नोकर्मद्रव्यकर्म लोकपूज्य कुलांत उत्पन्न झालेलें शरीर, नीचगोत्राचें नीचकुलांत उत्पन्न झालेलें शरीर, दानादि चार अंतरायांचें नोकर्मद्रव्यकर्म दानादिकांना विघ्न करणारे स्त्री, पुरुष, पर्वत, नदी इत्यादि

**गाथा** ८५–वीर्यांतरायाचें नोकर्मद्रव्यकर्म रूक्षाहार वगैरे बलनाशक पदार्थ असें तद्व्यतिरिक्त नोआगमद्रव्यकर्म सांगितलें. पुढें नोआगमभावकर्म सांगतात.

### " नोआगमभावकर्म "

**गाथा** ८६–आपापल्या कर्मप्रकृतीचें फल भोगणारे जीव हे त्या त्या प्रकृतीचें नोआगमभावकर्म समजावें. पुद्गलविपाकी प्रकृतींचें नोआगमभावकर्म नसतें म्हणून त्यांचा उदय झाला असतां जीवविपाकी प्रकृतींच्या सहायावांचून साक्षात् सुख वगैरे उत्पन्न होत नाहीं. याप्रमाणें सामान्य कर्म प्रकृतींत [ मूल व उत्तर प्रकृतींत ] नाम, स्थापना, द्रव्य, भाव हे चार निक्षेप सांगून त्यांचें यथार्थ स्वरूप दाखविलें.

### इति प्रकृतिसमुत्कीर्तननाम प्रथमाधिकारः संपूर्णः

---*---

## [ २ ] बंधोदयसत्वाधिकार

**गाथा** ८७–मी नेमिनाथ तीर्थंकराला नमस्कार करून बंधोदयसत्वयुक्त ग्रंथ सांगेन गुणस्थान व मार्गणास्थान यांमध्यें बंध, उदय, सत्व हीं दाखविलीं जातील. नेमिनाथ हे तीर्थंकर, असहाय–पराक्रमी व महावीर आहेत.

**गाथा** ८८–सकलांगाचा सविस्तर किंवा संक्षिप्त अर्थ ज्या शास्त्रांत असेल त्याला स्तव म्हणावें.

एकांगाचा सविस्तर वा संक्षिप्त अर्थ ज्या शास्त्रांत असेल त्यास **स्तुति** म्हणावें. एकांगाच्या अधिकाराचा सविस्तर वा संक्षिप्त अर्थ ज्या शास्त्रांत असेल त्यास **वस्तु** म्हणावें. **प्रथमानुयोगादि** शास्त्राला धर्मकथा म्हणावें.

आतां येथें बंध, उदय, सत्तारूप कर्माचें कथन होईल. त्यांत सकलांगांसंबंधीं अर्थ सविस्तर वा ससंक्षेप सांगितला जाईल म्हणून याला **स्तव** म्हणतात. एथून आतां प्रथम बंधाचें कथन करितात.

## बंधाचे भेद.

**गाथा** ८९–बंध चार प्रकारचा आहे–१ प्रकृति २ स्थिति ३ अनुभाग ४ प्रदेश.

**प्रकृतिबंध**–मूल वा उत्तर प्रकृतींचा जीवाशीं संबंध होणें.

**स्थितिबंध**–प्रकृति जीवाशीं संबद्ध राहील तितक्या कालप्रमाणाला स्थितिबंध म्हणावें.

**अनुभागबंध**–प्रकृतींत फल देण्याची जी शक्ति असते ती.

**प्रदेशबंध.**–प्रकृतिरूप परिणत झालेले जे पुद्गल त्यांचें प्रमाण.

प्रकृतिबंध सोडून बाकीच्या तीन बंधांचें १ उत्कृष्ट १ अनुत्कृष्ट ३ अजघन्य ४ जघन्य असे चार प्रकार आहेत. सर्वांहून ज्यास्त असेल तो उत्कृष्ट, त्याहून हीन असेल तो अनुत्कृष्ट, जघन्याहून अधिक असेल तो अजघन्य, आणि सर्वांहून कमी असेल तो जघन्य.

४ प्रकृतिबंधांचे भेद चार–१ सादि २ अनादि ३ ध्रुव ४ अध्रुव ४

१६ प्रदेशबंधाचे भेद सोळा–सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव. [ ४ ] ×
उत्कृष्ट, अनुत्कृष्ट, अजघन्य, जघन्य [ ४ ]

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| म्हणजे सादिचे | उत्कृष्ट | अनुत्कृष्ट | अजघन्य | जघन्य | असे | ४ |
| अनादिचे | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ४ |
| ध्रुवाचे | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ४ |
| अध्रुवाचे | ,, | ,, | ,, | ,, | ,, | ४ |

१६ स्थितिबंधाचे भेद वरील प्रमाणें सोळा= १६

१६ अनुभागबंधाचे भेद वरील प्रमाणें सोळा= १६

—— ——

५२ ५२

**गाथा** ९०–विवक्षित बंधाचा मध्यंतरीं अभाव होऊन पुन: जो बंध होतो तो सादिबंध

अनादिपासून ज्याचा अभाव झाला नाहीं तो अनादि ,,

निरंतर ज्याचा बंध होतो तो ध्रुव ,,

सांतर ज्याचा बंध होतो तो अध्रुव ,,

या गाथेच्या हिंदी टकेंत प्रकृति, प्रदेश, अनुभाग आणि स्थिति यांचें १६–१६ भेद नकाशांत दाखविले आहेत पण ९१ व्या गाथेच्या टीकेंत प्रकृतिबंधाचें उत्कृष्ट,

अनुत्कृष्टादि चार चार भेद होत नाहींत असें सांगितलें आहे म्हणून नकाशांत चूक झाली असावीसें वाटतें. एकंदर भेद ५२ होतात असें मागील गाथेंत दाखविलें आहे.

**गाथा** ९१–मिथ्यादृष्टि सासादनादि वरील वरील गुणस्थानवर्ती जीवांत ज्या कर्मांचा उत्कृष्ट स्थिति, अनुभाग, प्रदेशबंध असेल त्याच कर्मांचा अनुत्कृष्ट, स्थिति, अनुभाग, प्रदेशबंध सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव या भेदांनीं चार प्रकारचा होतो आणि अजघन्याचे ही अनुत्कृष्टाप्रमाणेंच चार प्रकार होतात. ज्या कर्मप्रकृतींचा स्थिति, अनुभाग, प्रदेशबंध वरच्या गुणस्थानांत जघन्य असेल त्यांचाच अजघन्य बंध चार प्रकारचा होतो, उदाहरणार्थ—

[ १ ] उपशमश्रेणी चढणारा जीव दहाव्या गुणस्थानांत गेला तेथें त्यास उच्चगोत्र प्रकृतीचा उत्कृष्ट अनुभाग बंध झाला. तो जीव अकराव्या गुणस्थानांत गेला तेथून परतून तोच जीव पुनः दहाव्या गुणस्थानांत आला तेथें त्यास उच्चगोत्राचा अनुत्कृष्ट अनुभागबंध झाला. हा उच्चगोत्राचा अनुत्कृष्ट अनुभाग बंध **सादि** म्हणविला जाईल कारण पूर्वी अनुत्कृष्ट अनुभाग बंध त्यास झाला होता त्याचा अभाव होऊन हा पुनः झाला म्हणून त्यास सादि म्हटलें आहे.

दहाव्या गुणस्थानाच्या खालील गुणस्थानांत हा अनुत्कृष्ट अनुभाग बंध अनादि समजला जाईल.

[ २ ] अभव्य जीवास ध्रुवबंध होतो.

[ ३ ] उपशम श्रेणीवाल्यास अनुत्कृष्टबंध सुटून जो उत्कृष्ट बंध होतो तो अध्रुव बंध होय.

[ ४ ] सातव्या नरकांतील मिथ्यादृष्टि जीव प्रथमोपशम सम्यक्त्वाच्या सन्मुख झालेला होत्साता मिथ्यात्व गुणस्थानाच्या अंतसमयीं नीच गोत्राच्या जघन्य अनुभागास बांधितो. तोच जीव सम्यग्दृष्टी होऊन पुनः मिथ्यादृष्टि झाल्यावर त्यास नीचगोत्राचा अजघन्य अनुभाग बंध होतो या अजघन्य बंधास ' सादि '' म्हणावें व त्या मिथ्यादृष्टि जीवास मिथ्यात्वाच्या अंतसमया पूर्वी तो नीच गोत्राचा अजघन्य अनुभाग बंध अनादि होता.

[ ५ ] अभव्य जीवास तोच नीच गोत्राचा अजघन्य अनुभाग बंध ध्रुव असतो.

[ ६ ] वरील चौथ्या उदाहरणांत नीचगोत्राचा जघन्य अनुभाग बंध जो दाखविला तो अध्रुव होय.

**गाथा** ९२–१ तीर्थंकर प्रकृतीचा बंध चौथ्या गुणस्थानापासून आठव्याच्या सहाव्या भागापर्यंत होतो.

१ आहारक शरीर व आहारक अंगोपांगाचा बंध सातव्या गुणस्थानांत व आठव्याच्या ६ व्या भागापर्यंत होतो.

१ आयूचा बंध पहिल्या गुणस्थानापासून सातव्या गुणस्थानापर्यंत होतो परंतु मिश्र गुणस्थानांत व निर्वृत्त्यपर्याप्त अवस्थेला प्राप्त झालेल्या मिश्रकाययोगांत आयुर्बंध होत नाहीं.

१ निर्वृत्त्यपर्याप्त–विग्रहगतींतून गेल्यानंतर अंतर्मुहूर्तपर्यंत पर्याप्ति पूर्ण करीत नाहीं. तोंवरची अवस्था. पण हा जीव पर्याप्ति पूर्ण करीलच.

१ लब्ध्यपर्याप्त–पर्याप्ति पूर्ण न करितां जो मरेल तो.

**गाथा** ९३–तीर्थंकर प्रकृतीचा बंध प्रथमोपशम सम्यक्त्वांत, किंवा बाकीचीं तीन सम्यक्त्वें अर्थात् द्वितीयोपशम सम्यक्त्व, क्षायोपशमिक सम्यक्त्व व क्षायिक सम्यक्त्व या अवस्थांत चौथ्या गुणस्थानापासून सातव्या गुणस्थानापर्यन्त सम्यग्दृष्टी मनुष्यच केवली व श्रुतकेवलीच्या जवळ आरंभितो. नंतर या प्रकृतीचा बंध तिर्यंच सोडून बाकीच्या तीन गतींत होत राहतो. प्रथमोपशमसम्यक्त्व असतांना षोडशकारण भावनांचें अनुष्ठान होऊं शकत नाहीं. म्हणून प्रथमोपशम सम्यक्त्वांत तीर्थंकर प्रकृतीचा बंध होऊं शकत नाहीं. असें हीं कित्येक आचार्यांचें मत आहे.

१ दोनकोटि पूर्ववर्ष व तेहतीस सागर–उणें आठ वर्ष व एक अंतर्मुहूर्त इतक्या कालापर्यंत तीर्थंकर प्रकृतीचा बंध होत राहतो हा उत्कृष्ट काल होय.

[ २ कोटि पूर्व वर्ष+३३ सागर–८ वर्ष व १ अन्तर्मुहूर्त ]

**गाथा** ९४ ते १०२–कोणत्या गुणस्थानांत किती प्रकृतींची व्युच्छित्ति होते तें सांगतात. व्युच्छित्ति म्हणजे बंधाचा अभाव. एका गुणस्थानांत ज्या प्रकृतींची व्युच्छित्ति झाली त्या प्रकृतीचा बंध पुढील गुणस्थानांत होत नाहीं.

दुसऱ्या गुणस्थानांत २५ प्रकृतींची व्युच्छित्ति होते. त्या २५ प्रकृतींचा बंध केवळ मिथ्यात्वानेंही होतो व सासादनांत केवळ अनंतानुबंधीनेंही होतो. [ गाथा ९६ ]

## [ कोष्टक १ ]

[ नानाजीवापेक्षेनें या अध्यायांत कथन आहे. ]

| गुणस्थान | व्युच्छित्ति प्राप्तप्रकृतींची संख्या | ज्या प्रकृतींची व्युच्छित्ति होते त्यांचीं नांवें. |
|---|---|---|
| १ | १६ | १ मिथ्यात्व २ हुंडसंस्थान ३ नपुंसकवेद ४ असंप्राप्तासृपाटिका ५ एकेंद्रिय ६ स्थावर ७ आतप ८ सूक्ष्म ९ अपर्याप्त १० साधारण ११ द्वींद्रिय १२ त्रींद्रिय १३ चतुरिंद्रिय १४ नरकगति १५ नरकगत्यानुपूर्व्य १६ नरकायु. |
| २ | २५ | ४ अनंतानुबंधिकषाय १ स्त्यानगृद्धि १ निद्रानिद्रा १ प्रचलाप्रचला १ दुर्भग १ दुःस्वर १ अनादेय १ न्यग्रोधपरिमंडलसंस्थान |

| गुणस्थान | व्युच्छित्ति प्राप्तप्रकृतींची संख्या | ज्या प्रकृतींची व्युच्छिति होते त्यांचीं नांवें. |
|---|---|---|
| | | १ स्वातिसंस्थान १ कुब्ज सं. १ वामन सं. १ वज्रनाराच संहनन १ नाराचसंहनन १ अर्धनाराच सं. १ कीलित सं. १ अप्रशस्तविहायोगति १ स्त्रीवेद १ नीचगोत्र १ तिर्यंचगति १ तिर्यंचगत्यानुपूर्व्य १ उद्योत १ तिर्यंचायु. |
| ३ | ० | |
| ४ | १० | ४ अप्रत्याख्यानकषाय १ वज्रवृषभनाराचसंहनन १ औदारिक शरीर १ औदारिक अंगोपांग १ मनुष्यगति १ मनुष्यगत्यानुपूर्व्य १ मनुष्यायु. |
| ५ | ४ | ४ प्रत्याख्यानकषाय. |
| ६ | ६ | १ अस्थिर १ अशुभ १ असातवेदनीय १ अयशःकीर्ति १ अरति १ शोक. |
| ७ | १ | १ देवायु—स्वस्थानाप्रमत्तमध्यें गुणस्थानाच्या शेवटच्या समयांत देवायूची व्युच्छित्ति होते सातिशयअप्रमत्त वगैरे मध्यें देवायूची व्युच्छित्ति नाहीं.कारण देवायूचा बंध होत नाहीं. |
| ८ भाग १ | २ | १ निद्रा व १ प्रचला या भागांत चढतांना मरण येत नाहीं. |
| ,, २ | ० | |
| ,, ३ | ० | |
| ,, ४ | ० | |
| ,, ५ | ० | |
| ,, ६ | ३० | १ तीर्थंकर १ निर्माण १ प्रशस्तविहायोगति १ पंचेंद्रिय १ तैजस १ कार्मण १ आहारक शरीर १ आहारक अंगोपांग १ समचतुरस्र संस्थान १ देवगति १ देवगत्यानुपूर्व्य १ वैक्रियिक शरीर १ वैक्रियिक अंगोपाग ४ वर्णादि १ अगुरुलघु १ उपघात १ परघात, १ उच्छ्वास १ त्रस १ बादर १ पर्याप्त १ प्रत्येक १ स्थिर १ शुभ १ सुभग १ सुस्वर १ आदेय. |
| ,, ७ | ४ | १ हास्य १ रति १ भय १ जुगुप्सा. |
| ९ भाग १ | १ | १ पुरुषवेद. |
| ,, २ | १ | १ संज्वलन क्रोध. |

| गुणस्थान | व्युच्छित्ति प्राप्तप्रकृतींची संख्या | ज्या प्रकृतींची व्युच्छित्ति होते त्यांचीं नांवें. |
|---|---|---|
| ,, ३ | १ | १ ,, मान |
| ,, ४ | १ | १ ,, माया |
| ,, ५ | १ | १ ,, लोभ |
| १० | १६ | ५ ज्ञानावरण ४ दर्शनावरण [ चक्षु, अचक्षु, अवधि, केवल ] ५ अंतराय १ यश:कीर्ति १ उच्चगोत्र. |
| ११ | ० | |
| १२ | ० | |
| १३ | १ | सातावेदनीय |
| १४ | ० | |
| | १२० | एकंदर प्रकृति १२० बंधयोग्य आहेत. त्यांची व्युच्छित्ति वर लिहिल्याप्रमाणें जाणावी. |

**गाथा** १०३–४–गुणस्थानापेक्षेनें बंधव्युच्छित्ति, बंध, अबंध प्रकृतींचें कोष्टक. बंधयोग्य प्रकृती १२०

## [ कोष्टक २ ]

| गुणस्थाम | अबंध प्र. संख्या | बंध प्र. संख्या | बंधव्युच्छित्ति प्र. संख्या | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | ११७ | १६ | ३=आहारद्विक, तीर्थंकर<br>२ १ |
| २ सासादन | १९ | १०१ | २५ | |
| ३ मिश्र | ४६ | ७४ | ० | ४६=१९+२५=४४+२<br>मनुष्यायु, देवायु. |
| ४ असंयत | ४३ | ७७ | १० | ४३=४६–तीर्थंकर, मनुष्यायु, देवायु. |
| ५ देशसंयत | ५३ | ६७ | ४ | |
| ६ प्रमत्त विरत | ५७ | ६३ | ६ | |
| ७ अप्रत्तम विरत | ६१ | ५९ | १ | ६१=६३–२ आहारद्विक |

| गुणस्थान | अबंध प्र. संख्या | बंध प्र. संख्या | बंधव्युच्छिति प्र. संख्या | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| ८ अपूर्व करण | ६२ | ५८ | ३६ | |
| ९ अनिवृत्तिकरण | ९८ | २२ | ५ | |
| १० सूक्ष्मसांपराय | १०३ | १७ | १६ | |
| ११ उपशांत मोह | ११९ | १ | ० | |
| १२ क्षीणमोह | ११९ | १ | ० | |
| १२ सयोग केवलि | ११९ | १ | १ | |
| १४ अयोग केवलि | १२० | ० | ० | |

**गाथा** १०५–७--मार्गणा १४ आहेत—१ गति १ इंद्रिय १ काय १ योग १ वेद १ कषाय १ ज्ञान १ संयम १ दर्शन १ लेश्या १ भव्य १ सम्यक्त्व १ संज्ञी १ आहारक.

## १ गति मार्गणा

नरकगति—-या गतींत बंधयोग्य प्रकृति १०१ आहेत–एकंदर प्रकृति १२० त्यांतून १९ प्रकृतींचा बंध होत नाहीं. त्या प्रकृति---

मिथ्यात्व गुणस्थानांत ज्या १६ प्रकृतींची व्युच्छित्ति होते त्यापैकीं पहिल्या चार सोडून बाकीच्या प्रकृति — १२

१ देवगति १ देवगत्यानुपूर्व्य १ वैक्रियिक शरीर १ वैक्रियिक अंगोपांग १ देवायु २ आहारकद्विक — ७

—

१९

पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या नरकांतील अबंध, बंध व व्युच्छित्ति पावणाऱ्या प्रकृतींचें कोष्टक. बंधयोग्य प्रकृति १०१ [ पर्याप्त अवस्था ] ( कोष्टक ३.)

## ( कोष्टक ३ )

| गुणस्थान | अबंध | बंध | व्युच्छित्ति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०० | ४ | १=तीर्थकर. ४=१ मिथ्यात्व, १ हुंड-संस्थान, १ नपुंसकवेद, १ सृपाटिकासंहनन. |
| २ सासादन | ५ | ९६ | २५ | २५=कोष्टक एक १ प्रमाणें |
| ३ मिश्र | ३१ | ७० | ० | ३१=३०+१ मनुष्यायु—या गुणस्थानांत आयुबंध होत नाहीं. |
| ४ असंयत | २९ | ७२ | १० | २९=३१–२ तीर्थकर व मनुष्यायूचा बंध या गुणस्थानांत होतो–१०=कोष्टक १ प्रमाणें. |

चौथ्या, पांचव्या व सहाव्या नरकांतील प्रकृतींचें कोष्टक [ पर्याप्त अवस्था ]

१ तीर्थकर प्रकृति कमी झाल्यामुळें या नरकांत १०० प्रकृति बंध योग्य

## ( कोष्टक ४ )

| गुणस्थान | अबंध | बंध | व्युच्छित्ति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०० | ४ | ४ पूर्वोक्त [ कोष्टक ३ प्रमाणें ] |
| २ सासादन | ४ | ९६ | २५ | २५ कोष्टक १ प्रमाणें |
| ३ मिश्र | ३० | ७० | ० | ३०=२९+१ मनुष्यायु. |
| ४ असंयत | २९ | ७१ | १० | २९=३०–१ मनुष्यायु. |

सातव्या नरकांतील अबंध, बंध, व्युच्छित्ति प्रकृतींचें कोष्टक [ पर्याप्त अवस्था ]

१ मनुष्यायूचा बंध या नरकांत होत नसल्यामुळें बंधयोग्य प्रकृति ९९

## ( कोष्टक ५ )

| गुणस्थान | अबंध | बंध | व्युच्छित्ति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | ९६ | ५ | ३=उच्चगोत्र, मनुष्यद्विक. ५=४ पूर्वोक्त+१ तिर्यंचायु. |
| २ सासादन | ८ | ९१ | २४ | २४=२५ पूर्वोक्त–१ तिर्यंचायु. |
| ३ मिश्र | २९ | ७० | ० | २९=३२–३ उच्चगोत्र, मनुष्यद्विक. |
| ४ असंयत | २९ | ७० | ९ | ९=१० पुर्वोक्त–१ मनुष्यायु. |

पहिल्या नरकांतील बंध अबंध व्युच्छित्तीचें कोष्टक [ अपर्याप्त अवस्था ]
पर्याप्त अवस्थेंत १०१ प्रकृतींचा बंध होतो परंतु अपर्याप्त अवस्थेंत मनुष्यायु, तिर्यंचायु
या दोन प्रकृतींचा बंध होत नाहीं म्हणून बंधयोग्य प्रकृति ९९.
या अवस्थेंत १ व ४ हींच गुणस्थानें होतात.

## ( कोष्टक ६ )

| गुणस्थान | अबंध | बंध | व्युच्छित्ति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ९८ | २८ | १=तीर्थंकर. २८=४ मिथ्यात्वांतील+२४ सासादनांतील. |
| ४ असंयत | २८ | ७१ | ९ | २८=२९–१ तीर्थंकर ९=पूर्वोक्त |

१ दुसऱ्या नरकापासून सहाव्या नरकापर्यंत अपर्याप्तावस्थेंतील जीवाचें १ मिथ्यात्व गुणस्थानच असतें एकंदर १०१ प्रकृतींपैकीं १ तीर्थंकर १ मनुष्यायु १ तिर्यंचायु या तीन प्रकृतींचा बंध येथें होत नसल्याळें ९८ प्रकृतींचाच बंध होतो.

२ सातव्या नरकांतील अपर्याप्त अवस्थेंत १ मिथ्यात्वच गुणस्थान असतें वरील ९८ पैकीं १ मनुष्यगति १ मनुष्यगत्यानुपूर्व्य व १ उच्चगोत्र या तीन प्रकृतींचा बंध या नरकांतील अपर्याप्त अवस्थेंत होत नाहीं म्हणून ९५ प्रकृतींचाच बंध होतो.

**गाथा** १०८–१०९.–तिर्यंचगति—–तिर्यंचगतीच्या अपेक्षेनें तिर्यंचाचे चार भेद कल्पून प्रकृतींचें विवरण केलें आहे. १ सामान्य तिर्यंच १ पंचेंद्रियतिर्यंच १ पर्याप्ततिर्यंच १ योनिमत् तिर्यंच [ द्रव्य स्त्रीवेदवाले ] या तिर्यंचांना पांच गुणस्थानें होतात.

एकंदर प्रकृति १२० पैकीं १ तीर्थंकर २ आहारकद्विक या तीन प्रकृतींचा बंध तिर्यंचगतींत होत नाहीं. म्हणून ११७ चाच बंध होतो.

तिर्यंचाचे जे चार भेद कल्पिले आहेत त्यांत अबंध, बंध, व्युच्छित्ति दाखवितात.

## [ कोष्टक ७ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्रकृति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | ११७ | १६ | १६–कोष्टक १ प्रमाणें |
| २ सासादन | १६ | १०१ | ३१ | ३१=२५+६=वज्रवृषभनाराचसंहनन, (१) औदारिकद्विक, (२) मनुष्यगति, (१) मनुष्यगत्यानुपूर्व्य, (१) मनुष्यायु. (१) |
| ३ मिश्र | ४८ | ६९ | ० | ४८=४७+१ देवायु. |
| ४ असंयत | ४७ | ७० | ४ | ४७=४८–१ देवायु. ४=१०–६ सासादनांत ६ प्रकृतींची व्युच्छित्ति व येथें चार अप्रत्याख्यान कषायांची व्युच्छित्ति. |
| ५ देशविरत | ५१ | ६६ | ४ | ४–प्रत्याख्यान चार कषाय. |

याच चार तिर्यंच भेदांतील निर्वृत्यपर्याप्तक अवस्थेंत १११ प्रकृतींचा बंध होतो. ११७ तून ६ प्रकृतींचा बंध होत नाहीं. त्या सहा प्रकृति ४ आयु २ नरकद्विक=६.
४

## [ कोष्टक ८ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ४ | १०७ | १३ | ४=देवचतुष्क १३=१६ ३ नरकद्विक, नरकायु |
| २ सासादन | १७ | ९४ | २० | २०=३१–२=तिर्यगायु १ मनुष्यायु १ |
| ३ असंयत | ४२ | ७० | ४ | ४२=४६–४ देवचतुष्काचा बंध होतो. ४=अप्रत्याख्यान कषायांची व्युच्छित्ति |

लब्ध्यपर्याप्तक तिर्यंचांना १०९ प्रकृतींचा बंध होतो ११७ ८ १ नरकायु, १ देवायु ६ वैक्रियिक षट्क. गुणस्थान पहिलेंच ( मिथ्यात्व ) असतें.

**गाथा** ११०–सामान्य मनुष्य, पर्याप्त मनुष्य व योनिमत मनुष्य यांना १२० प्रकृतींचा बंध होतो. त्याचें कोष्टक

## [ कोष्टक ९ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्र. | विवरण. |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | ११७ | १६ | ३=कोष्टक २ प्रमाणें, १६ कोष्टक १ प्रमाणें |
| २ सासादन | १९ | १०१ | ३१ | ३१=तिर्यंचवत कोष्टक ७ प्रमाणें |
| ३ मिश्र | ५१ | ६९ | ० | ५१=५०+१ देवायु |
| ४ असंयत | ४९ | ७१ | ४ | ४९=५१-२ तीर्थंकर देवायु ४=अप्रत्याख्यानक. |
| ५ देशविरत | ५३ | ६७ | ४ | ४=प्रत्याख्यानकषाय |
| ६ प्रमत्तसंयत | ५७ | ६३ | ६ | ६=कोष्टक १ प्रमाणें |
| ७ अप्रमत्त | ६१ | ५९ | १ | ६१=६३-२ आहारकद्विक, १=देवायु |
| ८ अपूर्वकरण | ६२ | ५८ | ३६ | ३६=गुणस्थानवत कोष्टक १ प्रमाणें |
| ९ अनिवृत्तिकरण | ९८ | २२ | ५ | ५= ,, |
| १० सूक्ष्मसांपराय | १०३ | १७ | १६ | १६= ,, |
| ११ उपशांतमोह | ११९ | १ | ० | १=सातावेदनीय |
| १२ क्षीणमोह | ११९ | १ | ० | ,, ,, |
| १३ सयोगकेवलि | ११९ | १ | १ | १ व्युच्छित्ति सातावेदनीय |
| १४ अयोगकेवलि | १२० | ० | ० | |

निर्वृत्यपर्याप्तक मनुष्यावस्थेंत ४ आयु २ नरकद्विक २ आहारकद्विक या आठ प्रकृतींचा बंध होत नाहीं. म्हणून १२०−८=११२ चा बंध होतो.

## [ कोष्टक १० ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | [illegible] | विवरण. |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०७ | १३ | ५=१ तीर्थंकर ४ देवचतुष्क. १३=१६−३ १ नरकायु, २ नरकद्विक |
| २ सासादन | १८ | ०४ | २० | २०=३१ पर्याप्तवत्−२ मनुष्यायु, तिर्यंचायु |
| ४ असंयत | ४२ | ७० | ८ | ४२=४७−५=तीर्थंकर, देवचतुष्क. ८=अप्रत्याख्यान, प्रत्याख्यान. |
| ६ प्रमत्त | ५० | ६२ | ६१ | ६१=६ प्रमत्तवत्+३६ अपूर्वकरणवत्−२ आहारकद्विक + ५ अनिवृत्तिकरणांतील + १६ सूक्ष्मसांपरायाप्रमाणें ६१ |
| १३सयोगकें | ११९ | १ | १ | १=सातावेदनीय. |

लब्ध्यपर्याप्तक जीवाला १०९ प्रकृतींचा बंध होतो. तीर्थंकर आहारकद्विक देवायु, नरकायु, वैक्रियिकषट्क या ११ प्रकृतींचा बंध होत नाहीं म्हणून १२०−११ =१०९ चाच बंध होतो. गुणस्थान मिथ्यात्व असतें.

**गाथा ११९** देवगतींत १२० प्रकृति पैकीं १०४ प्रकृतींचाच बंध होतो.

३ सूक्ष्मत्रय, ३ विकलत्रय, ४ सुरचतुष्क, २ नरकद्विक, १ नरकायु, १ देवायु, २ आहारकद्विक या सोळा १६ प्रकृतींचा बंध होतो नसल्यामुळें १०४ प्रकृतींचा बंध देवगतींत होतो. गुणस्थानें १ ते ४ भवनत्रिक आणि कल्पवासी देवांगना यांना १०४ पैकीं १ तीर्थंकर प्रकृति सोडून बाकी १०३ चा बंध होतो. गुणस्थानें ४ पर्याप्तावस्था.

## ( कोष्टक ११ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंध व्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०३ | ७ | ७=१मिथ्यात्व, १हुंड संस्थान, १नपुंसकवेद १ सृपाटिका संहनन, १एकेंद्रिय १स्थावर, १आतप |
| २ सासादन | ७ | ९६ | २५ | कोष्टक १ प्रमाणे २५ ची व्युच्छित्ति. |
| ३ मिश्र | ३३ | ७० | ० | ३३=३२+१ मनुष्यायु. |
| ४ असंयत | ३२ | ७१ | १० | ३२=३३-१ मनुष्यायु. |

**गाथा** ११२ सौधर्म ईशान स्वर्गांत बंध १०४ प्रकृतींचा देवगतिप्रमाणें होतो. त्याचें

## [ कोष्टक १२ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०३ | ७ | १=तीर्थंकर प्रकृति; ७=कोष्टक११ प्रमाणें. |
| २ सासादन | ८ | ९६ | २५ | |
| ३ मिश्र | ३४ | ७० | ० | ३४=३३+१ मनुष्यायु. |
| ४ असंयत | ३२ | ७२ | १० | ३२=३४-२ तीर्थंकर मनुष्यायु. |

— पर्याप्तावस्था —

तिसऱ्या सानत्कुमार स्वर्गापासून बाराव्या सहस्रारस्वर्गापर्यंत दहा स्वर्गांत १०१ प्रकृति बंधयोग्य असतात. देवगतींत १०४ प्रकृतींचा बंध मागें दाखविला आहे. त्यांतून १ एकेंद्रिय, १ स्थावर, १ आतप, या तीन प्रकृतींचा बंध होत नाहीं. म्हणून १०१ प्रकृति राहिल्या.

३ ते १२ स्वर्गातील देवांच्या प्रकृतीचें

## ( कोष्टक १३ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०० | ४ | १—तीर्थंकर ४—१ मिथ्यात्व, १ हुंडसंस्थान; १ नपुंसकवेद; १ सृपाटिकासंहनन |
| २ सासादन | ५ | ९६ | २५ | |
| ३ मिश्र | ३१ | ७० | ० | ३१=३०+१ मनुष्यायु |
| ४ असंयत | २९ | ७२ | १० | २९=३१—२ तीर्थंकर; मनुष्यायु |

—— पर्याप्तावस्था ——

आनतादि १३ ते १६ या चार स्वर्गातील व ९ ग्रैवेयकांतलि देवांना ९७ प्रकृतींचा बंध होतो. बाराव्या स्वर्गापर्यंत १०१ प्रकृतींचा बंध मागें सांगितला त्यांतून तिर्यंच द्विक्, तिर्यंचायु, उद्योत [शतारचतुष्क] या चार प्रकृतींचा बंध या विमानांत होत नाहीं. म्हणून ९७ प्रकृतीचा बंध होतो. त्यांचें

## ( कोष्टक १४ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ९६ | ४ | १ व ४—३ ते १२ स्वर्गाप्रमाणें |
| २ सासादन | ५ | ९२ | २१ | २१—२५—४ शतारचतुष्क |
| ३ मिश्र | २७ | ७० | ० | २७=२६+१ मनुष्यायु |
| ४ असंयत | २५ | ७२ | १० | २५=२७—२ तीर्थंकर, मनुष्यायु. |

—— पर्याप्तावस्था ——

९ अनुदिश व ५ अनुत्तरांत सम्यग्दर्ष्टीच उत्पन्न होतात. व त्यांचें चवथें गुणस्थान असतें यांत वरील कोष्टकाप्रमाणें ७२ प्रकृतींचाच बंध असतो.

निर्वृत्यपर्याप्तक

भवनत्रिक व कल्पवासिनी देवींच्या पर्याप्तावस्थेंत १०३ प्रकृतींचा बंध होत होता त्यांपैकीं १ तिर्यंचायु व १ मनुष्यायुचा बंध या अवस्थेंत होत नाहीं म्हणून १०३–२ =१०१ प्रकृतींचा बंध या अवस्थेंत होतो.

## ( कोष्टक १५ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०१ | ७ | ७=पर्याप्तावस्थेप्रमाणें कोष्टक ११ पहा. |
| २ सासादन | ७ | ९४ | २४ | २४=२५–१ तिर्यंचायु. |

सौधर्म ईशान स्वर्गांत निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत १०२ प्रकृतींचा बंध होतो. मागील कोष्टकांतील १०१ प्रकृति+१ तीर्थंकर प्रकृति=१०२

## [ कोष्टक १६ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०१ | ७ | १=तीर्थंकर, ७ पूर्वोक्त. |
| २ सासादन | ८ | ९४ | २४ | २४– पूर्वोक्त. |
| ४ असंयत | ३१ | ७१ | ० | ३१=३२–१ तीर्थंकर,९=१०–१ मनुष्यायु. |

तिसऱ्या स्वर्गापासून बाराव्या स्वर्गापर्यंत निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत ९९ प्रकृतींचा बंध होतो. पर्याप्तावस्थेंत १०१ चा बंध होतो त्यांपैकीं १ मनुष्यायु व १ तिर्यंचायुचा बंध या अवस्थेंत होत नाहीं म्हणून १०१–२=९९ चा बंध होतो.

## [ कोष्टक १७ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ९८ | ४ | १-तीर्थंकर प्रकृति ४-कोष्टक १३प्रमाणें. |
| २ सासादन | ५ | ९४ | २४ | २४-२५ १ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | २८ | ७१ | ९ | २८-२९-१ तीर्थंकर.९-१०-१ मनुष्यायु. |

१३ व्या स्वर्गापासून १६ वा स्वर्ग व ९ ग्रैवेयक यांतील विमानांत निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत तिर्यंचद्विक व उद्योत यांचा बंध होत नाहीं म्हणून ९६ प्रकृतींचा बंध होतो. पर्याप्तावस्थेंत ९७ प्रकृतींचा बंध होत होता. त्यांतून १ मनुष्यायूचा बंध येथें होत नाहीं.

## [ कोष्टक १८ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ९५ | ४ | १ तीर्थंकर, ४-कोष्टक १३ प्रमाणें. |
| २ सासादन | ५ | ९१ | २१ | २१=२५-४ अनंतानुबंधीचतुष्क. |
| ४ असंयत | २५ | ७१ | ० | २५=२६-१ तीर्थंकर,९=१०-१मनुष्यायु. |

९ अनुदिश व ५ अनुत्तर या विमानांत निर्वृत्यपर्याप्तावस्थेमध्यें ७१ प्रकृतींचा बंध होतो. पर्याप्तावस्थेंत ७२ प्रकृतींचा बंध होत होता त्यांपैकीं एक मनुष्यायुचा बंध या अवस्थेंत होत नाहीं म्हणून ७१ प्रकृतींचाच बंध होतो व गुणस्थान चवथेंच होतें.

**गाथा ११३-११४**

## २ इंद्रिय मार्गणा:

### पर्याप्तावस्था.

एकेंद्रियापासून चतुरिंद्रिय प्राण्यापर्यंत १२० कर्म प्रकृतीपैकीं तीर्थंकर आहारद्विक

देवायु नरकायु वैक्रियिकषट्क या ११ प्रकृतींचा बंध होत नाहीं म्हणून १२०–११= १०९ प्रकृतींचाच बंध होतो. गुणस्थान पहिलें व दुसरें असतें.

एकेन्द्रिय व विकलेन्द्रियामध्यें उत्पन्न झालेला जीव सासादन गुणस्थानांत शरीरपर्याप्ति पूर्ण करूं शकत नाहीं. कारण या गुणस्थानाचा काल थोडा आहे व निर्वृत्यपर्याप्तावस्थेचा काल अधिक आहे यास्तव या गुणस्थानांत मनुष्यायु व तिर्यंचायु यांचाही बंध होत नाहीं.

## ( कोष्टक १९ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०९ | १५ | १५=१६–३ नरकद्विक,नरकायु =१३+२ मनुष्यायु व तिर्यंचायु =१५ |
| २ सासादन | १५ | ९४ | २९ | २९=३१ तिर्यंचगतिप्रमाणें–२ तिर्यंच व मनुष्यायु. |

पर्याप्त पंचेंद्रिय जीवांमध्यें १४ गुणस्थानप्रमाणें रचना आहे.

पंचेंद्रिय निर्वृत्यपर्याप्तामध्यें ११२ चा बंध होतो. १२० पैकीं ८ प्रकृतींचा बंध होत नाहीं. त्या ८ प्रकृति–आहारकद्विक, नरकद्विक व ४ आयु=८

या जीवाला १–२–४–६, १३ हीं ५ गुणस्थानें होतात.

सहाव्या गुणस्थानांत आहारक शरीर बनतांना आहारकमिश्रयोगांत निर्वृत्यपर्याप्तावस्था होते. व तेराव्या गुणस्थानांत केवलसमुद्घातांचे वेळीं औदारिक मिश्रयोग होतो. त्यावेळीं ही निर्वृत्यपर्याप्तावस्था होते. पंचेंद्रिय निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत ११२ प्रकृतींचा बंध होतो. त्याचें

## ( कोष्टक २० )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०७ | १३ | ५=१ तीर्थंकर, ४ देवचतुष्क, १३=१६-३, (२ नरकद्विक, १ नरकायु.) |
| २ सासादन | १८ | ९४ | २४ | २४=२५-१ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | ३७ | ७५ | १३ | ३७=४२-५, तीर्थंकर, देवचतुष्क १३=१०-१ मनुष्यायु=९+४ प्रत्याख्यान कषाय पांचव्या गुणस्थानांतील मिळून १३ |
| ६ प्रमत्त | ५० | ६२ | ६१ | ६१=६ सहाव्या गुणस्थानांतील, १ सातव्यांतील, ३६ आठव्यांतील, ५ नवव्यांतील, १६ दहाव्यांतील मिळून ६४-३, (१ देवायु, २ आहारद्विक)=६१ |
| १३ सयोग केवली | १११ | १ | १ | १=सातावेदनीय. |

लब्ध्यपर्याप्त पंचेंद्रियांना बंध १०९ प्रकृतींचा होतो. कर्मप्रकृति १२० पैकीं १ तीर्थंकर, २ आहारकद्विक, १ देवायु, १ नरकायु, ६ वैक्रियिकषट्क मिळून ११ प्रकृतींचा बंध होत नाहीं. म्हणून १०९ चा बंध होतो. एकेंद्रिय ते चतुरिंद्रियपर्याप्ताप्रमाणें गुणस्थान १ मिथ्यात्व असतें.

## ३ कायमार्गणा.

**गाथा** ११४–११५–पृथ्वी, जल, वनस्पति-कायिक, जीवांना वरच्याप्रमाणें १०९ प्रकृतींचा बंध होतो. गुणस्थान १–२.

## [ कोष्टक २१ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति | विवरणं. |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०९ | १५ | १५=कोष्टक १९ प्रमाणें. |
| २ सासादन | १५ | ९४ | २९ | २९= ,, ,, |

अग्निकायिक व वायुकायिक जीवांना १०५ प्रकृतींचा बंध होतो.

१०९–४ मनुष्यद्विक, मनुष्यायु, उच्चगोत्र=१०५ गुणस्थान १ मिथ्यात्व. त्रसकायांची रचना गुणस्थानवत् समजावी.

लब्ध्यपर्याप्तकांत, साधारण वनस्पतिकायिकांत, सर्व सूक्ष्मस्थावर जीवांत, व तेजस्कायिक–वातकायिकजीवांत **सासादन** गुणस्थान होत नाहीं आणि नरकामध्यें अपर्याप्तावस्थेंतही सासादन गुणस्थान होत नाहीं,

## ४ योगमार्गणा.

**गाथा** ११५–१२१–योग पंधरा आहेत. ४ मन, ४ वचन, ७ काय. चार मन व चार वचन योगांत गुणस्थानाप्रमाणेंच कर्मांचे बंध, अबंध व व्युच्छित्ति हे होतात.

असत्य मन व वचन, उभयमन व वचन, या चार योगांत पहिल्या गुणस्थानापासून बारा गुणस्थानें असतात. परंतु सत्य मन व वचन आणि अनुभय मन व वचन या चार योगांत सयोगीपर्यंत तेरा गुणस्थानें असतात.

१ औदारिक काययोगांत मनुष्य गतीप्रमाणें कर्मांचे बंध अबंध व व्युच्छित्ति हीं होतात. व गुणस्थानें तेरा होतात.

२ औदारिक मिश्रकाययोगांत ( हा काययोग मनुष्य, तिर्यंच, यांच्या लब्ध्यपर्याप्त आणि निवृत्त्यपर्याप्त अवस्थेंत असतो. ) बंध ११४ प्रकृतींचा होतो. १२०–२ आहारकद्विक, २ नरकद्विक २ देव नरकायु–११४.

निवृत्यापर्याप्तावस्थेंत गुणस्थानें १–२–४–१३ अशीं चार असतात.

## [ कोष्टक २२ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०९ | १५ | ५=तीर्थंकर व देवचतुष्क, १५=कोष्टकाप्र. |
| २ सासादन | २० | ९४ | २९ | २९=१९ कोष्टकाप्रमाणें |
| ४ असंयत | ४४ | ७० | ६९ | ४४=४९–१ तीर्थंकर व देवचतुष्क. ६९=७० पैकीं १ सातावेदनीय सोडून बाकी. |
| १३ सयोगके. | ११३ | १ | १ | १=सातावेदनीय |

लब्ध्यपर्याप्तकांत मनुष्य—तिर्यंचायुचा बंध होतो. निर्वृत्यपर्याप्तकांत आयुर्बंध होत नाहीं.

३ वैक्रियिक काययोग यांत १०४ प्रकृतींचा बंध सौधर्म ईशान स्वर्गाप्रमाणें होतो व अबंध, बंध, व्युच्छित्तीचें कोष्टकहि त्याचप्रमाणें [बाराव्या कोष्टकाप्रमाणें] समजावें.

४ वैक्रियिक मिश्रकाययोग-यांत १०२ प्रकृति बंधयोग्य असतात. व गुणस्थानें १—२—४ अशीं तीन असतात. १०४ प्रकृतींपैकीं १ मनुष्यायु, १ तिर्यंचायु या दोन प्रकृतींचा बंध वैक्रियिकमिश्रकाय योगांत होत नाहीं. म्हणून १०४-२=१०२ प्रकृति बंधयोग्य असतात.

## ( कोष्टक २३ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०१ | ७ | ७=कोष्टक ११ प्रमाणें |
| २ सासादन | ८ | ९४ | २४ | २४=२५—१ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | ३१ | ७१ | ९ | ३१=३२—१ तीर्थकर.<br>९=१०—१ मनुष्यायु. |

५ आहारक काययोग यांत सहावें गुणस्थान असतें. ६३ बंध, ५७ अबंध ६ व्युच्छित्ति. कोष्टक २ प्रमाणें.

६ आहारक मिश्रकाययोग—यांत गुणस्थान ६ वें असतें. येथें देवायूचा बंध नसतो म्हणून ६२ बंध, ५८ अबंध, ६ व्युच्छित्ति असते.

७ कार्मणकाययोग यांत गुणस्थानें १ २ ४ १३ व बंध ११२ प्रकृतीचा होतो. औदारिकमिश्र काययोगांत ११४ प्रकृतींचा बंध सांगितला आहे.

त्यापैकीं १ मनुष्यायु, १ तिर्यंचायु या दोन प्रकृतींचा बंध या अवस्थेत होत नाहीं म्हणून ११४=२=११२.

( कोष्टक २४ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०७ | १३ | ५=तीर्थंकर, आणि देवचतुष्क, १३=को. १० प्रमाणें. |
| २ सासादन | १८ | ९४ | २४ | २४=२५–१ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | ३७ | ७५ | ७४ | ३७=४२–५ १ तीर्थंकर, ४ देवचतुष्क. ७४=असंयतांतील ( १०-१ मनुष्यायु ), देशसंयतांतील, प्रमत्तांतील. अपूर्वकरणांतील ३४ ( ३६–२आहारकद्विक ) अनिवृत्तिकरणांतील व सूक्ष्मसांपराय गुण-स्थानांतील मिळून ७४ [ कोष्टक १-२ पहा ] |
| १३सयोगके. | १११ | १ | १ | १=सातावेदनीय. |

## ५ वेदमार्गणा.

स्त्रीवेदाच्या पर्याप्तावस्थेंत गुणस्थाना (कोष्टक २) प्रमाणें १२० प्रकृतींचा बंध होतो. गुणस्थानें १ ते ९ असतात. पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानापर्यंत अबंध, बंध व व्युछित्ति गुणस्थाना [ कोष्टक २ ]प्रमाणें जाणावी. ९व्या गुणस्थानांत क्षपकश्रेणी-मध्यें सवेद भागाच्या द्विचरम [ उपान्त्य ] समयांत ९८ अबंध, २२ बंध, १ व्युच्छित्ति. पुरुषवेद व सवेदभागाच्या अंतिमसमयांत ९९ अबंध, २१ बंध व व्युच्छित्ति असते. ९व्या गुणस्थानाचे पांच भाग आहेत. ते कोष्टक १ मध्यें दाखविले आहेत. संज्वलन क्रोध, मान, माया, लोभाच्या पूर्वींची अवस्था सवेद असते.

स्त्रीवेदी निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत दोन गुणस्थानें असतात. १०७ प्रकृतींचा बंध म्हणजे १२० पैकीं ४ आयु, १ तीर्थंकर, २ आहारकद्विक, ६ वैक्रियिकषट्क मिळून १३ चा बंध होत नाहीं म्हणून १०७ प्रकृतींचा बंध होतो.

( कोष्टक २५ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | १०७ | १३ | १३=१६–२ नरकद्विक, १ नरकायु. |
| २ सासादन | १३ | ९४ | २४ | २४=२५–१ तिर्यंचायु. |

नपुंसकवेदी पर्याप्त जीवांना १२० प्रकृतींचा बंध कोष्टक २ प्रमाणें. स्त्रीवेदाच्या पर्याप्तावस्थेसमान १ ते ९ गुणस्थानें सवेद भागापर्यंत असतात.

नपुंसकवेदी निर्वृत्यपर्याप्त जीवांना १०८ प्रकृतींचा बंध होतो. १२० पैकीं २ आहारकद्विक, ४ आयु, ६ वैक्रियिकषट्क या १२ प्रकृतींचा बंध नसतो. १-२-४ हीं तीन गुणस्थानें असतात.

## ( कोष्टक २६ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १०७ | १३ | १=तीर्थंकर–१३=१६–नरकद्विक; नरकायु. |
| २ सासादन | १४ | ९४ | २४ | २४=२५–१ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | ३७ | ७१ | ९ | ३७=३८–१ तीर्थंकर–९=१०-१ मनुष्यायु. |

लब्ध्यपर्याप्तक नपुंसक वेदींना १०९ प्र०चा बंध होतो. निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत १०८ चा बंध होत होता त्यांपैकीं १ तीर्थंकर प्रकृतीचा बंध येथें होत नाहीं म्हणजे १०७ प्रकृति राहिल्या. त्यांत १ मनुष्यायु व तिर्यंचायु या दोन प्रकृति मिळून १०९ प्रकृतींचा बंध होतो. गुणस्थान १ मिथ्यात्व असतें.

पुंवेद पर्याप्तावस्थेंत १ ते ९ गुणस्थानाच्या सवेद भागापर्यंत १२० प्रकृतींचा बंध [ कोष्टक २ प्रमाणें ] गाथा १०३-४ होतो.

पुंवेद निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत १–२–४ हीं तीन गुणस्थानें असतात. ११२ प्रकृतींचा बंध होतो. १२०–आहारकद्विक, नरकद्विक, ४ आयु मिळून ८ चा बंध होत नाहीं म्हणून ११२ चा बंध होतो.

## [ कोष्टक २७ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति | विवरण. |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०७ | १३ | ५–तीर्थंकर, देवचतुष्क. १३ मा.को.प्रमाणें |
| २ सासादन | १८ | ९४ | २४ | २४=मागील कोष्टका प्रमाणें |
| ४ असंयत | ३७ | ७५ | ९ | ३७=४२–५ तीर्थंकर, देवचतुष्क— ९=१०–१ मनुष्यायु. |

१ तीर्थंकर प्रकृति व २ आहारकद्विक यांचा बंध स्त्रीवेद आणि नपुंसकवेद यांत होऊं शकतो परंतु त्यांचा उदय पुरुषवेदांतच होतो.

## ६ कषायमार्गणा.

कषायमार्गणेंत बंध १२० प्रकृतींचा. गुणस्थानें १ ते १० पर्यंत बंध, अबंध, व्युच्छित्ति कोष्टक २ प्रमाणें—

## ७ ज्ञान-मार्गणा.

कुमति, कुश्रुत, कुअवधि या तीन ज्ञानांत गुणस्थानें १-२ बंध ११७ चा. म्हणजे १२०-तीर्थंकर-आहारकद्विक=११७.

## [ कोष्टक २८ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | ११७ | १६ | १६=कोष्टक २ प्रमाणें. |
| २ सासादन | १६ | १०१ | २५ | २५= ,, ,, ,; |

सुमति, सुश्रुत, सुअवधि या तीन सम्यग्ज्ञानांत गुणस्थानें ४ ते १२ असतात. बंध ७९ प्रकृतींचा. मूळ प्रकृति १२० त्यांतून मिथ्यात्वगुणस्थानांत १६ सोळा प्रकृतींची व सासादनांत २५ ची व्युच्छित्ति झाली मिळून १६+२५=४१ प्रकृति गेल्या म्हणून ७९ चा बंध राहतो. बंध, अबंध, व्युच्छित्ति कोष्टक २ प्रमाणें ' अबंध ' च्या स्थानांत ४१ प्रकृति कमी कराव्यात.

मनःपर्ययज्ञानांत आहारकद्विकचा उदय होऊं शकत नाही. बंध होऊं शकतो. मनःपर्ययज्ञानांत गुणस्थानें ६ ते १२-बंध ६५ प्र. चा. १२० प्रकृतींतून उणे मिथ्यात्वांत व्युच्छित्ति १६+ सासादनांत व्यु. २५ + असंयतांत व्यु. १० + देशसंयतांत ४ मिळून ५५. १२०-५५=६५.

## [ कोष्टक २९ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति | विवरण |
|---|---|---|---|---|
| ६ प्रमत्त | २ | ६३ | ६ | २=आहारकद्विक ६ कोष्टक १–२ प्रमाणें |
| ७ अप्रमत्त | ६ | ५९ | १ | ६=८–२ आहारकद्विक १=देवायु |
| ८ अपूर्वकरण | ७ | ५८ | ३६ | ३६=कोष्टक १–२ प्रमाणें |
| ९ अनिवृत्तिकरण | ४३ | २२ | ५ | ५= ,, ,, |
| १० सूक्ष्मसांपराय | ४८ | १७ | १६ | १६= ,, ,, |
| ११ उपशांतक० | ६४ | १ | ० | ०= ,, ,, |
| १२ क्षीणकषाय | ६४ | १ | ० | ०= ,, ,, |

केवल ज्ञानांत गुणस्थानें १३–१४ हीं दोन. १३ व्या गुणस्थानांत १ सातावेदनीयाचा बंध होतो १४ व्या गुणस्थानांत बंध होत नाहीं.

## ८ संयममार्गणा.

संयम मार्गणेचे भेद ७–१ असंयम २ देशसंयम ३ सामायिक ४ छेदोपस्थापना ५ परिहारविशुद्धि ६ सूक्ष्मसांपराय ७ यथाख्यात.

[१] असंयममार्गणेंत गुणस्थानें ४–बंध ११८ चा प्रकृति १२०–२ आहारक द्विक–११८ असंयत मार्गणेचे.

## [ कोष्टक ३० ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ११७ | १६ | १=तीर्थंकर-१६=कोष्टक १–२ प्रमाणें |
| २ सासादन | १७ | १०१ | २५ | २५ कोष्टक १–२ प्रमाणें |
| ३ मिश्र | ४४ | ७४ | ० | ४४=४२+२ १ मनुष्यायु, १ देवायु |
| ४ असंयत | ४१ | ७७ | १० | ४१=४४–३ मनुष्यायु, देवायु, तीर्थंकर |

[ २ ] देशसंयममार्गणेंत ५ व्या गुणस्थानाप्रमाणें अबंध, बंध, व्युछित्ति जाणावी ( कोष्टक २ प्रमाणें )

[ ३ ] सामायिक, [ ४ ] छेदोपस्थापना या दोन मार्गणांत गुणस्थानें ६ते९ पर्यंत चार. बंध ६५ मनःपर्ययज्ञानाप्रमाणें. अबंध, व्युच्छित्ति ही तशीच.

[ ५ ] परिहारविशुद्धिसंयमांत ६–७ हीं दोन गुणस्थानें. बंध. अबंध, व्युच्छित्ति मनःपर्यय ज्ञानाप्रमाणें. परिहारविशुद्धि संयमीपुरुषाला ६ व्या गुणस्थानांत आहारकद्विकाचा उदय नसतो.

[ ६ ] सूक्ष्मसांपराय मार्गणेंत १० वें गुणस्थान असतें. गुणस्थाना प्र. बंध, अबंध, व्युच्छित्ति जाणावी.

[ ७ ] यथाख्यातसंयम मार्गणेंत ११ पासून १४ पर्यंत ४ गुणस्थानें. अबंध, बंध, व्युच्छित्ति गुणस्थानाप्रमाणें ११ते१३ गुणस्थानापर्यंत १ सातावेदनीयाचा बंध होतो. चौदाव्या गुणस्थानांत तिचा अबंध असतो.

## ९ दर्शना मार्गणा.

चक्षु, अचक्षु, अवधि, व केवल असे दर्शनमार्गणेचे ४ भेद आहेत. चक्षु, व अचक्षु दर्शनमार्गणेंत १ ते १२ पर्यंत गुणस्थानें असतात. बंध १२० प्रकृतींचा बंधाबंधाची रचना गुणस्थानाप्रमाणें.

अवधिदर्शन मार्गणेंत ४ ते १२ पर्यंत ९ गुणस्थानें असतात. बंधरचना गुणस्थानवत् व अवधिज्ञानवत्.

केवलदर्शनांत १३ व १४ ही दोन गुणस्थानें १३ व्या गुणस्थानांत सातावेदनीयाचा बंध असतो. १४ व्या गुणस्थानांत बंध नाहीं.

## १० लेश्यामार्गणा.

कृष्ण, नील व कापोत या तीन लेश्यांत ११८ प्रकृतींचा बंध म्हणजे १२०–२ आहारकद्विक=११८. गुणस्थानें १ ते ४ बंधाबंधांची रचना गुणस्थानवत्. तीर्थंकर प्रकृतींचा बंध या लेश्यांमध्यें ४ थ्या गुणस्थानांत होऊं शकतो. कोष्टकांत थोडा फरक पडेल. कारण आहारकद्विकचा बंध येथें होत नाहीं.

## [ कोष्टक ३१ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | ११७ | १६ | १ तीर्थंकर. १६=कोष्टक २ प्रमाणे. |
| २ सासादन | १७ | १०१ | २५ | ,, ,, |
| ३ मिश्र | ४४ | ७४ | ० | ,, ,, |
| ४ असंयत | ४१ | ७७ | १० | ,, ,, |

**पीतलेश्या:**—या लेश्येंत बंध १११ प्रकृतींचा म्हणजे १२०–१ सूक्ष्म, १ अपर्याप्त, १ साधारण, ३ विकलत्रय, १ नरकायु, २ नरकद्विक,=९ प्रकृतींचा बंध होत नाहीं; म्हणून १११ चाच बंध होतो. गुणस्थानें १ ते ७ आहेत.

## ( कोष्टक ३२ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्रकृति | विशेष विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | १०८ | ७ | ३=तीर्थंकर, आहारकद्विक. ७=मिथ्यात्व ते आतप. [ कोष्टक नं. १ प्रमाणें १६ प्रकृतींची व्युच्छित्ति आहे. त्या पैकीं पहिल्या ७ प्रकृतींची व्युच्छित्ति येथें होते. |
| २ सासादन | १० | १०१ | २५ | |
| ३ मिश्र | ३७ | ७४ | ० | ३७=३५+२ मनुष्यायु, देवायु. |
| ४ असंयत | ३४ | ७७ | १० | ३४=३७–३ तीर्थंकर, मनुष्यायु, देवायु. |
| ५ देशसंयत | ४४ | ६७ | ४ | ४=कोष्टक १ प्रमाणें. |
| ६ प्रमत्तसंयत | ४८ | ६३ | ६ | ६= ,, ,, |
| ७ अप्रमत्त | ५२ | ५९ | १ | ५२=५४–२ आहारकद्विक. |

**पद्मलेश्या:**—या लेश्येंत बंध १०८ प्रकृतींचा असतो. म्हणजे १२० प्रकृति–९ प्रकृति पीतलेश्येप्रमाणें=१११ प्रकृति त्यांत उण्या प्रकृति ३=१ एकेंद्रिय, १ स्थावर, आतप=१०८. गुणस्थानें १ ते ७.

## पद्मलेश्येचें [ कोष्टक ३३ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | १०५ | ४ | ३=पीत लेश्येप्रमाणें. ४=मिथ्यात्व, हुंड संस्थान, नपुंसकवेद, असंप्राप्तासृपाटिका. |
| २ सासादन | ७ | १०१ | २५ | |
| ३ मिश्र | ३४ | ७४ | ० | ३४=३२+१ मनुष्यायु, १ देवायु. |
| ४ असंयत. | ३१ | ७७ | १० | ३१=३४-३ तीर्थंकर, मनुष्यायु व देवायु. |
| ५ देशसंयत | ४१ | ६७ | ४ | ४=कोष्टक १,२ प्रमाणें. |
| ६ प्रमत्त | ४५ | ६३ | ६ | ६= ,, ,, |
| ७ अप्रमत्त | ४९ | ५९ | १ | ४९=५१- २ आहारकद्विक. |

**शुक्ललेश्या**---या लेश्येंत बंध १०४ प्रकृतींचा म्हणजे १०८ प्रकृति पद्मलेश्येप्रमाणें. त्यांपैकीं ४ शतारचतुष्काचा बंध येथें होत नाहीं. म्हणून १०४ चा बंध गुणस्थानें १ ते १३.

## [ कोष्टक ३४ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ३ | १०१ | ४ | ३ व ४ पद्मलेश्येप्रमाणें. |
| २ सासादन | ७ | ९७ | २१ | २१=२५-४ शतारचतुष्क. |
| ३ मिश्र | ३० | ७४ | ० | ३०=२८+२ मनुष्यायु, देवायु. |
| ४ असंयत | २७ | ७७ | १० | २७=३०-३ मनुष्यायु, देवायु आणि तीर्थंकर |
| ५ देशसंयत | ३७ | ६७ | ४ | ४=कोष्टक १, २ प्रमाणें. |
| ६ प्रमत्तसंयत | ४१ | ६३ | ६ | ६= ,, |
| ७ अप्रमत्त | ४५ | ५९ | १ | ४५=४७-२ आहारकद्विक. |

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति | विवरण |
|---|---|---|---|---|
| ८अपूर्वकरण | ४६ | ५८ | ३६ | ३६=कोष्टक १, २ प्रमाणें |
| ९अ. वृत्ति. ,, | ८२ | २२ | ५ | ५= ,, |
| १०सूक्ष्मसांपराय | ८७ | १७ | १६ | १६= ,, |
| ११ उपशांतमोह | १०३ | १ | ० | ०= ,, |
| १२ क्षीणमोह | १०३ | १ | ० | ०= ,, |
| १३सयोगकेवली | १०३ | १ | १ | १= सातावेदनीय. |

## ११ भव्य मार्गणा.

या मार्गणेत १२० प्रकृतींचा बंध होतो. व चौदा गुणस्थानें असतात. रचना गुणस्थानाप्रमाणें.

अभव्याला १ तीर्थंकर व २ आहारकद्विक या तीन प्रकृति सोडून ११७ चा बंध होतो. व गुणस्थान १ मिथ्यात्व असतें.

## १२ सम्यक्त्व मार्गणा.

या मार्गणेचे भेद ६ आहेत. १ उपशम सम्यक्त्व, (प्रथमोपशम, द्वितीयोपशम) २ क्षयोपशम सम्यक्त्व, ३ क्षायिक सम्यक्त्व, ४ मिथ्यात्व, ५ सासादन, ६ मिश्र.

प्रथमोपशम सम्यक्त्वांत ७७ प्रकृतींचा बंध होतो म्हणजे १२०–१६ प्रकृति मिथ्यात्व गुणस्थानांत व्युच्छित्ति पावणाऱ्या व २५ प्रकृति सासादनांत व्युच्छित्ति पावणाऱ्या व १ देवायु, १ मनुष्यायु=४३ चा बंध येथें होत नाहीं; म्हणजे १२०–४३= ७७ चा बंध येथें होतो.

प्रथमोपशम सम्यक्त्व व द्वितीयोपशम सम्यक्त्व या दोहोंत आयुर्बंध होत नाहीं. प्रथमोपशम सम्यक्त्वांत ४ ते ७ हीं चार गुणस्थानें होतात. प्रथमोपशम सम्यक्त्वांत मरण होत नाहीं. द्वितीयोपशम सम्यक्त्वांत ( पूर्वी आयुर्बंध झाला असल्यास ) मरण येतें, परंतु अपूर्व करणाच्या पहिल्या भागांत मरण येत नाहीं.

[ १ ] प्रथमोपशम सम्यक्त्वाचें ( कोष्टक ३५ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंध व्युच्छित्ति | विवरण. |
|---|---|---|---|---|
| ४ असंयत | २ | ७५ | ९ | २= आहारकद्विक. ९=१०–१ मनुष्यायु. |
| ५ देशसंयत | ११ | ६६ | ४ | |
| ६ प्रमत्त | १५ | ६२ | ६ | |
| ७ अप्रमत्त | १९ | ५८ | ० | १९=२१–२ आहारकद्विक. ०=१–१ देवायु. |

द्वितीयोपशम सम्यक्त्वी जीव ७ व्या गुणस्थानापासून ११ व्या गुणस्थानापर्यंत जातो व तेथून ४ थ्या गुणस्थानापर्यंत परत फिरतो; ह्मणून ४ ते ११ पर्यंत ८ गुणस्थानें असतात. द्वितीयोपशम सम्यक्त्वांत प्रथमोपशम सम्यक्त्वाप्रमाणें ७७ प्रकृतींचा बंध होतो.

उपशम सम्यक्त्व असतांना ६ व्या गुणस्थानांत आहारकद्विकाचा उदय होत नाहीं.

[ १ ] द्वितीयोपशम सम्यक्त्वाचें ( कोष्टक ३६ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृती. | विवरण |
|---|---|---|---|---|
| ४ असंयत | २ | ७५ | ९ | ९=प्रथमोपशम सम्यक्त्वाप्रमाणें. |
| ५ देशसंयत | ११ | ६६ | ४ | ४= ,, ,, ,, |
| ६ प्रमत्त | १५ | ६२ | ६ | ६= ,, ,, ,, |
| ७ अप्रमत्त | १९ | ५८ | ० | १९=२१–२ आहारकद्विक. |
| ८ अपूर्वकरण | १९ | ५८ | ३६ | ३६=कोष्टक १, २ प्रमाणें. |
| ९ अनिवृत्तिकरण | ५५ | २२ | ५ | ५= ,, ,, ,, |
| १० सूक्ष्मसांपराय | ६० | १७ | १६ | १६= ,, ,, ,, |
| ११ उपशांतमोह | ७६ | १ | ० | ०= ,, ,, ,, |

[ २ ] क्षयोपशमसम्यक्त्व अथवा वेदकसम्यक्त्व.

यांत बंध ७९ चा म्हणजे ७७ द्वितीयोपशम सम्यक्त्वाप्रमाणें + २ मनुष्यायु देवायु=७९. यांत गुणस्थानें ४ तें ७ पर्यंत असतात.

## [ कोष्टक ३७ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| ४ असंयत | २ | ७७ | १० | २= आहारकद्विक. |
| ५ देशसंयत | १२ | ६७ | ४ | |
| ६ प्रमत्त | १६ | ६३ | ६ | |
| ७ अप्रमत्त | २० | ५९ | १ | २०=२२-२ आहारकद्विक |

## ३ क्षायिक सम्यक्त्व.

यांतही क्षायोपशमिकसम्यक्त्वाप्रमाणें ७९ प्रकृतींचा बंध होतो. गुणस्थानें ४ ते १४ पर्यंत ११ असतात.

## [ कोष्टक ३८ ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | व्युच्छित्ति प्र. | विवरण. |
|---|---|---|---|---|
| ४ असंयत | २ | ७७ | १० | २=आहारकद्विक. |
| ५ देशसंयत | १२ | ६७ | ४ | |
| ६ प्रमत्त सं. | १६ | ६३ | ६ | |
| ७ अप्रमत्त | २० | ५९ | १ | २०=२२-२ आहारकद्विक. |
| ८ अपूर्वकरण | २१ | ५८ | ३६ | |
| ९ अनिवृत्तिकरण | ५७ | २२ | ५ | |
| १० सूक्ष्मसांपराय | ६२ | १७ | १६ | |
| ११ उपशांतमोह | ७८ | १ | ० | |
| १२ क्षणिमोह | ७८ | १ | ० | |
| १३ सयोगकेवली | ७८ | १ | १ | |
| १४ अयोगकेवली | ७९ | ० | ० | |

मिथ्यात्व, सासादन व मिश्र या तीन सम्यक्त्व मार्गणांत [कोष्टक२प्रमाणें] रचना जाणावी.

## १३ संज्ञीमार्गणा.

**गाथा** १२१—या मार्गणेचे भेद दोन—१ संज्ञी व १ असंज्ञी. संज्ञी मार्गणेंत १२० प्रकृतींचा बंध होतो. गुणस्थानें १ ते १२ रचना गुणस्थानवत्.

असंज्ञी मार्गणेंत ११७ प्रकृतींचा बंध म्हणजे १२०—३=१ तीर्थंकर २ आहारद्विक गुणस्थानें १ व २ हीं दोन.

### असंज्ञीमार्गणेचें ( कोष्टक ३९ )

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ० | ११७ | १९ | १९=१६+३ मनुष्यायु, देवायु, तिर्यंचायु. |
| २ सासादन | १९ | ९८ | २९ | २९=२५+६ तिर्यंचगति कोष्टक ७ प्रमाणें =३१—२ ( १ मनुष्यायु व १ तिर्यंचायु. ) |

## १४ आहार मार्गणा.

या मार्गणेचे दोन भेद १ आहार, २ अनाहार, आहार मार्गणेंत १२० प्रकृतींचा बंध व गुणस्थानें १ ते १३ रचना गुणस्थानवत कोष्टक २ प्रमाणें.

अनाहार मार्गणेंत बंध ११२ चा म्हणजे १२०—४ आयु, २ आहारकद्विक, २ नरकद्विक=११२ गुणस्थानें १।२।४।१३।१४ हीं पांच असतात.

### अनाहारमार्गणेचें [ कोष्टक ४० ]

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | ५ | १०७ | १३ | ५=४ देवचतुष्क, १ तीर्थंकर. १३=१६—२ नरकद्विक, १ नरकायु, |
| २ सासादन | १८ | ९४ | २४ | २४=२५—१ तिर्यंचायु. |
| ४ असंयत | ३७ | ७५ | ७४ | ३७=४२—५ देवचतुष्क, तीर्थंकर. ७४=९ चौथ्या गुणस्थानांतील मनुष्यायु सोडून. |

| गुणस्थान | अबंध प्रकृति | बंध प्रकृति | बंधव्युच्छित्ति प्रकृति | विवरण |
|---|---|---|---|---|
| | | | | ४ पांचव्या गुणस्थानांतील.<br>६ सहाव्या गुणस्थानांतील.<br>० सातव्या गुणस्थानांतील.<br>३४-आठव्या गुणस्थानांतील आहा० द्विक सोडून<br>५ नवव्या गुणस्थानांतील<br>१६ दहाव्या गुणस्थानांतील |
| १३सयोगके. | १११ | १ | १ | ७४ एकूण. |
| १४अयोगके | ११२ | ० | ० | |

चौदा मार्गणा समाप्त झाल्या.

## प्रकृतिबंध.

**गाथा** १२२–१२३–बंधाचे चार भेद आहेत.

१ **सादि**=बंधव्युच्छित्ति झाल्यानंतर पुनः बंध होतो तो.

२ **अनादि**=बंधव्युच्छित्ति होण्यापूर्वी जो बंध अव्याहत चालत आला तो.

३ **ध्रुव**=ज्याचा बंध सारखा चालू असतो तो.

४ **अध्रुव**=ज्याचा बंध बंद होतो तो.

ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय, नाम, गोत्र, अंतराय. या सहा ही कर्मांचा बंध चार ही प्रकारें होतो.

वेदनीयाचा बंध सादिविना तीन प्रकारचा होतो. उपशमश्रेणी चढणे व उतरणेच्या वेळीं साता वेदनीयाचा नेहमीं बंध असतो म्हणून सादि बंध नाहीं.

एका पर्यायांत एकवेळां दोनवेळा किंवा उत्कृष्ट आठ वेळा आयुकर्माचा बंध होतो. त्या अर्थी सादि आहे व अंतर्मुहूर्तच होतो म्हणून अध्रुव आहे. म्हणून आयुचा बंध सादि व अध्रुव या दोन प्रकारेंच होतो.

ज्ञानावरणाचा बंध दहाव्या गुणस्थानापर्यंत अव्याहत होत राहतो. तो अनादि. तेथून अकराव्या गुणस्थानांत गेल्यावर त्या ठिकाणीं ज्ञानावरणाचा बंध नसतो. तोच जीव अकराव्या गुणस्थानांतून परत दहाव्यांत आल्यावर त्यास ज्ञानावरणाचा जो बंध

होतो तो सादि समजावा. अभव्य जीवास ध्रुव-बंध होतो व भव्य जीवास अध्रुवबंध असतो.

**गाथा** १२४–१२५–एकंदर प्रकृति १२० त्यापैकी ४७ प्रकृति ध्रुव आहेत व ७३ अध्रुव आहेत.

**ध्रुवप्रकृति**— ५ ज्ञानावरण ९ दर्शनावरण ५ अंतराय १ मिथ्यात्व १६ कषाय १ भय १ जुगुप्सा १ तैजस १ कार्मण १ अगुरुलघु १ उपघात १ निर्माण ४ वर्ण-चतुष्क ( स्पर्श, रस, गंध, वर्ण ) एकूण ४७

**अध्रुवप्रकृति** –२ वेदनीय ७ नोकषाय [ भय, जुगुप्सा सोडून ] ४ आयु ४ गति ५ जाति २ औदारिकद्विक २ वैक्रियिकद्विक २ आहारकद्विक ६ संस्थान ६ संहनन ४ आनुपूर्व्य १ परघात १ आतप १ उद्योत १ उच्छ्वास २ विहायोगति २ त्रसस्थावर २ स्थिर अस्थिर २ शुभाशुभ २ सुभगदुर्भग २ सुस्वरदुःस्वर २ आदेय अनादेय २ बादरसूक्ष्म २ पर्याप्त अपर्याप्त २ प्रत्येक साधारण २ यश अयश १ तीर्थंकर २ गोत्र एकूण ७३

वरील ४७ प्रकृतींचा बंध सादि, अनादि ध्रुव अध्रुव असा चार हा प्रकारचा होतो परंतु ७३ प्रकृतींचा सादि व अध्रुव असा दोन प्रकारचाच बंध होतो

या ७३ प्रकृतीत ६२ प्रकृति सप्रतिपक्ष व ११ प्रकृति अप्रतिपक्ष आहेत.

**अप्रतिपक्ष**––११ प्रकृति= १ तीर्थंकर २ आहारकद्विक १ परघात १ आतप १ उद्योत, १ उच्छ्वास व ४ आयु=११

**सप्रतिपक्ष**––बाकीच्या ६२ प्रकृति. ज्यांना प्रतिपक्षी आहे त्या सप्रतिपक्ष. जसें साता, असाता.

**गाथा १२६**-अध्रुव ७३ प्रकृतिपैकी ७ प्रकृती [ १ तीर्थंकर, २ आहारकद्विक, ४ आयु ] चा निरंतर बंधकाल जघन्य एक अंतर्मुहूर्त आहे व बाकी ६६ प्रकृतींचा निरंतर बंधकाल जघन्य एक समयमात्र आहे ह्मणून यांना सादि व अध्रुव असा दोन प्रकारचाच बंध होतो.

**इति प्रकृतिबंधः**

—:०:—

गाथा-१२७ ते १३३ व १३९ ते १४२-

## " स्थितिबन्ध. " [ कोष्टक ४१ ]

| कर्म | उत्कृष्ट स्थितिबंध | जघन्य स्थितिबंध | कर्म | उत्कृष्ट स्थिति बंध | जघन्य स्थितिबंध |
|---|---|---|---|---|---|
| १ असातावेदनीय | ३०कोडाको सा. | | १ अरति | २० कोडा | |
| ५ ज्ञानावरण | ,, | अंतर्मूहूर्त | १ शोक. | कोडी सागर | |
| ९ दर्शनावरण | ,, | ४ दर्शनावरण. अंतर्मुहूर्त जघ. | १ नपुं. वेद. | ,, ,, | |
| ५ अंतराय | ,, | ,, | १ तिर्यंच ग. | ,, ,, | |
| १ साता वेदनीय | १५कोडाको.सा. | १२ मुहूर्त | १ तिर्यं.ग.पू | ,, ,, | |
| १ स्त्रीवेद | ,, | | १ भय | ,, ,, | |
| १ मनुष्यगति | ,, | | १ जुगुप्सा | ,, ,, | |
| १ मनुष्यगत्यानुपू | ,, | | १ नरकगति | ,, ,, | |
| १ मिथ्यात्व | ७०कोडाको.सा. | | १ नरकग. पू. | ,, ,, | |
| १६ कषाय | ४० ,, | क्रो.मान मा.लोभ २ मास. १ मा. ॥ मा. अं. मु. १०व्या गु. क्ष श्रे. | १ तैजस श. | ,, ,, | |
| १ हुंडक संस्थान | २० ,, | | १ कार्मण श. | ,, ,, | |
| सृपाटिकासंहनन | ,, ,, | | १ औदा. श. | ,, ,, | |
| १ वामनसंस्थान | १८ ,, | | १ औदा. अंगो | ,, ,, | |
| १ कीलितसंहनन | ,, ,, | | वैक्रि. शरीर | ,, ,, | |
| १ कुब्जकसंस्थान | १६ ,, | | १ वैक्रि अंगो. | ,, ,, | |
| १ अर्धनाराच संह | ,, ,, | | १ आतप | ,, ,, | |
| १ स्वातिसंस्थान | १४ ,, | | १ उद्योत | ,, ,, | |
| १ नाराचसंहनन | १४ ,, | | १ नीचगोत्र | ,, ,, | |
| १ न्यग्रोधपरिमंड. | १२ ,, | | १ त्रस | ,, ,, | |
| १ वज्रनाराच संह | १२ ,, | | १ बादर | ,, ,, | |
| १ समचतुरस्र सं. | १० ,, | | १ पर्याप्त | ,, ,, | |
| १ वज्रवृषभना. सं | १० ,, | | १ प्रत्येक | ,, ,, | |

| कर्म. | उत्कृष्ट स्थितिबंध | जघन्य स्थितिबंध | कर्म | उत्कृष्ट स्थितिबंध | जघन्य स्थितिबंध |
|---|---|---|---|---|---|
| १ द्वींद्रिय | १८ ,, | | १ स्पर्श | २० को.को. | |
| १ त्रीन्द्रिय | ,, ,, | | १ रस | ,, ,, | |
| १ चतुरिंद्रिय | ,, ,, | | १ गंध | ,, ,, | |
| १ सूक्ष्म | ,, ,, | | १ वर्ण | ,, ,, | |
| १ साधारण | ,, ,, | | १ अगुरुलघु | ,, ,, | |
| १ अपर्याप्त | ,, ,, | | १ उपघात | ,, ,, | |
| १ परघात | २० को. को.सा. | | १ उच्चगोत्र | १० ,, | आठ मुहूर्त. |
| १ उच्छ्वास | ,, ,, | | १ पुंवेद | ,, ,, | ८ वर्ष. |
| १ एकेंद्रिय | ,, ,, | | १ स्थिर | ,, ,, | |
| १ पंचेंद्रिय | ,, ,, | | १ शुभ | ,, ,, | |
| १ स्थावर | ,, ,, | | १ सुभग | ,, ,, | |
| १ निर्माण | ,, ,, | | १ सुस्वर | ,, ,, | |
| १ अप्र. वि. ग. | ,, ,, | | १ आदेय | ,, ,, | |
| १ अस्थिर | ,, ,, | | १ यश | ,, ,, | ८ मुहूर्त |
| १ अशुभ | ,, ,, | | १ प्रशस्त वि. | ,, ,, | |
| १ दुर्भग | ,, ,, | | १ देवगति | ,, ,, | |
| १ दुःस्वर | ,, ,, | | १ देवग. पूर्व्य | ,, ,, | |
| १ अनादेय | ,, ,, | | १ आहा श. | अं. को. को. | अं. को. को. |
| १ अयश | ,, ,, | | १ ,, अंगोपांग | ,, ,, | ,, ,, |
| १ देवायु | ३३ सागर. | १० हजार वर्षे | १ तीर्थंकर | ,, ,, | ,, ,, |
| १ नरकायु | ,, ,, | ,, ,, | १ तिर्यंचायु | ३ पल्य. | अंतर्मुहूर्त |
| १ हास्य | १० को. कोडीसा. | | १ मनुष्यायु | ,, | ,, |
| १ रति | ,, ,, | | | | |

नोटः—मागील प्रकृतींचा उत्कृष्ट स्थितिबंध संज्ञीपंचेंद्रिय पर्याप्त जीवांनाच होतो.

**गाथा** १३४–मनुष्य, तिर्यंच व देवायु सोडून बाकीच्या ११७ प्रकृतींचा उत्कृष्ट स्थितिबंध उत्कृष्ट संक्लेश परिणामांनीं होतो; व जघन्य स्थितिबंध उत्कृष्ट विशुद्ध परिणामांनीं होतो. मनुष्य, तिर्यंच, देवायूंचा उत्कृष्ट स्थितिबंध उत्कृष्ट विशुद्ध परिणामांनीं व जघन्य स्थितिबंध जघन्य विशुद्ध परिणामांनीं होतो.

**गाथा १३५**–आहारक, तीर्थंकर, देवायु या ४ प्रकृतींचा उत्कृष्ट स्थितिबंध सम्यग्दृष्टीलाच होईल. व बाकी ११६ प्रकृतींचा उत्कृष्ट स्थितिबंध मिथ्यादृष्टि जीवांनाच होईल.

**गाथा**–१३६ ते १३८–' १२० प्रकृतींच्या उत्कृष्ट स्थिति बंधाचे स्वामी.

| प्रकृति | स्वामी. |
|---|---|
| १ देवायु | सहाव्या गुणस्थानांतील जीव सातव्या गुणस्थानांत जाण्याच्या सन्मुख होईल तो जीव. |
| २ आहारकद्विक | ७ व्या गुणस्थानांतून ६ व्या गुणस्थानांत येण्याच्या सन्मुख असेल तो जीव. |
| १ तीर्थंकर | ४थ्या गुणस्थानांतून नरकगतीत जाण्याच्या सन्मुख असेल तो जीव. |
| १५=१ नरकायु, १ मनुष्यायु, १ तिर्यंचायु, ६ वैक्रियिकषट्क ३ विकलत्रय, ३ सक्ष्मत्रय=१५ | मिथ्यादृष्टि मनुष्य किंवा तिर्यंच. |
| ६=२औदारिकद्विक, २ तिर्यंचद्विक, १ उद्योत, १ सृपाटिकसंहनन, | मिथ्यादृष्टि देव किंवा नारक. |
| ३=१ एकेंद्रिय, १ आतप, स्थावर. | मिथ्यादृष्टि देव. |
| ९२=बाकी उरलेल्या प्रकृति. | उत्कृष्ट संक्लेशी वा ईषत् थोडेसे मध्यम संक्लेशी परिणाम ४ गतींतील मिथ्यादृष्टि जीव. |

उत्कृष्ट स्थिति बंधाला कारणभूत स्थितिबंधाध्यवसायस्थानें असंख्यात लोक प्रमाण होतात. त्यांचे पल्याच्या असंख्यातव्या भागा इतके खंड केल्यास अंतिम खंडांत जे पुष्कळ कषाय रूप परिणाम होतात त्यास उत्कृष्ट संक्लेश म्हणतात व प्रथम खंडाचे परिणाम थोडे कषाय रूप असतात त्यास ईषत् म्हणतात, व या दोहोंच्या मधील परिणामास मध्यम म्हणतात. [ खंडाच्या संदृष्टि गाथा ९०० ते ९०७ व ९५४ ते ९६० पहाव्या. ]

नोट:– गाथा १३९ ते १४२ चें वर्णन कोष्टक नं. ४१ मध्यें समाविष्ट केलें आहे.

**गाथा** १४३–१ यश, १ उच्चगोत्र, १ सातावेदनीय, ५ ज्ञानावरण, ४ दर्शनावरण, ५ अंतराय, ४ कषाय, १ तीर्थंकर, २ आहारकद्विक, ४ आयु, १ पुंवेद, या २९ प्रकृतींचा जघन्य स्थितिबंध कोष्टक नं ४१ मध्यें दाखविला आहे.

१२०–२९=९१ यांतून ६ वैक्रियिकषट्क, व १ मिथ्यात्व सोडून बाकी ८४ प्रकृतींचा जघन्य स्थितिबंध बादर एकेंद्रिय पर्याप्त यथायोग्य विशुद्धि धारण करणाऱ्या जीवास होतो.

**गाथा** १४४–

मिथ्यात्व प्रकृतीची उत्कृष्ट स्थिति संज्ञीपंचेंद्रिय पर्याप्त जीवच ७० को. को. सागर बांधील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ,, | एकेंद्रियजीव | १ सागर बांधील. | | |
| ,, | द्वींद्रियजीव | २५ | ,, | ,, |
| ,, | त्रींद्रियजीव | ५० | ,, | ,, |
| ,, | चतुरिंद्रियजीव | १०० | ,, | ,, |
| ,, | असंज्ञी पंचेंद्रियजीव | १००० | ,, | ,, |

**जघन्यस्थिति**–एकेंद्रियाची उत्कृष्ट स्थिति १ सागर आहे. त्यांत पल्याचा असंख्यातवा भाग कमी करून जी स्थिति राहील ती जघन्य स्थिति जाणावी. द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय व असंज्ञीपंचेंद्रिय जीव आपआपल्या उत्कृष्ट स्थिति मध्यें पल्याचा संख्यातावा भाग कमी करून जी बाकी राहील तितका जघन्य स्थितिबंध बांधील.

**गाथा** १४५–मिथ्यात्व प्रकृतीची उत्कृष्ट स्थिति संज्ञी पंचेंद्रियपर्याप्त सत्तर कोडा कोडी सागर बांधतो. त्यावेळीं एकेंद्रिय एक सागर, द्वींद्रिय २५ सागर, त्रींद्रिय ५० सागर चतुरिंद्रिय १०० सागर, व असंज्ञीपंचेंद्रिय १००० सागर, बांधतो हें प्रमाण गृहीत धरून इतर कर्मांची स्थिति त्रैराशिकानें काढतां येईल. जसें–

चारित्रमोहनीयाची उत्कृष्ट स्थिति संज्ञीपंचेंद्रिय पर्याप्ताची चाळीस कोडाकोडी सागर आहे तर एकेंद्रियादिकांची उत्कृष्ट स्थिति किती बांधली जाईल याचें त्रैराशिक खालीं लिहिल्याप्रमाणें मांडता येईल.

७० कोडाकोडीत : ४० को. को. किती : : १ सागर एकेंद्रिय स्थिति = $\frac{४}{७}$ सागर

७० ,, : ४० को. को. किती : : २५ ,, ,, $\frac{१००}{७}$ सा. द्विंद्रि.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ७० | : | ,, ४० | ,, | : : ५० | ,, | =२०० / ७ | त्रींद्रियाची ,, |
| ७० | ,, | : ४० | ,, | : : १०० | ,, | =४०० / ७ | चतुरिंद्रिय ,, |
| ७० | ,, | : ४० | ,, | : : १००० | ,, | =४००० / ७ | असंज्ञीपंचें,, |

**गाथा** १४६–संज्ञीपंचेंद्रिय जीवांत जघन्य आबाधा अंतर्मुहूर्त असते कारण त्याचा जघन्य स्थितिबंध अंतः को. कोडी असतो. संज्ञीपंचेंद्रियाच्या जघन्य आबाधा कालापेक्षां असंज्ञी पंचेंद्रिय, चतुरिंद्रिय त्रींद्रिय, द्वींद्रिय एकेंद्रियाचा जघन्य आबाधाकाल संख्यात संख्यातपट-क्रमानें कमी कमी असतो तरी अंतर्मुहूर्ताहून अधिक नसतो. एकेंद्रियापासून असंज्ञी पंचेंद्रियापर्यंत जीवाच्या जघन्य आबाधा कालाहून आवलीच्या असंख्यातव्या भागानें अधिक उत्कृष्ट आबाधाकाल समजावा.

**गाथा** १४७–उत्कृष्ट आणि जघन्य संख्या यांमधील स्थानें [ समान चय असतील तर ] काढण्याची रीति.

उत्कृष्ट संख्येंतून जघन्य संख्या वजा करून चयवृद्धीच्या प्रमाणानें भागून जो भागाकार येईल त्यांत १ मिसळावा म्हणजे उत्कृष्टापासून जघन्यापर्यंतच्या स्थानांची संख्या निघेल

उदाहरण.

५०० उत्कृष्ट संख्या ५० जघन्य संख्या व १० चयवृद्धि अशीं कल्पिली तर

५००–५०=४५० ÷ १०=४५+१=४६ ही संख्या स्थानांची समजावी. म्हणजे ५० पासून दहादहांनीं वाढत ५०० पर्यंत अंक मांडले तर ४६ वी संख्या ५०० येईल.

एखाद्या कर्मांत उत्कृष्ट स्थिति ६४ समय व जघन्यस्थिति ४५ समय व उत्कृष्ट आबाधा १६ समय मानिले तर आबाधा समय किती होतील तें पुढें दाखविलें आहे. उत्कृष्ट स्थितीला उत्कृष्ट आबाधेनें भागिल्यास आबाधाकांडक निघेल. जितक्या स्थितींच्या भेदांत एक सारखीच आबाधा असेल तितक्या भेदांत एकच आबाधा होईल. म्हणून ६४ ÷ १६=४ आबाधा कांडक म्हणजे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ६४–६३–६२–६१ | या चार स्थितिभेदांत | १६ | समयच | आबाधा | राहील. |
| ६०–५९–५८–५७ | ,, | १५ | ,, | ,, | ,, |
| ५६–५५–५४–५३ | ,, | १४ | ,, | ,, | ,, |
| ५२–५१–५०–४९ | ,, | १३ | ,, | ,, | ,, |
| ४८–४७–४६–४५ | ,, | १२ | ,, | ,, | ,, |

१६-१५-१४-१३ हे पांच आबाधांचे भेद झाले.
आबाधांचे भेद व आबाधाकांडक यांचा गुणाकार केल्यास स्थितीचे भेद निघतात. ५×४=२० हे स्थितीचे भेद ६४ ते ४५ पर्यंत झाले.

एखाद्या कर्माची उत्कृष्ट स्थिति व स्थितीचे भेद माहित असतील तर स्थितीच्या भेदांत एक कमी करून जी बाकी उरेल ती उत्कृष्ट स्थितींत वजा केली म्हणजे जघन्य स्थिति निघेल. जसें २० स्थितीचे भेद आहेत. त्यांतून १ एक वजा केला १९ राहिले. ते उत्कृष्ट स्थिति ६४ मधून वजा केले म्हणजे ४५ राहिले ही जघन्य स्थिति समजावी.

**गाथा १४८-१४९.**—एकेंद्रियापासून पंचेंद्रियपर्यंत जीवाचे स्थिति-बंधाचे भेद.

**एकेंद्रियाचे भेद ८**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | बादर | पर्याप्त | एकेंद्रियाची | उत्कृष्ट | स्थिति. |
| २ | सूक्ष्म | ,, | ,, | ,, | ,, |
| ३ | बादर | अपर्याप्त | ,, | ,, | ,, |
| ४ | सूक्ष्म | ,, | ,, | ,, | ,, |
| ५ | सूक्ष्म | ,, | ,, | जघन्य | ,, |
| ६ | बादर | ,, | ,, | ,, | ,, |
| ७ | सूक्ष्म | पर्याप्त | ,, | ,, | ,, |
| ८ | बादर | ,, | ,, | ,, | ,, |

**द्वींद्रियाचे भेद ४.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ९ | बादर | पर्याप्त | द्वींद्रियाची | उत्कृष्ट | स्थिति. |
| १० | ,, | अपर्याप्त | ,, | ,, | ,, |
| ११ | ,, | ,, | ,, | जघन्य | ,, |
| १२ | ,, | पर्याप्त | ,, | ,, | ,, |

**त्रींद्रियाचे ४ भेद.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३ | ,, | पर्याप्त | त्रींद्रियाची | उत्कृष्ट | स्थिति |
| १४ | ,, | अपर्याप्त | ,, | ,, | ,, |
| १५ | ,, | ,, | ,, | जघन्य | ,, |
| १६ | ,, | पर्याप्त | ,, | ,, | ,, |

**चतुरिंद्रियाचे ४ भेद.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १७ | ,, | पर्याप्त | चतुरिंद्रिय | उत्कृष्ट | स्थिति. |
| १८ | ,, | अपर्याप्त | ,, | ,, | ,, |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १९ | ,, | अपर्याप्त | ,, | जघन्य | ,, |
| २० | ,, | पर्याप्त | ,, | ,, | ,, |

**असंज्ञी पंचेंद्रियाचे ४ भेद.**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २१ | ,, | पर्याप्त | असंज्ञी पंचेंद्रियाची | उत्कृष्ट | स्थिति. |
| २२ | ,, | अपर्याप्त | ,, | ,, | ,, |
| २३ | ,, | ,, | ,, | जघन्य स्थिति | |
| २४ | ,, | पर्याप्त | ,, | ,, | |

**संज्ञी पंचेंद्रियाचे ४ भेद.**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २५ | ,, | पर्याप्त | संज्ञी पंचेंद्रियाची | उत्कृष्ट स्थिति |
| २६ | ,, | अपर्याप्त | ,, | ,, |
| २७ | ,, | ,, | ,, | जघन्य स्थिति |
| २८ | ,, | पर्याप्त | ,, | ,, |

एकेंद्रियाच्या स्थितिबंधाचे ८ भेद दाखविले आहेत. त्यांची स्थिति काढण्याची रीत खालीं दिली आहे:—

नंबर ४ पासून ५ पर्यंतच्या स्थितिचे भेद सर्वाहून कमी आहेत. या भेदांची शलाका १

,, ५ ते ६ पर्यंतचे स्थितिभेद वरच्याहून संख्यात पट [संख्यातची संख्या २ मानली तर १×२=२

,, ४ ते ३ वरील दुसऱ्या भेदाच्या संख्यात पट म्हणून २×२= ४

७

६ ते ७ वरील तिहीच्या बेरिजेच्या संख्यात पट म्हणून ७×२= १४

३ ते २ वरील चौथ्याच्या संख्यात पट म्हणून १४×२= २८

४९

नंबर ७ ते ८ पर्यंत वरील पांच प्रकारच्या संख्यात पट म्हणून ४९×२= ९८

,, २ ते १ पर्यंत वरील नंबर ६ च्या संख्यात पट म्हणून ९८×२=१९६

३४३

एकेंद्रियाच्या स्थितिबंधाच्या शलका ३४३ झाल्या.

एकेंद्रियाच्या मिथ्यात्वाची उत्कृष्ट स्थिति एक सागर आहे. सागराची संख्या ४६०२ कल्पिली व उत्कृष्टापासून जघन्या पर्यंत स्थितिचे भेद पल्याच्या असंख्यातव्या भागा इतके आहेत, पल्याचा असंख्यातवा भाग ६८६ मानिला.

नंबर १ पासून २ पर्यंतच्या शलाका १९६ आहेत तर स्थितिचे भेद किती होतील. ३४३ शलाकांत जर ६८६ भेद तर १९६ शलाकांत किती ? =३९२ नंबर २ ची स्थिति ( सूक्ष्म पर्याप्त एकेंद्रियाची उत्कृष्ट स्थिति ) काढण्याकरितां नंबर १ ची स्थिति ४६०२ मानिली आहे. त्यांतून [ ३९२–१ ] वजा करावा लागेल. [ ३९२ मधून एक कमी करण्याचें कारण नंबर १ चा भेद त्यांत आला आहे. म्हणजे नंबर २ ची स्थिति निघेल. ४६०२–( ३९२–१ )=४२११ नंबर ३ बादर पर्याप्तची उत्कृष्ट स्थिति काढण्याकरितां दोन ते तीनच्या शलाका २८ आहेत म्हणून स्थिति भेद ५६ झाले अर्थात् ४२११–५६= ४१५५

नंबर ४ सूक्ष्म अपर्याप्तची उत्कृष्ट स्थिति काढण्याकरितां ३ ते ४ च्या शलाका ४ चार आहेत म्हणून स्थिति भेद ८ झाले. ४१५५–८=४१४७

नंबर ५ सूक्ष्म अपर्याप्ताची जघन्य स्थिति काढण्याकरितां ४ ते ५ पर्यंत.

शलाका १ स्थिति भेद २ म्हणून ४१४७–२ =४१४५

नंबर ६ बादर अपर्याप्ताची जघन्य स्थिति काढण्याकरितां ५ ते ६ च्या

शलाका २ स्थिति भेद ४ म्हणून ४१४५–४ =४१४१

नंबर ७ सूक्ष्म पर्याप्त जघन्याची स्थिति काढण्याकरितां ६ ते ७

पर्यंत शलका १४ स्थिति भेद २८ म्हणून ४१४१–२८ =४११३

नंबर ८ बादर पर्याप्तांची जघन्यस्थिति काढण्याकरितां ७ ते ८ च्या शलाका ९८ स्थितिभेद १९६ म्हणून ४११३ — १९६ = ३९१७.

एकेंद्रियाची सात प्रकारची स्थितिवर दाखविली व सागरची स्थिति ४६०२ मानिली आहे. मिळून आठहि प्रकारची स्थिति समजली. वरील स्थिति प्रमाणाचा ताळा असा पहावा.

उत्कृष्ट स्थिति ४६०२ व स्थितीचे भेद ६८६ मानिले त्यांतून १ वजा करून उत्कृष्टांत कमी करावे म्हणजे ४६०२–( ६८६–१ )=३९१७ ही संख्या बादर पर्याप्त नंबर आठच्या स्थितीला जुळली.

द्वींद्रियाचे जे ( ९ ते १२ ) चार भेद दाखविले आहेत त्यांच्या शलाका खाली लिहिल्याप्रमाणें शलाका

अपर्याप्त उत्कृष्टापासून अपर्याप्त जघन्य (१० ते ११) पर्यंतच्या स्थितीचे भेद एकेक समय कमी होत होत सर्वांहून कमी आहेत म्हणून त्यांची शलाका १

अपर्याप्त जघन्यापासून पर्याप्त जघन्य [११ ते १२] पर्यंतच्या स्थितीचे भेद वरील (१० ते ११) च्या संख्यातपट आहेत. संख्यातला २ मानिलें आहे म्हणून १×२= २

अपर्याप्त उत्कृष्टापासून पर्याप्त उत्कृष्ट [१०ते९] पर्यंत वरील [११ते१२] ध्या दुप्पट म्हणून २×२= ४

७

द्वींद्रिय जीवाच्या मिथ्यात्वाची उत्कृष्ट स्थिति २५ सागर व जघन्यस्थिति २५ सागर [ १ पल्य–१ ÷ संख्यातें ] आहे.

या दोहोंत एकेक समय वाढत वाढत जे स्थितिभेद होतात ते एकेंद्रियाच्या नियमाप्रमाणें काढावेत. याचप्रमाणें त्रींद्रिय, चतुरिंद्रिय व असंज्ञी पंचेंद्रियाच्याही शलाका वरील प्रमाणें सात सातच होतील व त्यांचीही स्थिति वरील नियमानुसार काढावी. स्थिति भेदानुसार आबाधांचे भेदही असंज्ञी पचेंद्रियापर्यंत काढतां येतील.

**गाथा** १५०–संज्ञी पंचेंद्रिया (२५–२८)चे स्थितिभेद कसे काढावे ते सांगतात.

संज्ञीपंचेंद्रियाच्या मिथ्यात्वाची उत्कृष्ट स्थिति ७० कोडाकोडीसागर आहे व जघन्य स्थिति अंत:कोडाकोडीसागर आहे. या मधील स्थितिचे भेद [ १ समय वाढीचे ] पूर्वीप्रमाणें उत्कृष्टांतून जघन्य वजा करावें, वजाबाकीस १ नें भागून भागाकारांत १ मिळवावा तितके स्थितिभेद होतील. या स्थितिभेदांस संख्यातानीं भागून जो भागाकार येईल त्यांतून १ भाग वेगळा काढून बाकीच्या बहु भागा इतके स्थितिभेद ( संज्ञी पर्याप्ताच्या उत्कृष्टापासून संज्ञी अपर्याप्त ( नंबर २५ ते २६ पर्यंत ) होतील. या स्थितिभेदांत १ वजा करून बाकी राहील ती ७० कोडाकोडीसागरांत वजा केल्यानें जी बाकी उरेल ती अपर्याप्ताची उत्कृष्ट [ २६ ची ] स्थिति जाणावी.

जो एक भाग वेगळा काढला होता त्याला संख्यातानीं भागावें व त्यांतून १ भाग वेगळा ठेवून जो बहुभाग राहील तो संज्ञी अपर्याप्त [ नं. २६ ] च्या उत्कृष्ट थिति बंधांत १ समय कमी करून तेथून संज्ञी अपर्याप्ताच्या जघन्य स्थिति [ २७ नं. ] पर्यं-तच्या भेदांचा दर्शक होईल. या भेदाचे जितके समय होतील ते अपर्याप्ताच्या उत्कृष्ट स्थितींत वजा करून जी बाकी राहील तितकी अपर्याप्ताची जघन्य स्थिति समजावी. जो एक भाग वेगळा ठेवला होता तितके स्थिति भेद नं २७ च्या स्थितिभेदांत म्हणजे अपर्याप्ताच्या जघन्यस्थिति भेदांत एक समय कमी करून तेथून संज्ञी पर्याप्ताच्या जघन्य ( २८ पर्यंतचे ) समजावे. आतां हे जे भेद निघतील त्यांचे समय अपर्याप्ताच्या जघन्य स्थितींत वजा केल्यानें पर्याप्ताची जघन्य स्थिति निघेल. ती अंत:कोडाकोडीसागर होईल. या प्रमाणें संज्ञी जीवाच्या आबाधांचे चारही भेद करावेत.

**गाथा १५१–ज्ञानावरण ५, दर्शनावरण ४, अंतराय ५, यशःकीर्ति १, उच्चगोत्र १, सातावेदनीय १, या सतरा प्रकृतींचा जघन्य स्थितिबंध दहाव्या गुणस्थानांत क्षपक श्रेणीमध्यें होईल.**

१ पुरुषवेद आणि ४ संज्वलनकषाय यांचा जघन्य स्थितिबंध नवव्या गुणस्थानांत होतो.

१ तीर्थंकर व आहारकद्विकाचा जघन्य स्थितिबंध आठव्या गुणस्थानांत होतो.

१ वैक्रियिकषट्काचा जघन्य स्थितिबंध असंज्ञी पंचेंद्रियास होतो.

१ आयुकर्माचा जघन्य स्थितिबंध संज्ञी व असंज्ञी या दोन्हीं जीवांस होतो.

**गाथा १५२**–आयु सोडून जीं सात कर्मे आहेत त्यांचा अजघन्य स्थितिबंध सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव असा चारही प्रकारचा होतो आणि या सात कर्म प्रकृतींचा उत्कृष्ट, अनुत्कृष्ट, जघन्यबंध सादि व अध्रुव होतो. आयुकर्माचा चारही प्रकारचा बंध सादि व अध्रुव असतो.

**गाथा १५३**–१२० प्रकृति पैकीं १८ प्रकृति ( ४ संज्वलन, ५ ज्ञानावरण ४ दर्शनावरण, ५ अंतराय ) मध्ये अजघन्य स्थितिबंध सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव असा चारही प्रकारचा होतो परंतु यांचा जघन्य, अनुत्कृष्ट, उत्कृष्ट स्थितिबंध होतो तो सादि व अध्रु व असा दोन प्रकारचाच असतो. बाकीच्या १०२ प्रकृतींना चारही प्रकारचा जो बंध होतो तो सादि अध्रुवच असतो.

## बंधप्रकृतींचें सादि अनादि ध्रुव अध्रुव भेदांचें कोष्टक १२.

| ज्ञानावरण | दर्शनावरण | वेदनीय | मोहनीय | आयु | नाम | गोत्र | अंतराय | उत्तर प्रकृति १८ | उत्तर प्रकृति १०२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ | उत्कृष्ट २ |
| अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट १ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ | अनुत्कृष्ट २ |
| जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ | जघन्य २ |
| अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य २ | अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य ४ | अजघन्य २ |

चार म्हणजे सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव. दोन म्हणजे सादि, अध्रुव.

**गाथा** १५४–मनुष्यायु, तिर्यंचायु व देवायु सोडून सर्व शुभ व अशुभ प्रकृतींची स्थिति अशुभच अर्थात् संसारास कारण असते म्हणून त्यांच्या अधिक स्थितीचा बंध बहु-कषायी संक्लेशी जीवांनाच होईल व अल्पस्थितिबंध मंदकषायी विशुद्ध जीवांना होईल.

**आबाधा काल.**

**गाथा** १५५–कर्मबंध झाल्यानंतर यावत्काल पावेतों त्याचा उदय किंवा उदीरणा होत नाहीं त्या कालास आबाधाकाल म्हणतात.

**गाथा** १५६–आयुष्य सोडून सात कर्मांच्या आबाधाकालाचा हिशेब असा आहे कीं, जर एखाद्या कर्माची स्थिति एक कोडाकोडी सागराची असेल तर १०० वर्षांचा आबाधाकाल जाणावा.

जसें मिथ्यात्व कर्माची स्थिति ७० कोडाकोडी सागराची आहे तर त्याचा सात हजार वर्षांचा आबाधा काल निघेल.

**गाथा** १५७–वरील हिशेबानें ०.२५९२५९२ ६४/१०८ इतक्या सागरांची स्थिति असेल तर एक मुहूर्ताचा आबाधा काल निघेल. या करितां अंत:कोडाकोडी सागराच्या स्थितीची आबाधा अंतर्मुहूर्त निघेल. आणि एक सागराचा आबाधाकाल एका श्वासापेक्षांही कमी निघेल.

| | | | |
|---|---|---|---|
| दिव. | दि. | मुहूर्त | एक वर्षाचे मु. |
| १ ; | ३६० : : | ३० | =३६०×३०×१= १०८०० |
| वर्षाचें. | घर्षाचे. | मु. | १ |
| १ : | १०० : : | १०८०० | = १०८०००० मुहूर्त. |

१ कोटी × १ कोटी = १ कोडा कोडी म्हणजे ( १०००००००००००००० )

| | | | |
|---|---|---|---|
| मुहूर्त आबाधाची | मु. आ. किती सागर: | स्थिति सागर | सागर स्थिति ६४/१०८ |
| १०८०००० : | १ : : | १०००००००००००००० | =०.२५९२५९२ ६४/१०८ |

नाडीच्या ठोक्याला उच्छ्वास म्हणतात.

१ मुहूर्तीचे उच्छ्वास ३७७३ होतात.

| | | | |
|---|---|---|---|
| मुहूर्ताचे | मु. किती. | उच्छ्वास | हे शंभर वर्षाचे उच्छ्वास होत. |
| १ : | १०८०००० : : | ३७७३ | = ४०७४८४०००० |
| कोडाकोडीसागरांत | सागरांत किती ? | आबाधाकालाचे उच्छ्वास, | ४०७४८४०००० |
| १ : | १ : : | ४०७४८४०००० | = १०००००००००००००० |

**गाथा** १५८–आयुकर्माचा उत्कृष्ट आबाधाकाल कर्मभूमींतील तिर्यंच व

मनुष्याचा एक कोटिपूर्व वर्षांचा तिसरा भाग आहे. आणि जघन्य आबाधाकाल अंत-मुहूर्त अथवा असंक्षेपाध्दा ( ज्याहून संक्षेप ) म्हणजे कमी अध्दा म्हणजे काल होऊ शकत नाहीं ) म्हणजे आवलीचा असंख्यातवा भाग आहे.

देव व नारकींना मरणापूर्वी सहा महिने व भोगभूमींतील प्राण्यांना नऊ महिने शिल्लक राहिले म्हणजे आयुर्बंध होतो. हा आयुर्बंधही त्रिभागानें होतो. आयुर्बंध झाल्या-नंतर दुसऱ्या पर्यायांतील प्रारंभांत त्याचा उदय होतो. बंधापासून उदयापर्यंतचा जो काल तो आबाधाकाल होय.

**गाथा** १५९–मागें जो आबाधाकालाचा नियम सांगितला आहे तो कर्म उद-याच्या अपेक्षेनें सांगितला आहे. कर्माची उदीरणा होणार असल्यास त्याचा आबाधाकाल एक आवली आहे. तो पर्यंत उदीरणा होत नाहीं. [ आयुकर्म सोडून बाकीच्या सात कर्मा संबंधी हा नियम आहे. ] आयुकर्माची उदीरणा भुज्यमान आयूची होते. बध्दा-यूची उदीरणा व उदय भुज्यमान आयूंत होत नाहींत.

**गाथा** १६० ते १६२–कर्मबंध झाल्यानंतर त्यांच्या क्षरणाचा नियम. आतां आपण अशी कल्पना करूं कीं ६३०० कर्मपरमाणूंचा बंध झाला आहे व आबाधा समय वगळून नंतर ४८ समयांत त्या परमाणूंचें क्षरण होणार आहे. प्रत्येक समयांत त्याचें क्षरण होत जाईल. परंतु पहिल्या समयांत अधिक परमाणूंचें क्षरण होईल. दुसऱ्या समयांत त्याहून कमी या प्रमाणें ८ समयांची एक गुणहानि समजल्यास ४८ समयांच्या ६ गुणहानि होतील.

जितक्या गुणहानि असतील तितके वेळां २ या संख्येची दुप्पट दुप्पट करून जी संख्या येईल तिला “ अन्योन्याभ्यस्त राशि ” म्हणतात. वर ६ गुणहानि कल्पिल्या आहेत म्हणून २×२×२×२×२×२=६४ ही संख्या अन्योन्याभ्यस्त राशीची होईल. अन्योन्याभ्यस्त राशींतून १ वजा करून जी संख्या राहील तिनें सर्व परमाणूंच्या संख्येस भागिल्यानें जी संख्या येईल ती शेवटची गुणहानि.

जसें–६४–१=६३. ६३०० ÷ ६३=१०० परमाणूंची संख्या ही अंतिम गुणहानि. मागील गुणहानि दुप्पट दुप्पट होईल. म्हणजे अंतिम--

| | | |
|---|---|---|
| सहावी गुणहानि | | १०० |
| पांचवी | ,, | २०० |
| चौथी | ,, | ४००, |
| तिसरी | ,, | ८०० |
| दुसरी | ,, | १६०० |
| पहिली | ,, | ३२०० |
| | | ६३०० |

निषेकहार=दोन गुणहानि आयाम.

एका गुणहानिंचे जेवढे समय त्यास गुणहानि आयाम म्हणतात.

आपण आठ समयाचा एक गुणहानि आयाम मानिला आहे. म्हणून १६ समयाचा एक निषेकहार होईल

चय कसा काढावा याची रीति–( चय म्हणजे समान अंतर )

गुणहानि द्रव्यास ÷ निषेकहारं+गुणहानि आयाम+१×गुणहानि आयाम.

२

गुणहानि द्रव्य ३२०० याला भागिले १६+८+१×८=२००=१००

२ २

३२०० भागिले १०० शंभर म्हणजे ३२ हें चय प्रमाण ठरलें.

चयाला निषेकहारानें गुणिलें म्हणजे पहिल्या समयीं क्षरण पावणाऱ्या परमाणूंची संख्या निघेल. म्हणजे चय ३२×१६ निषेक. =५१२ ही संख्या पहिल्या समयांत क्षरण पावेल. दुसऱ्या समयांत ४८०, तिसऱ्या समयांत ४४८, चौथ्या समयांत ४१६, पांचव्या समयांत ३८४, सहाव्या समयांत ३५२, सातव्या समयांत ३२० व आठव्या समयांत २८८ मिळून एकंदर ३२००.

एका समयांत क्षरण पावणाऱ्या कर्मवर्गणेच्या समूहाला निषेक म्हणतात.

## निषेकक्षरणाचें [ कोष्टक ४३ ].

| समय | गुणहानि प्रथम | गुणहानि द्वितीय | गुणहानि तृतीय | गुणहानि चतुर्थ | गुणहानि पंचम | गुणहानि षष्ट |
|---|---|---|---|---|---|---|
| अष्टम | २८८ | १४४ | ७२ | ३६ | १८ | ९ |
| सप्तम | ३२० | १६० | ८० | ४० | २० | १० |
| षष्ठ | ३५२ | १७६ | ८८ | ४४ | २२ | ११ |
| पंचम | ३८४ | १९२ | ९६ | ४८ | २४ | १२ |
| चतुर्थ | ४१६ | २०८ | १०४ | ५२ | २६ | १३ |
| तृतीय | ४४८ | २२४ | ११२ | ५६ | २८ | १४ |
| द्वितीय | ४८० | २४० | १२० | ६० | ३० | १५ |
| प्रथम | ५१२ | २५६ | १२८ | ६४ | ३२ | १६ |
| ८ समय | ३२०० | १६०० | ८०० | ४०० | २०० | १०० |

कोष्टक २४१ पहा.

चय काढण्याची दुसरी रीत.

गुणहानिद्रव्यास गुणहानि आयामानें भागल्यास मध्यधन निघतें.

गुणहानि आयामांतून १ वजा करून त्याची निंमपट करावी.

ती निंमपट निषेकहारांतून वजा करावी. मग वजाबाकीनें मध्यधनास भागिलें म्हणजे चय निघतात जसें —

गुणहानि द्रव्य ३२०० ÷ गुणहानि आयाम ८=४०० हें मध्यधन. गुणहानि आयाम ८−१=७ निमे ३½.

निषेकहार १६−३½=१२½.

४०० मध्यधन ÷ १२½=३२ चय.

## स्थिति बंधप्रकरण समाप्त.

## "अनुभाग-बंध-प्रकरण प्रारंभ"

**गाथा** १६३–शुभप्रकृतींत मंदकषायानें अनुभाग तीव्र होईल व तीव्र कषायानें अनुभाग मंद होईल.

अशुभप्रकृतींत तीव्रकषायानें अनुभाग तीव्र व मंदकषायान अनुभाग मंद होईल. [ गाथा १३४ पहा. ]

**गाथा** १६४–शुभ प्रकृति ४२ आहेत. त्यांचा तीव्र अनुभाग उत्कृष्ट विशुद्ध परिणामवाल्यास पडेल, व अप्रशस्त [ अशुभ ] प्रकृति ८२ आहेत. त्यांचा तीव्र अनुभाग मिथ्यादृष्टि तीव्र कषायी जीवाला पडेल.

**शुभ प्रकृति** –१ सातावेदनीय; ३ तिर्यंच, मनुष्य, देवायु; १ उच्चगोत्र; २ मनुष्यद्विक; २ देवद्विक; १ पंचेंद्रिय; ५ शरीर; ३ अंगोपांग; ४ वर्णादि; १ समचतुरस्र-संस्थान; १ वज्रवृषभ नाराच संहनन; १ अगुरुलघु; १ परघात; १ उच्छ्वास; १ आतप; १ उद्योत; १ प्रशस्त विहायोगति; १ त्रस; १ बादर; १ पर्याप्त; १ प्रत्येक शरीर; १ स्थिर; १ शुभ; १ सुभग; १ सुस्वर; १ आदेय; १ यशस्कीर्ति; १ निर्माण; १ तीर्थंकर एकूण ४२.

५ शरीरें शुभ प्रकृतींत गणलीं आहेत. ५ बंधन व ५ संघात मिळून १०, शरीरांत गर्भित असल्यामुळें वेगळीं दाखविलीं नाहींत. आणि ५ वर्ण, २ गंध, ५ रस, ८ स्पर्श मिळून २० प्रकृति पैकीं ४ च प्रकृति शुभ प्रकृतींत गणिल्या आहेत,

१६ गाणिल्या नाहींत. म्हणजे १०+१६=२६ प्रकृति गर्भित होत्या त्या ४२ मध्यें मिळविल्यास ६८ शुभ प्रकृति होतील.

**अशुभ प्रकृति**—४७ घातिप्रकृति (२१ सर्वघाति २६ देशघाति) एक असाता, १ अप्रशस्तविहायोगति, १ नरकायु, १ स्थावर, १ नीचगोत्र, १ सूक्ष्म, २ नरकद्विक, २ तिर्यंचद्विक ४ एकेंद्रियादि, ५ न्यग्रोधादि संस्थान, ५ वज्रनाराचादि संहनन, ४ वर्णादि, १ उपघात, १ अपर्याप्त, १ साधारण, १ अस्थिर, १ अशुभ, १ दुर्भग, १ दुःस्वर, १ अनादेय, १ अयशस्कीर्ति, एकूण ८४ यांतून सम्यङ्मिथ्यात्व व सम्यक्त्वप्रकृति यांचा बंध होत नाहीं म्हणून त्या २ प्रकृति कमी केल्या म्हणजे ८२ प्रकृति अभेदापेक्षया होतात. त्यांत वर्णादि १६ मिळविल्या म्हणजे भेदविवक्षया ९८ होतात.

४२ पुण्यप्रकृति + ८२ पापप्रकृति = १२४.

बंधप्रकृति १२० आहेत परंतु वर्णादि ४ प्रकृति पुण्य व पापप्रकृतींत ही घातल्यामुळें ४ प्रकृति वाढल्या आहेत.

**गाथा** १६५–४२ शुभप्रकृति पैकीं आतप, उद्योत, मनुष्यायु, तिर्यंचायु, या चार प्रकृतींचा तीव्र अनुभाग विशुद्धपरिणामी मिथ्यादृष्टि जीवांस पडेल व बाकींच्या सातावेदनीय वगैरे ३८ प्रकृतींचा तीव्र अनुभाग विशुद्ध परिणामी सम्यग्दृष्टि जीवांस पडेल.

**गाथा** १६६—विशुद्ध देव नारकी असंयत सम्यग्दृष्टि अनंतानुबंधीचें विसंयोजन करील तर त्यास अनिवृत्तिकरणाच्या अंतिम समयांत २ मनुष्यद्विक, औदारिकद्विक, १ वज्रवृषभनाराचसंहनन या पांच प्रकृतींचा [ वरील ६८ प्रकृतींपैकीं तीव्र अनुभाग पडेल.

**गाथा** १६७–अपूर्व करणाच्या सहाव्या भागामध्यें तीस प्रकृतींची व्युच्छित्ति झाली तींत उपघातास सोडून २९ प्रकृति, सूक्ष्मसांपरायाच्या उच्चगोत्र, यशस्कीर्ति व सातावेदनीय या सर्व मिळून बत्तीस प्रकृति होतात.

देवायूचा तीव्र अनुभाग अप्रमत्तगुणस्थानवर्ती मुनींस पडेल. बाकींच्या बत्तीस प्रकृतींचा तीव्र अनुभाग बंध क्षपक श्रेणींतील जीवास होतो.

**गाथा** १६८–८२ अप्रशस्त+१ आतप, १ उद्योत, १ मनुष्यायु, १ तिर्यंचायु, मिळून ८६ प्रकृतींचा तीव्र अनुभाग मिथ्यादृष्टींस पडतो.

या ८६ पैकीं मिथ्यात्व गुणस्थानांत १६ प्रकृतींची बंध व्युच्छित्ति कोष्टक १ मध्यें दाखविली आहे. त्या पैकीं सूक्ष्म साधारणादि अंतिम ९ प्रकृतींचा तीव्र अनुभाग

मनुष्य व तिर्यंच यांस संक्लेश परिणामांनी पडतो व मनुष्यायु आणि तिर्यंचायु याचा तीव्र अनुभाग देव, मनुष्य व तिर्यंच यांना विशुद्ध परिणामांनीं पडतो.

एकेंद्रिय आणि स्थावर नामकर्मांचा तीव्र अनुभाग देवास [आयुष्याचे ६ महिने शिल्लक राहतात त्या अवधींत-] संक्लेश परिणामांनीं पडतो. आणि देवाचे परिणाम शुद्ध असतील तर आतपाचा तीव्र अनुभाग त्या ६ महिन्यांत पडतो.

**गाथा** १६९–उद्योत प्रकृतीचा तीव्र अनुभाग ७ व्या नरकांतील नारकी [ उपशम सम्यग्दर्शनाला सन्मुख झालेल्या मिथ्यादृष्टि ] ला विशुद्ध परिणामांनी पडतो.
सृपाटिका संहनन व तिर्यच्चद्विक याचा तीव्र अनुभाग मिथ्यादृष्टि देव वा नारकी यांना संक्लेश परिणामानीं पडतो.

बाकीच्या ८६- १८=६८ प्रकृतींचा तीव्र अनुभाग चार ही गतींतील मिथ्यादृष्टि जीवांस संक्लेश परिणामांनी पडतो.

## जघन्य अनुभाग.

**गाथा** १७०–अशुभवर्णादि ४, उपघात १, ज्ञानवरण ५, दर्शनावरण ४, अंतराय ५, निद्राप्रचला २. हास्य रति, भय, जुगुप्सा ४, पुरुषवेद १, संज्वलन ४, या तीस प्रकृतींचा जघन्य अनुभाग बंध त्या त्या प्रकृतींच्या बंध व्युच्छित्तिस्थानीं पडेल.

**गाथा** १७१–अनंतानुबंधी ४ कषाय, स्त्यानगृद्धि, प्रचला प्रचला, निद्रानिद्रा, मिथ्यात्व, या आठ प्रकृतींचा जघन्य अनुभाग बंध संयम–[ मुनींचा ] धारणाला सन्मुख झालेल्या मिथ्यादृष्टि जीवाला होतो.

चार अप्रत्याख्यानावरण कषायांचा जघन्य अनुभागबंध मुनिसंयम धारणाला सन्मुख झालेल्या चौथ्या गुणस्थानवर्ती जीवाला होतो.

चार प्रत्याख्यानावरण कषायांचा जघन्य अनुभागबंध मुनिसंयम धारणास सन्मुख झालेल्या पंचम गुणस्थानवर्ती जीवास होतो.

**गाथा** १७२–आहारकद्विकाचा जघन्य अनुभागबंध अप्रमत्तगुणस्थानवर्ती जीव संक्लेश परिणामांनी प्रमत्त गुणस्थानाच्या सन्मुख होतो तेव्हां त्यास होतो कारण आहारद्विक प्रकृति शुभ आहे.

अरति व शोक ह्या दोन प्रकृतींचा जघन्य अनुभागबंध अप्रमत्त गुणस्थानाच्या सन्मुख झालेल्या प्रमत्तगुणस्थानवर्ती विशुद्ध परिणामी जीवास होतो कारण या पापप्रकृति आहेत.

सूक्ष्मत्रय, विकलत्रय, वैक्रियिकषट्क, व चार आयु या सोळांचा जघन्य अनुभाग बंध मनुष्य व तिर्यंचासि पडेल.

**गाथा १७३**–उद्योत, औदारिकद्विक यांचा जघन्य अनुभाग बंध देव व नारकी जीवास होतो पण उद्योताचा जघन्य अनुभाग बंध देवांना संक्लेश परिणामांनीं होईल.

तिर्यंचद्विक व नीचगोत्र यांचा जघन्य अनुभाग बंध सातव्या नरकांतील जीवाला विशुद्ध परिणामांनीं होतो. स्थावर व एकेंद्रिय या प्रकृतींचा जघन्य अनुभाग देव, मनुष्य, व तिर्यंच यांना मध्यम परिणामांनीं होईल.

**गाथा १७४–१७५**–आतप प्रकृतींचा जघन्य अनुभाग भवनवासी, व्यंतर, ज्योतिषी, सौधर्म व ईशान स्वर्गांतील देव यांना संक्लेश परिणामांनीं होईल.

तीर्थंकर प्रकृतीच्या जघन्य अनुभागाचा बंध नरकास जायाला सन्मुख झालेल्या मनुष्यास चौथ्या गुणस्थानांतच होईल.

१ परघात, १ उच्छ्वास २ तैजसकार्मण, २ त्रसबादर, १ पर्याप्त, १ प्रत्येक, ४ शुभवर्णादि, १ निर्माण, १ पंचेंद्रियजाति, १ अगुरुलघु या पंधरा शुभ प्रकृतींचा जघन्य अनुभाग बंध चारही गतींतील संक्लेशी जीवांस होईल.

स्त्रीवेद व नपुंसकवेद या दोन अशुभ प्रकृतींचा जघन्य अनुभाग बंध चारही गतींतील जीवांस विशुद्ध परिणामांनीं होतो.

**गाथा १७६–१७७**–स्थिर, अस्थिर, शुभ, अशुभ, यश, अयश, साता, असाता, या आठ प्रकृतींचा जघन्य अनुभाग बंध अपरिवर्तमान मध्यम परिणामी सम्यग्दृष्टि व मिथ्यादृष्टि जीवांस होतो.

१ उच्चगोत्र, ६ संस्थान, ६ संहनन, २ प्रशस्ताप्रशस्तविहायोगति, २ मनुष्यद्विक, २ देवद्विक, १ सुभग, १ दुर्भग, १ आदेय, १ अनादेय, य तेवीस प्रकृतींचा जघन्य अनुभाग परिवर्तमान मध्यम परिणामी मिथ्यादृष्टि जीवांस होतो.

संक्लेशावस्थेंत वा विशुद्धावस्थेंत जे परिणाम कमी किंवा अधिक होत जातील, परतून पूर्वावस्थेस प्राप्त होणार नाहींत, त्या परिणामास **अपरिवर्तमान** म्हणतात.

एका अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेला गेलेले जे परिणाम फिरून पूर्वावस्थेला प्राप्त होऊं शकतात ते **परिवर्तमान परिणाम** जाणावेत. परिवर्तमान व अपरिवर्तमान परिणामांचे तीन भेद.

१ उत्तम. २ मध्यम. ३ जघन्य ( कनिष्ठ )

**गाथा १७८**–सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव बंधांत उत्कृष्ट, अनुत्कृष्ट, अजघन्य, जघन्य अनुभाग बंध कसा प्रकारें होतो.

| कोणत्या प्रकृतींचा बंध | कशा प्रकारें होतो |
|---|---|
| चारही घातिकर्मांचा अजघन्य अनुभाग बंध | सादि, अनादि, ध्रुव, अध्रुवरूप होतो. |
| वेदनीय व नामकर्मांचा अनुत्कृष्ट अनुभाग बंध | ,, ,, ,, ,, ,, |
| गोत्रकर्माचा अजघन्य व अनुत्कृष्ट अनुभाग बंध | ,, ,, ,, ,, ,, |
| चारही घातिकर्मांचा उत्कृष्ट, अनुत्कृष्ट व जघन्य अनुभाग बंध | सादि व अध्रुवरूप होतो. |
| वेदनीय व नामकर्मांचा उत्कृष्ट, अजघन्य व जघन्य अनुभाग बंध | ,, ,, ,, |
| गोत्रकर्माचा उत्कृष्ट व जघन्य अनुभाग बंध | ,, ,, ,, |
| आयुःकर्माचा उत्कृष्ट, अनुत्कृष्ट, अजघन्य, जघन्य अनुभाग बंध | ,, ,, ,, |

## मूळ प्रकृतीच्या अनुभाग बंधाचें [ कोष्टक ४१ ]

| प्रकार | ज्ञानावरण | दर्शनावरण | वेदनीय | मोहनीय | आयु | नाम | गोत्र | अंतराय | खुलासा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्कृष्ट | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २=सादि अध्रुव |
| अनुत्कृष्ट | २ | २ | ४ | २ | २ | ४ | ४ | २ | ४=सादि अनादि |
| अजघन्य | ४ | ४ | २ | ४ | २ | २ | ४ | ४ | ध्रुव व अध्रुव |
| जघन्य | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | |

### गाथा १७९-उत्तर प्रकृतींचा जघन्यादि अनुभाग बंध.

१ तैजस, १ कार्मण, १ अगुरुलघु, १ निर्माण, ४ शुभवर्णादि या आठ प्रकृति शुभ असून ध्रुव आहेत. यांचा अनुत्कृष्ट अनुभागबंध चारही प्रकारचा ( सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव ) होतो आणि उत्कृष्ट, अजघन्य व जघन्य बंध सादि व अध्रुवरूप दोन प्रकारचा होतो.

५ ज्ञानावरण, ९ दर्शनावरण ५ अंतराय, १ मिथ्यात्व, १६ कषाय, १ भय, १ जुगुप्सा, ४ अशुभवर्णादि १ उपघात या ४३ प्रकृति ध्रुव व अशुभ आहेत. यांचा अजघन्य अनुभागबंध चारही प्रकारचा होतो व उत्कृष्ट, अनुत्कृष्ट व जघन्य अनुभागबंध सादि व अध्रुवरूप दोन प्रकारचा होतो.

एकंदर प्रकृति १२०+४ वर्णादिक [ शुभाशुभांत गणना होत असल्यामुळें ]= १२४-४३+८=५१ [ वरील प्रकृति ] =७३ प्रकृति अध्रुव आहेत यांचा अनुभागबंध चारही प्रकारचा होतो व तो सादि अध्रुव असतो.

## उत्तर प्रकृतीच्या अनुभागबंधाचें [ कोष्टक ४५ ]

| प्रकार | ध्रुव ८ प्रशस्त | ध्रुव ४३ अप्रशस्त | अध्रुव ७३ | |
|---|---|---|---|---|
| उत्कृष्ट | २ | २ | २ | २ म्हणजे सादि अध्रुव |
| अनुत्कृष्ट | ४ | २ | २ | ४ ,, सादि, अनादि ध्रुव, अध्रुव, |
| अजघन्य | २ | ४ | २ | |
| जघन्य | २ | २ | २ | |

### अनुभाग शक्तीचें स्वरूप.

**गाथा १८०**—चारही घातिकर्मांचा अनुभाग लता, दारु, अस्थि व शैलरूप होतो. या अनुभागाचे दोन भेद-१ देशघाति २ सर्वघाति. लताभागाचा पूर्ण व दारुभागाचा अनंतावा भाग इतकी शक्ति देशघाति स्पर्धकांत असते व दारुभागाचा अनंतावा भाग सोडून जो भाग राहतो त्याची व अस्थिशैलाची शक्ति सर्वघातिस्पर्धकांत असते. अवधिज्ञान प्रकट असतें तेथें देशघातीचा उदय व अवधिज्ञानाचा अभाव असेल तेथें सर्वघातीचा उदय समजावा.

**गाथा १८१**—मिथ्यात्व प्रकृतीच्या स्पर्धकांत लताभागापासून दारूच्या अनंताव्या भागापर्यंत देशघातित्व असतें तें सर्व स्पर्धक सम्यक्त्व—प्रकृतिरूप जाणावेत.

दारुभागाचा अनंत बहुभाग जो शिल्लक राहिला त्याच्या अनंताव्या भागाच्या स्पर्धकाला मिश्र प्रकृति म्हणजे सम्यक्त्वमिथ्यात्व म्हणतात. यालाच जात्यंतर सर्वघाति म्हणतात.

बाकीचा उरलेला दारुभाग व अस्थिशैल सर्वभाग हा मिथ्यात्व--प्रकृतिरूप समजावा.

वरील हिशेब लक्ष्यांत येण्याकरितां आपण मिथ्यात्व प्रकृतीची अनुभागशक्ति १२० कल्पूं आणि अनंताची संख्या ४ कल्पूं व हिशेबाकरितां लताभागाची शक्ति ८ दारुभागाची शक्ति १६ अस्थिभागाची शक्ति ३२ व शैलभागाची शक्ति ६४ कल्पूं म्हणजे ८+१६+३२+६४=१२० ही मिथ्यात्वप्रकृतीची अनुभागशक्ति मानिली.

आतां या १२० पैकीं मिथ्यात्व प्रकृतींत किती भाग येतात, मिश्र प्रकृतींत किती भाग येतात व सम्यक्त्व प्रकृतींत किती भाग येतात ते पाहूं.

१ सम्यक्त्व प्रकृतींत लताभागाचे ८ + दारुभागाचा अनंतावा भाग म्हणजे १६ ÷ ४ = ४ मिळून १२ भाग.

२ मिश्रप्रकृतींत दारुभागाचे १६–४ म्हणजे १२ भाग उरले होते त्याचा अनंतावा भाग म्हणजे १२ ÷ ४ = ३ भाग.

३ मिथ्यात्वप्रकृतींत दारुभागांपैकीं ९ भाग उरले व अस्थिभागाची अनुभाग शक्ति ३२ व शैलभागाची अनुभागशक्ति ६४ मिळून १०५ एकूण १२ + ३ + १०५ = १२०

**गाथा** १८२–ज्ञानावरणाच्या प्रकृति ४ ( १ मतिज्ञानावरण, १ श्रुतज्ञानावरण, १ अवधिज्ञानावरण व १ मनःपर्ययज्ञानावरण ) व दर्शनावरणाच्या ३ [ १ चक्षु, १ अचक्षु १ अवधि ) ५ अंतराय, ४ संज्वलन, १ पुरुषवेद मिळून १७ देशघाति प्रकृतींत चार प्रकारचा अनुभाग होतो. [ १ ] शैल, अस्थि, दारु, लतारूप [ २ ] अस्थिदारुलतारूप [ ३ ] दारुलतारूप [ ४ ] लतारूप.

८ देशघाती पैकीं नोकषाय आठा ( पुरुषवेद सोडून ) मध्येंही शैल, अस्थि, दारु, लता रूप अनुभाग असतो परंतु उदय तीन प्रकारचाच होतो तो असा.

१ शैल अस्थि दारुलतारूप.
२ अस्थिदारुलतारूप.
३ दारुलतारूप.
} केवल लतारूप उदय होत नाहीं.

१ सम्यक्त्व प्रकृती [ देशघाती ] चें वर्णन मागील गाथेंत आलें आहे.

एकूण १७ + ८ + १ = २६ देशघाति.

२६ देशघाति.

१९ सर्वघाति–१ केवलज्ञानावरण, १ केवल दर्शनावरण, ५ निद्रा, १२ कषाय [ संज्वलन ४ सोडून ] या १९ प्रकृतींत शैल अस्थि व दारुचा अनंतबहुभाग अनुभाग होतो. यांचा उदय तीन प्रकारें होतो.

[ १ ] शैल अस्थि दारु रूप. [ २ ] अस्थि दारुरूप. [ ३ ] दारुरूप.

२ मिथ्यात्व व मिश्र या दोन सर्वघातीचें वर्णन मागें आलें आहे.

---

४७ याप्रमाणें २६ देशघाति व २१ सर्वघाति मिळून ४७ घाति प्रकृतीच्या अनुभागाचें स्वरूप सांगितलें आहे.

**गाथा** १८३–१८४—घाति प्रकृति पापरूपच आहेत. पण अघाति–प्रकृतींत २ भेद [ १ पुण्यरूप, १ पापरूप ] आहेत. पुण्य प्रकृतींच्या अनुभागाची ४ उदाहरणें आहेत.

१ गूळ. २ साखर. ३ खडीसाखर. ४ अमृत.

पाप प्रकृतींच्या अनुभागाचीं ४ उदाहरणें आहेत.

१ निंब. २ कांजीर. ३ विष. ४ हलाहल.

पुण्य प्रकृति ४२ आहेत. यांत जो ४ प्रकारचा अनुभाग गूळ, साखर वगैरे रूप वर दाखविला आहे त्याचा उदय ३ प्रकारांनीं होतो.

१ गूळ, साखर, खडीसाखर, अमृतरूप.

२ गूळ, साखर, खडीसाखररूप.

३ गूळसाखर–रूप.

केवळ गूळ रूप उदय येणार नाहीं.

पापप्रकृति ३७ आहेत. त्यांचा अनुभाग निंब कांजीर वगैरे ४ प्रकारचा सांगितला आहे. त्यांचा उदय ३ प्रकारांनीं होतो.

१ निंब, कांजीर, विष, हलाहल रूप.
२ निंब, कांजीर, विषरूप.
३ निंब, कांजीर रूप.
} केवळ निंबरूप उदय होत नाहीं.

विशेष:–४७ घातिप्रकृति + ७५ अघाति (एकंदर अघातिप्रकृति १०१–२६ [५ बंधन + ५ संघात + १६ वर्णादि ]= ७५; ७५ प्रकृतींत पुण्यप्रकृति ४२ जातां बाकी राहिल्या ३३ + ४ अशुभ वर्णादि = ३७ पाप प्रकृति उदयाच्या अपेक्षेनें.

## अनुभागप्रकरण समाप्त.

**गाथा** १८५, १८६, १८७–क्षेत्राचे २ भेद. १ एक क्षेत्र, २ अनेक क्षेत्र.

एक क्षेत्र—सूक्ष्म निगादी शरीरानें आकाशाचा जेवढा भाग व्यापिला जातो त्यास एक क्षेत्र म्हणतात. जीवाची अघन्य अवगाहना एक क्षेत्र मात्र असते. यांत घनांगुलाचे असंख्यातवे भागप्रमाण प्रदेश असतात.

अनेक क्षेत्र—एकक्षेत्र सोडून अवशिष्ट जो लोकाकाशाचा भाग तें अनेक क्षेत्र.

एकक्षेत्रांत जेवढें पुद्गलद्रव्य असेल तें एकक्षेत्र पुद्गलद्रव्य, व अनेक क्षेत्रांत असेल तें अनेकक्षेत्र पुद्गलद्रव्य. एका क्षेत्रांत जें पुद्गलद्रव्य असतें त्याचा अनंतांश कर्मरूप होण्यास योग्य असतो. आणि बाकीचा अंश कर्मरूप होण्यास योग्य नसतो. याचप्रमाणें अनेक क्षेत्रांतही जाणावें. १ एक क्षेत्र योग्य. २ एकक्षेत्र अयोग्य. ३ अनेक क्षेत्रयोग्य. ४ अनेक क्षेत्र अयोग्य. याप्रमाणें ४ भेद झाले. त्यांत ही सादि अनादि असे प्रत्येकाचे २ भेद आहेत म्हणजे सर्व भेद ८ झाले.

सादिपुद्गलद्रव्य— ज्या पुद्गल द्रव्यास पूर्वी कर्मत्व प्राप्त झालें म्हणजे जीवानें ज्यास कर्मरूप ग्रहण केलें व नंतर त्याची निर्जरा झाली तें सादि.

अनादि पुद्गलद्रव्य—ज्या पुद्गल द्रव्यास कधीं कर्मत्व प्राप्त झालें नाहीं म्हणजे जीवानें ज्यास कधीं ही कर्म रूप ग्रहण केलें नाहीं तें.

संपूर्ण सादि, अनादि द्रव्याचें प्रमाण काढण्याची रीतिः—

**गाथा १८८**—उत्कृष्ट समयप्रबद्ध×भूतकाल समय×सर्वजीवराशी=सर्वजीवा संबंधि सादि पुद्गल द्रव्य.

सर्व पुद्गल द्रव्यांत सादि पुद्गल द्रव्य वजा करून जें अवषेश राहील तितकें अनादि पुद्गल द्रव्य. एका समयांत उत्कृष्ट समयप्रबद्धा इतक्या पुद्गलांस कोणी जीव ग्रहण करील तर संख्यात आवली×सिद्धराशी इतक्या भूतकालीन अनंत समयांत किती पुद्गल द्रव्यांचे ग्रहण होईल असें त्रैराशिक मांडून जें उत्तर येईल तितकें पुद्गल द्रव्य एका जीवा संबंधी सादि पुद्गलद्रव्य समजावें.

**गाथा १८९**—एका क्षेत्रासंबंधि सादि द्रव्यास जिनदृष्ट अनंताचा भाग देऊन जो भागाकार येईल ती संख्या कर्मरूप होण्यास योग्य असें सादि द्रव्य समजावें. अवशिष्ट बहुभाग अयोग्य सादि द्रव्य जाणावें. त्याचप्रमाणें अनेक क्षेत्रसंबंधी सादि द्रव्यास जिनदृष्ट अनंताचा भाग देऊन जो भागाकार येईल ती संख्या कर्मरूप होण्यास योग्य असें सादिद्रव्य समजावें. अवशिष्ट बहुभाग अयोग्य सादि जाणावें.

**गाथा १९०**—एकसमय प्रबद्ध कर्मवर्गणा कर्मरूप होण्यायोग्य पुद्गल परमाणूंस हर समयास जीव ग्रहण करितो. त्या समयप्रबद्धांत कर्मरूप होण्यायोग्य सादि द्रव्य परमाणु असतील किंवा योग्य अनादि द्रव्य किंवा उभय ( सादि, अनादिमिश्रित द्रव्य असेल.

एक क्षेत्रस्थित योग्य द्रव्य, एक क्षेत्रस्थित अयोग्य द्रव्य, अनेक क्षेत्रस्थित योग्य द्रव्य, अनेक क्षेत्रस्थित अयोग्य द्रव्य यांचें जें प्रमाण असेल त्यांतून त्या त्या क्षेत्राचें सादिद्रव्य वजा करून जें द्रव्य राहील तें अनुक्रमानें त्या त्या क्षेत्राचें अनादि द्रव्य समजावें.

**गाथा १९१**—जीव एका समयांत जितकी कर्मवर्गणा ग्रहण करतो त्यास **समय प्रबद्ध** म्हणतात. एका समयप्रबद्धांत सिद्धराशीच्या अनंताव्या भागा इतकी किंवा अभव्य राशीच्या अनंतपट वर्गणा असते. या कर्मवर्गणेंत हलका, भारी, मृदु, कठोर हे चार स्पर्श नसतात. बाकीचे चार स्पर्श, सर्व रस व सर्व वर्ण व सर्व गंध असतात.

**गाथा १९२**—एका समयप्रबद्धांत जितकी कर्मवर्गणा आली असेल तिची वांटणी त्यावेळीं बंध पावणाऱ्या प्रकृतींत होऊन जाते.

१ ते ७ गुणस्थानापर्यंत आठही कर्मांचा बंध होतो. ८ व ९ गुणस्थानांत आयु सोडून सात कर्मांचा बंध होतो. १० व्या गुणस्थानांत आयु व मोहनीय सोडून बाकीच्या ६ कर्मांचा बंध होतो. ११ ते १३ मध्यें केवळ एका वेदनीयचाच बंध होतो.

मिथ्यात्व गुणस्थानांत चारही आयूंचा, सासादनांत नरक सोडून तीन आयूंचा, असंयतांत मनुष्य व देव आयूंचा, ५ ते ७ गुणस्थानांत देवायूचाच बंध होतो पुढें आयुबंध होत नाहीं. कर्मवर्गणांची वांटणी खालीं लिहिल्याप्रमाणें होतो.

आयुकर्मांत सर्वांहून कमी भाग वाटून जातो त्याहून अधिक नाम गोत्रांत वाटून जातो पण दोहोंत समान जातो.

त्याहून अधिक ज्ञानावरण दर्शनावरण व अंतरायांत वाटून जातो परंतु तिन्हींतही समान जातो.

त्याहून ज्यास्त मोहनीय कर्मांत वाटून जातो.

त्याहून अधिक वेदनीय कर्मांत वाटून जातो.

**गाथा १९३**--वेदनीयकर्म सुख दुःखाला कारण आहे आणि तें होऊं लागलें म्हणजे त्यांची निर्जरा फार होते म्हणून त्यांचा बंध ही ज्यास्त होतो.

**गाथा १९४, ९५**--कर्मांच्या वांटणीचा हिशेब.

वेदनीय कर्माला सोडून बाकी कर्मांच्या स्थित्यनुसार ( गाथा १२७-२८ मध्यें प्रत्येक कर्माची स्थिति दाखविली आहे ) कर्मांची वाटणी होते. जसें मोहनीय कर्माची स्थिति ७० कोड्ाकोडी सागर आहे आणि ज्ञानावरणाची ३० कोडाकोडीसागर आहे तर याप्रमाणेंच कर्मपरमाणूंची वाटणी होईल. सात कर्मांत ज्यांची स्थिति ज्यास्त त्याच्यांत कर्मपरमाणूंची वाटणी ज्यास्त व ज्यांची स्थिति कमी त्यांत वाटणी कमी परंतु वेदनीयामध्यें स्थिति कमी असून वाटणी सर्वांहून अधिक होते.

आठ कर्मांच्या वाटणीचा नियम असा आहे कीं, आवलीच्या असंख्यातान्या भागानें कर्मपरमाणूंच्या संख्येला भागून जो भागाकार येईल तो वेगळा काढून बहुभागाची वाटणी आठही कर्मांत सारख्या प्रमाणानें करावी.

जो एकभाग वेगळा काढून ठेवला त्याला पुनः आवलीच्या असंख्यातान्या भागानें भागून जो भागाकार येईल तो वेगळा ठेवून बहुभाग वेदनीयाच्या वाटणीला जो सामान भाग आला होता त्यांत मिळवावा म्हणजे वेदनीयाचा वाटा निघेल. तो वेगळा ठेवलेला जो एक भाग [ भागाकार ] त्यास पुनः आवलीच्या असंख्यातान्या भागानें भागून जो भागाकार येईल तो वेगळा ठेवून बहुभाग मोहनीयाच्या वांटणीला जो समान भाग आला त्यांत मिळवावा म्हणजे तो मोहनीयाचा वाटा निघेल.

पुनः जो वेगळा ठेवलेला एक भाग राहिला त्यास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून जो भागाकार येईल तो एक भाग वेगळा ठेवून बहुभागाची वांटणी ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय या तिहींत सारखी सारखी करावी व ती त्या कर्माच्या वांटणीस आलेल्या समान भागांत मिळवावी म्हणजे ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय यांच्या वांटणीस आलेल्या कर्मपरमाणूंची संख्या [ सारखी ] निघेल.

पुनः त्या वेगळ्या ठेवलेल्या एकभागास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून जो भागाकार येईल तो वेगळा ठेवून बाकीच्या बहुभागाचे दोन भाग करून ते नाम व गोत्रकर्माच्या वांटणीस आलेल्या समान भागांत मिळवावे म्हणजे नाम, गोत्रकर्माच्या वाट्यांस आलेली कर्मपरमाणूंची संख्या ( दोघांचीही सारखीच ) निघेल. आणि तो वेगळा ठेवलेला भाग आयूच्या वाटणीस आलेल्या समान भागांत मिळवावा म्हणजे आयुःकर्माच्या परमाणूंची संख्या निघेल.

उदाहरणार्थ आपण एका समय प्रबद्धाची संख्या ८१०० कल्पूं आणि आवली या असंख्याताव्या भागाची संख्या ९ कल्पूं म्हणजे ८१०० ÷ ९=९०० ही संख्या वेगळी ठेवून बाकी जी ७२०० राहिली ती आठही कर्मांत समान प्रमाणानें विभागल्यास प्रत्येकाच्या वांट्यास ९०० ही संख्या येईल.

## कर्मपरमाणूंच्या वाटणीचें [ कोष्टक ४६ ]

| वेद-नीय | मोहनीय | ज्ञाना-वरण | दर्शना-वरण | अंतराय | नाम | गोत्र | आयु | बेरीज |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ९०० | ९०० | ९०० | ९०० | ९०० | ९०० | ९०० | ९०० | ७२०० |
| ८०० | ८०० | ८०० | ८०० | ८०० | ८०० | ८०० | १०० | ९०० |
| | ९ | २४३ | २४३ | २४३ | १४५८ | १४५८ | ७२९ | |
| १७०० | ९८८ $\frac{८}{९}$ | ९०३ $\frac{७१}{२४३}$ | ९०३ $\frac{७१}{२४३}$ | ९०३ $\frac{७१}{२४३}$ | ९०० $\frac{८००}{१४५८}$ | ९०० $\frac{८००}{१४५८}$ | ९०० $\frac{१००}{७२९}$ | ८१०० |

बाकी ९०० वेगळे ठेविले होते त्यास ९ नीं भागल्यास भागाकार १०० येईल तो वेगळा ठेवून ८०० बहुभाग राहिला तो वेदनीयांत मिळवावा. म्हणजे वेदनीयाच्या वांट्यास १७०० कर्मपरमाणु येतील.

१०० वेगळे ठेविले होते त्यास ९ नीं भागल्यास $\frac{१००}{९}$ भागाकार येईल तो वेगळा

ठेवून १०० तून वजा केल्यास $\frac{१००}{१}-\frac{१००}{९}=\frac{८००}{९}$ हा बहुभाग राहील तो मोहनीयात मिळवावा म्हणजे $८८\frac{८}{९}+९००=९८८\frac{८}{९}$ ही संख्या मोहनीयाच्या वाट्यास आली.

वेगळी ठेविलेली भागाकाराची संख्या $\frac{१००}{९}$ यास ९ नीं भागल्यास भागाकार $\frac{१००}{८१}$ येईल. तो वेगळा ठेवून $\frac{१००}{९}$ तून वजा करून म्हणजे $\frac{१००}{९}-\frac{१००}{८१}=\frac{८००}{८१}$ याचे समान तीन भाग करून ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय यांस वाटून दिले म्हणजे प्रत्येकीं $\frac{८००}{२४३}$ भाग येईल. तो ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतराय यांच्या वाट्यास समान भाग९००नऊशें आला होता तो त्यांत मिळविल्यास प्रत्येकीं $९००+\frac{८००}{२४३}=९०३\frac{७१}{२४३}$ येतील.

वेगळा ठेविलेला भाग $\frac{१००}{८१}$ यास ९ नीं भागल्यास भागाकार $\frac{१००}{७२९}$ येईल तो वेगळा ठेवून $\frac{१००}{८१}$ मधून वजा केल्यास $\frac{१००}{८१}-\frac{१००}{७२९}=\frac{८००}{७२९}$ इतका भाग गोत्र व नाम कर्मांच्या वाट्यास मिळून आल्यामुळें प्रत्येकीं निम्मा निम्मा भाग म्हणजे $\frac{८००}{७२९}\div२=\frac{८००}{१४५८}$ इतका भाग नाम कर्माच्या वांट्यास व इतकाच [$\frac{८००}{१४५८}$] भाग गोत्रकर्माच्या वांट्यास आला. तो पूर्वीच्या समान भागाच्या वांटणींत आलेल्या ९०० त मिळविला म्हणजे $९००\frac{८००}{१४५८}$ नामकर्माच्या वांट्यास व तितकाच भाग गोत्रकर्माच्या वाट्यास येईल.

आतां फक्त एक आयुकर्म शिलक राहिले. त्याच्या वांट्यास वेगळी काढून ठेवलेली उरलेली संख्या $\frac{१००}{७२९}$ येईल ती आणि पूर्वीची समान भागानुसार आलेली संख्या ९०० मिळून $९००\frac{१००}{७२९}$ ही आयुकर्माच्या वाट्यास कर्मपरमाणूंची संख्या येईल.

## उत्तरप्रकृतींच्या वांटणीचा नियम.

**गाथा १९६**–मोहनीय, ज्ञानावरण व दर्शनावरण या तिहींत हीनक्रमानें वाटणी होईल. जसें—ज्ञानावरणाचा बंध झाल्यास मति, श्रुत, अवधि, मनःपर्यय व केवल अशा पांच ठिकाणीं त्यांची वाटणी होईल. त्यांत मति–ज्ञानावरणाच्या वाटयास जितके परमाणु येतील त्याहून कमी श्रुतज्ञानावरणाच्या वाटयास, त्याहून कमी अवधि ज्ञानावरणास, याप्रमाणें क्रमाक्रमानें कमी कमी वांटणी होत जाईल.

याच्या उलट नामकर्म व अंतरायकर्म यांचा क्रम आहे. म्हणजे अधिक क्रम आहे जसें:—दानांतराय कर्मांत जितके परमाणु येतील त्याहून लाभांतरायांत ज्यास्त, त्याहून भोगांतरायांत ज्यास्त याप्रमाणें अधिक क्रम जाणावा.

वेदनीय, गोत्र, आयु, यांच्या उत्तर प्रकृतींत वाटणी होत नाहीं कारण या प्रकृतींत एका समयांत एकाच उत्तर प्रकृतींचा बंध होतो. साताचा बंध झाल्यास असाताचा बंध होत नाहीं. गोत्रकर्मांतही उच्च किंवा नीचगोत्राचाच बंध होईल म्हणून उत्तर प्रकृतींत वाटणी नाहीं. त्याचप्रमाणें आयु कर्मांचा बंध ही एक आयुचाच होतो. ज्यास्तींचा होत नाहीं. म्हणून वाटणी ही होत नाहीं.

**गाथा १९७**– " देशघाति व सर्वघाति प्रकृतींच्या वाटणीचा नियम "

ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय या मूळ प्रकृतींचें जें द्रव्य असेल त्याला यथायोग्य अनंतानें भागून जो भागाकार येईल तितकें द्रव्य सर्वघातींचें समजावें. व बाकीचें देशघातींचें.

देशघाति प्रकृतींतही सर्वघाति द्रव्य असतें. हें सर्वघाति द्रव्य त्या अनंताच्या भागांतील सर्वघाति द्रव्यांतूनच वाटून येतें.

**गाथा १९८**–देशघातींत सर्वघातींच्या कितीं अंश असतो तें या गाथेंत दाखविलें आहे. याचा विशेष करण्याकरितां गाथा १६०, १६२ पहावी. देशघाति प्रकृतींचें सर्वघातिसहित एकंदर द्रव्य ३१०० मानिलें. व स्थिति ४० समयाची मानिली. गुणहानि आयाम ८ समय मानिले तर नानागुणहानि ५ होईल. २×२×२×२×२=३२ अन्योन्याभ्यस्तराशी आली. तींतून १ वजा करावा म्हणजे ३१ राहिली. त्यानें ३१०० ला भागिलें म्हणजे १०० ही अंतिमगुणहानि होईल. म्हणजे ५ गुणहानि खालीं लिहिल्याप्रमाणें होतील. १६००, ८००, ४००, २००, १०० = ३१०० यांत पहिल्या गुणहानीचें द्रव्य १६०० लताभाग रूप व शेवटचें १०० हें शैल–भाग–रूप आहे. दारुभागाचा अनंतावा भाग १६०० तोंत मिळविला म्हणजे जें द्रव्य येईल तें देशघाति समजून बाकी सर्वघाति समजावें.

**गाथा १९९**–गाथा १९७ मध्यें सांगितल्याप्रमाणें सर्व द्रव्यास अनंतानें भागून जें सर्वघाति द्रव्य निघेल त्याची वाटणी देशघाति व सर्वघाति–प्रकृतींत हीन–क्रमानें होते व अनंत बहुभाग देशघाति द्रव्याची वांटणी सर्वघातींत होत नाहीं देश घातींतच होते.

**गाथा २००, २०१**–उत्तर प्रकृतींच्या वाटणीचा नियम गाथा १९६ मध्यें सांगितला आहे त्याचप्रमाणें वाटणी होईल.

ज्ञानावरण कर्माचें जेवढें द्रव्य असेल त्यास अनंतानें भागून भागाकार येईल तें सर्वघाति आणि बाकीचें देशघाति. ( गाथा १९७ पहा. ) सर्वघातीचें जेवढें द्रव्य असेल त्यास ज्ञानावरणादि पांच प्रकृतींत वाटून द्यावें. [ गाथा १९४, १९५ ] देश-घाति द्रव्यास ४ देशघाति प्रकृतींतच वाटावें. जसें—

ज्ञानावरणाचें द्रव्य ४५००० मानिलें. अनंताची संख्या ५ मानली तर ४५००० ÷ ५=९,००० द्रव्य सर्वघातीचें. ४५०००–९,०००,= ३६००० द्रव्य देश घातीचें. सर्वघाति द्रव्य ९,००० आहे त्याची वांटणी ५ प्रकृतींत करावयाची आहे.

## ज्ञानावरण कर्माच्या सर्वघाति ९०००द्रव्याची वांटणी [कोष्टक ४७]

| मतिज्ञानावरण | श्रुतज्ञानावरण | अवधिज्ञानावरण | मनःपर्यय-ज्ञानावरण | केवल ज्ञानावरण | |
|---|---|---|---|---|---|
| १२०० + | १२०० | १२०० | १२०० | १२०० | =६००० |
| २००० | २०००<br>३ | २०००<br>९ | २०००<br>२७ | १०००<br>२७ | =३००० |
| ३२०० | १८६६ २/३ | १४२२ २/९ | १२७४ २/२७ | १२३७ १/२७ | ९,००० |

आवलीचा असंख्यातावा भाग ३ मानिला म्हणून ९,००० ÷ ३ = ३०००, ९००० – ३००० = ६००० हें द्रव्य पांच ज्ञानावरणांत समान वाटावें म्हणजे प्रत्येकीं १२००, एक भाग ३००० ÷ ३ = $\frac{३०००}{३}$

$\frac{३०००}{१} - \frac{३०००}{३} = २०००$ मति ज्ञानावरणांत.

$\frac{३०००}{३} \div ३ = \frac{३०००}{९}$

$$\frac{३०००}{३} - \frac{३०००}{९} = \frac{२०००}{३}$$ श्रुतज्ञानावरणास.

$$\frac{३०००}{९} \div ३ = \frac{३०००}{२७}$$

$$\frac{३०००}{९} - \frac{३०००}{२७} = \frac{२०००}{९}$$ अवधिज्ञानावरणास.

$$\frac{३०००}{२७} \div ३ = \frac{३०००}{८१}$$

$$\frac{३०००}{२७} - \frac{३०००}{८१} = \frac{२०००}{२७}$$ मन:पर्ययज्ञानावरणास.

$\frac{३०००}{८१}$ हा भाग उरला तो केवलज्ञानावरणास = $\frac{१०००}{२७}$

याप्रमाणें सर्वघाति द्रव्याची वांटणी समजावी.

आतां देशघाति द्रव्य ३६००० ची वाटणी मति, श्रुत, अवधि, मन:पर्यय ज्ञानावरण या चार देशघातींत कशा प्रकारें होईल तें दाखविलें जातें.

३६००० ÷ ३ [ आवलीचा असंख्यातावा भाग ] = १२०००

३६०००—१२००० = २४००० बहुभाग

२४००० ÷ ४ मति, श्रुत, अवधि, मन:पर्यतज्ञानावरण= ६००० प्रत्येकीं

३६००० पैकीं प्रत्येकीं ६००० वाटून गेले म्हणजे २४००० द्रव्य गेलें बाकी १२००० शिल्लक उरलें त्याची वांटणी पुढील कोष्टकांत दाखविली जाते.

## देशघाति-द्रव्याची वाटणी ( कोष्टक ४८ )

| मति ज्ञानावरण | श्रुत ज्ञानावरण | अवधि ज्ञानावरण | मन:पर्यत ज्ञानावरण | |
|---|---|---|---|---|
| ६००० | ६००० | ६००० | ६००० | = २४००० |
| ८००० | $\frac{८०००}{३}$ | $\frac{८०००}{९}$ | $\frac{४०००}{९}$ | = १२००० |
| १४००० | ८६६६ $\frac{२}{३}$ | ६८८८ $\frac{८}{९}$ | ६४४४ $\frac{४}{९}$ | = ३६००० |

१२००० ÷ ३ = ४०००

१२००० − ४०००  =  ८००० मतिज्ञानावरणास जातील.

$\text{४०००} \div \text{३} = \frac{\text{४०००}}{\text{३}}$

$\frac{\text{४०००}}{\text{१}} - \frac{\text{४०००}}{\text{३}} = \frac{\text{८०००}}{\text{३}}$ श्रुत ज्ञानावरणास जातील.

$\frac{\text{४०००}}{\text{३}} \div \text{३} = \frac{\text{४०००}}{\text{९}}$

$\frac{\text{४०००}}{\text{३}} - \frac{\text{४०००}}{\text{९}} = \frac{\text{८०००}}{\text{९}}$ अवधिज्ञानावरणास जातील.

बाकी राहिलेले $= \frac{\text{४०००}}{\text{९}}$ मन:पर्यय ज्ञानावरणास.

याप्रमाणें ४५००० कल्पित द्रव्याची वाटणी सर्वघाति व देशघाति ज्ञानावरण कर्माच्या पांच उत्तर प्रकृतींत खालीं लिहिल्याप्रमाणें होईल.

## ४७ व ४८ व्या कोष्टकाच्या बेरजेचें ( कोष्टक ४९ )

| प्रकृति | मतिज्ञाना. | श्रुतज्ञानावरण | अवधिज्ञाना. | मन:पर्ययज्ञा. | केवलज्ञाना. | बेरीज. |
|---|---|---|---|---|---|---|
| सर्वघाति | ३२०० | १८६६ $\frac{\text{२}}{\text{३}}$ | १४२२ $\frac{\text{२}}{\text{९}}$ | १२७४ $\frac{\text{२}}{\text{२७}}$ | १२३७ $\frac{\text{१}}{\text{२७}}$ | ९००० |
| देशघाति | १४००० | ८६६६ $\frac{\text{२}}{\text{३}}$ | ६८८८ $\frac{\text{८}}{\text{९}}$ | ६४४४ $\frac{\text{४}}{\text{९}}$ | ० | ३६००० |
| एकूण. | १७२०० | १०५३३ $\frac{\text{१}}{\text{३}}$ | ८३११ $\frac{\text{१}}{\text{९}}$ | ७७१८ $\frac{\text{१४}}{\text{२७}}$ | १२३७ $\frac{\text{१}}{\text{२७}}$ | ४५००० |

याचप्रमाण दर्शनावरणाच्या ९ प्रकृतिमध्यें देशघाति, सर्वघातींची वांटणी होईल. त्याचा क्रम:—

१ स्त्यानगृद्धि. २ निद्रानिद्रा. ३ प्रचला प्रचला. ४ निद्रा. ५ प्रचला. ६ चक्षुर्दर्शनावरण. ७ अचक्षुर्दर्शनावरण. ८ अवधिदर्शनावरण. ९ केवलदर्शनावरण. यांत पांच निद्रा व केवलदर्शनावरण सर्वघाति आहेत. व बाकी प्रकृति देशघाति आहेत.

अंतराय कर्माच्या ५ प्रकृति देशघाति आहेत. त्यांत अधिक क्रमानें कर्मपरमाणूंची वांटणी होईल. ज्यास्ती परमाणु शेवटच्या प्रकृतीस म्हणजे वीर्यांतराय कर्माच्या वांटणीस येतील. त्याहून कमी उपभोगांतरायास, त्यांहून कमी भोगांतरायास, त्यांहून कमी लाभांतरायास, व सर्वांहून कमी दानांतरायास येतील.

**गाथा** २०२–मोहनीय कर्मांत मिथ्यात्व, अनंतानुबंधि लोभ, माया, क्रोध, मान. संज्वलन लोभ, माया, क्रोध, मान. प्रत्याख्यानलोभ, माया, क्रोध मान. अप्रत्याख्यान लोभ, माया, क्रोध, मान या १७ प्रकृतींत हीनक्रमानें वांटणी होईल. नऊ नोकषाया पैकी एकदम ५ नोकषायांचा बंध होतो. त्यांचा अनुक्रम वेदत्रयांपैकीं एक, रति अरतिपैकीं एक, हास्य शोकांतून एक, भय एक, जुगुप्सा एक असा राहील.

## मोहनीयकर्माची वांटणी

**गाथा** २०३–मोहनीय कर्माचें जितकें द्रव्य असेल त्यास अनंताचा भाग देऊन भागाकार येईल तें सर्वघातिद्रव्य समजावें. आणि बहुभाग देशघाति समजावें. सर्व घाति द्रव्यास मागील १७ प्रकृतींत वांटण्याचा नियम खालीं लिहिल्या प्रमाणें–

सर्वघाति द्रव्यास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून भागाकार येईल तो वेगळा ठेवावा. आणि बाकीचा बहुभाग १७ ठिकाणी यथाक्रम ( गाथा २०२ मध्यें जो क्रम दिला आहेत तदनुरूप ) सारख्या प्रमाणांत वाटावा व एक भाग ( भागाकार ) वेगळा ठेवला होता त्यास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून भागाकार येईल तो एक भाग वेगळा ठेवावा आणि बहुभाग मिथ्यात्व प्रकृतींस वाटून द्यावा. पुनः जो एक भाग राहिला त्यांस आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून एक भाग वेगळा ठेवावा आणि बहुभाग अनंतानुबंधि लोभ प्रकृतीस वाटून द्यावा. याप्रमाणें १६ प्रकृतींत वांटणी होऊन जो भाग उरेल तो १७ व्या अप्रत्याख्यान मानप्रकृतीस द्यावा. हे वाटून दिलेले भाग आणि सारख्या प्रमाणांत वांटून दिलेलें द्रव्य यांची बेरीज करावी म्हणजे प्रत्येक प्रकृतीच्या वांटणीस किती सर्वघातिद्रव्य आलें तें समजेल. आतां देशघाति द्रव्य उरलें तें या १७ पैकीं ४ संज्वलन प्रकृतींस [त्या देशघाति असल्यामुळें] व ९ नोकषाय प्रकृतींस [ त्याही निवळ देशघाति असल्यामुळें ] कसें वाटावें तें दाखविलें जातें.

देशघाति द्रव्यास आवलीच्या असंख्याताव्या भागांनीं भागून जो एक भाग [ भागाकार ] येईल तो संज्वलन ४ कषायांस वांटून देण्याकरितां ठेवून द्यावा. व बहुभाग उरला त्यापैकीं निम्मा भाग संज्वलन ४ कषायांस देऊन बाकीचा निम्माभाग नोकषयांस द्यावा,

४ संज्वलन कषायाच्या वांटणीस जें एकंदर द्रव्य आलें त्याच्या बेरजेस आवलीच्या असंख्याताच्या भागानें भागून एक भाग वेगळा ठेवावा. व बहुभागाचे ४ समान भाग करून संज्वलन लोभ, माया, क्रोध, मान, यांस वाटून द्यावे. बाकीचा एक भाग उरला त्यास आवलीच्या असंख्याताच्या भागानें भागून एक भाग वेगळा काढून ठेवावा. व बहुभाग संज्वलन लोभास द्यावा. याप्रमाणें पूर्ववत् वांटणी करावी. सर्वघातिद्रव्याच्या वांटणींत जें द्रव्य संज्वलनाच्या वाटणीस आलें व जें देशघातीच्या वांटणींत संज्वलनाच्या वांटणीस आलें त्या दोहींची बेरीज दिली म्हणजे संज्वलनाच्या वांटणीचें सर्व द्रव्य निघेल.

आतां नोकषायाच्या वांटणीस जें द्रव्य आलें त्यांची वाटणी नोकषायाच्या पांच प्रकृतींत करावी. त्याची रीत ही पूर्वीप्रमाणें आवलीच्या असंख्याताच्या भागानें भागून एकभाग वेगळा ठेवावा आणि बहुभागाचे पांच समान भाग करून एक एकभाग पांच ठिकाणीं [ वेदत्रायांपैकीं एक वेद, रति अरतिपैकीं एक, हास्यशोकपैकीं एक, भय एक, जुगुप्सा एक ] वाटून द्यावा. बाकीचा एक भाग उरला त्यास पुनः आवलीच्या असंख्याताच्या भागानें भागून बहुभाग क्रमानें एकेका नोकषायास द्यावा, अंतिम एक भाग जुगुप्सा कषायास द्यावा. याप्रमाणें नोकषायांची वाटणी करून दिली म्हणजे मोहनीयाची वांटणी संपली.

**गाथा** २०४–" नोकषायांपैकीं पांच प्रकृतींचा युगपत् बंध कोणत्या कोणत्या गुणस्थानांत होतो तें सांगतात. "

१ पुरुषवेद, रति, हास्य, भय, जुगुप्सा यांचा बंध पहिल्यापासून आठव्या गुणस्थानापर्यंत होतो.

२ पुरुषवेद अरति शोक, भय, जुगुप्सा यांचा बंध पहिल्यापासून सहाव्या गुणस्थानापर्यंत होतो.

३ स्त्रीवेद, रति, हास्य, भय, जुगुप्सा यांचा बंध १ व २ या दोन गुणस्थानांत होतो.

४ स्त्रीवेद, अरति, शोक, भय, जुगुप्सा यांचाही बंध १–२ गुणस्थानांत होतो.

५ नपुंसकवेद, रति, हास्य, भय, जुगुप्सा यांचा बंध पहिल्या गुणस्थानांतच होतो.

६ नपुंसकवेद, अरति, शोक, भय, जुगुप्सा यांचा ही बंध पहिल्याच गुणस्थानांत होतो.

७ पुरुष वेदा [ बाकीचे आठ नोकषाय सोडून ] याचा बंध नवव्या गुणस्थानांतील सवेद भागापर्यंत होतो

ज्या नोकषायाचा बंध ज्या गुणस्थानांत सांगितला आहे. त्या नोकषायांना त्या त्या गुणस्थानांत पूर्वी सांगितल्या रीतिप्रमाणें कर्म परमाणूंची वाटणी मिळेल.

संज्वलन चार कषायांचा युगपत् बंध १ल्या गुणस्थानापासून ९व्या गुणस्थानाच्या क्रोध बंध भागापर्यंत होतो, व क्रोध सोडून बाकी तिहींचा बंध मान बंध भागापर्यंत, व माया लोभाचा बंध माया बंध भागापर्यंत, पुढें केवळ लोभाचाच बंध होईल. [ ९ व्या गुणस्थानांतच. ]

**गाथा** २०५-" नोकषायांतील कोणत्या नोकषायाचा बंध [निरंतर] किती वेळपर्यंत होतो तें सांगतात.

पुरुषवेदाचा बंध एक अंतर्मुहूर्तपर्यंत निरंतर होत राहील. हा अंतर्मुहूर्त संख्यात आवली × संख्यात इतका आहे.

स्त्रीवेदाचा काल पुरुष वेदाच्या कालाहून × संख्यात पट आहे.

हास्य व रतीचा काल स्त्री वेदाच्या कालाहून संख्यातपट आहे.

अरति शोकाचा काल हास्यरतीच्या कालाहून संख्यात पट आहे.

नपुंसक वेदाचा काल अरति शोकाहून कांहीं अधिक आहे.

आतां उदाहरणानें स्पष्ट करूं.

संख्यात आवलीची संख्या ५ मानूं व संख्यातची संख्या २ कल्पूं. या कल्पनेप्रमाणें पुरुषवेदाचा काल ५×२=१० होईल. १०×२=२० स्त्रीवेदाचा काल हास्यरतिमध्यें जी संख्यात पट सांगितली आहे ती संख्यात पट वेगळी आहे. पुरुष वेद व स्त्री वेदाच्या संख्याताची संख्या २ मानिली आहे. हास्यरतीच्या संख्यातची संख्या ४ मानावी म्हणजे स्त्रीवेदाचा काल २०×४=८० हा काल हास्यरतीचा होईल.

हास्यरतीचा काल ८०×२=१६० हा अरति शोकाचा काल. याहून नपुंसक वेदाचा काल कांहीं अधिक आहे.

संख्यात आवलीची संख्या ५ मानिली त्याच्या ३२ पट काल अरति शोकाचा झाला म्हणजे ५×३२=१६०

अरति शोकाचा काल ३२ पट आला याहून कांहीं अधिक म्हणजे ४२ पट आपण कल्पिल्यास ५×४२=२१० हा काल नपुंसकवेदाचा ठरेल.

| | |
|---|---|
| पुरुषवेदाचा काल | १० |
| स्त्रीवेदाचा काल | २० |
| नपुंसक वेदाचा काल | २१० |
| | २४० |

तिन्ही वेदांच्या कर्मपरमाणूंची संख्या ७२०० मानिली तर प्रत्येक वेदाची संख्या कशी काढावी या करितां हा वरील काल उपयोगीं पडेल. त्रैराशिक मांडून प्रत्येक वेदाच्या परमाणूंची संख्या काढतां येईल. जसें—

| कालांत | कालांत | परमाणु | पुंवेदाचे वाटणीस परमाणु. |
|---|---|---|---|
| २४० : | १० : : | ७२०० = | ३०० |
| २०० : | २० : : | ७२०० = | ६०० स्त्रीवेदाचे ,, ,, |
| २४० : | २१० : : | ७२०० = | ६३०० नपुंसकवेदाचे ,, ,, |
| | | | ७२०० |

याचप्रमाणें हास्यरति वगैरे नोकषायांचें द्रव्य काढतां येईल.

**गाथा २०६**—नाम—कर्माच्या जितक्या प्रकृतींचा बंध एके वेळीं एका जीवास होतो त्यांची वाटणी अधिकक्रमानें होईल, हीनक्रमानें होणार नाहीं. नामकर्माच्या किती किती प्रकृतींचा बंध एके वेळेस होतो म्हणाल तर २३, २५, २६, २८, २९ ३०, ३१, १ याप्रमाणें एक एक गटांच्या प्रकृति असल्यामुळें ८ बंधस्थानें होतात. २३ प्रकृतींच्या गटांत खालील प्रकृति येतील.

१ तिर्यंचगति. १ एकेंद्रिय जाति. ३ औदारिक, तैजस, कार्माण. १ हुंडकसंस्थान. १ वर्ण. १ गंध. १ रस. १ स्पर्श. १ तिर्यंचगत्यानुपूर्व्य. १ अगुरुलघु. १ उपघात. १ स्थावर. १ सूक्ष्म. १ अपर्याप्त. १ साधारण. १ अस्थिर. १ अशुभ. १ दुर्भग. १ अनादेय. १ अयशस्कीर्ति. १ निर्माण. या २३ प्रकृतींचा युगपत् बंध मनुष्य किंवा तिर्यंच मिथ्यादृष्टींना होतो.

नामकर्माचें जितकें द्रव्य असेल त्याची वांटणी २३च्या ऐवजीं २१ ठिकाणीं करावी, कारण शरीराच्या औदारिक, तैजस, कार्मण अशा तीन प्रकृतींस एक पिंड मानिलें आहे.

सर्व द्रव्यास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून बहु भाग येईल. तो २१ प्रकृतींस समान वांटून द्यावा. एक भाग उरेल त्यास आवलीच्या असंख्याताव्या भागानें भागून बहुभाग शेवटील निर्माण प्रकृतीस द्यावा. याप्रमाणें करून शेवटील भाग तिर्यंचगतीस द्यावा.

औदारिक, तैजस, व कार्मण प्रकृतीचें द्रव्य असेल त्याची वाटणहि वरीलप्रमाणें उलट क्रमानेंच करावी म्हणजे पहिला बहुभाग कार्मण प्रकृतीस द्यावा व पुढें वरीलप्रमाणें २३ प्रकृतींच्या बंधस्थानांची वाटणी सांगितली त्याचप्रमाणें बाकीच्या बंधस्थानांची वाटणी करावी.

**गाथा २०७—प्रदेशबंधांत साद्यादि चार प्रकारच्या बंधाचें वर्णन.**

ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, नाम, गोत्र, अंतराय या ६ प्रकृतींचा

अनुत्कृष्ट प्रदेशबंध सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव, अशा चार ही प्रकारचा होतो. परंतु यांचा उत्कृष्ट, अजघन्य, जघन्य, प्रदेशबंध सादि आणि अध्रुव अशा दोन प्रकारचाच होतो. आणि मोहनीय व आयु यांचा उत्कृष्टादि चाऱ्ही प्रकारचा बंध सादि, अध्रुव असा दोन प्रकारचाच होतो.

## मूळप्रकृतींच्या प्रदेशबंधांत साद्यादि चार प्रकारच्या बंधाचें
## [ कोष्टक नं. ५० ]

| ४ भेद. | ज्ञा. | दर्श. | वेद. | मोह. | आयु. | नाम. | गोत्र. | अंतराय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उत्कृष्ट | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| अनुत्कृष्ट | ४ | ४ | ४ | २ | २ | ४ | ४ | ४ |
| अजघन्य | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |
| जघन्य | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ |

नोटः—२ म्हणजे सादि, अध्रुव व ४ म्हणजे सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव.

**गाथा २०८–२०९**—उत्तर प्रकृतीमध्यें सादि वगैरे प्रदेश बंधांचें वर्णनः—५ ज्ञानावरण, ६ दर्शनावरण ( निद्रा, प्रचला, चक्षु, अचक्षु, अवधि, केवलदर्शनावरण. ) ५ अंतराय व मोहनीय १४ ( १२ कषाय अनंतानुबंधि ४ सोडून + भय, जुगुप्सा. ) एकूण ३० प्रकृतींचा अनुत्कृष्ट प्रदेशबंध ( सादि, अनादि, ध्रुव, अध्रुव चारही प्रकारें होतो. परंतु उत्कृष्ट, अजघन्य, जघन्य प्रदेशबंध [ सादि, अध्रुव. ] दोन प्रकारचाच होतो. बाकी ९० प्रकृति उरल्या यांचा चारही [ उ. अ. अजघन्य, जघन्य ] प्रकारचा बंध सादि अध्रुवरूपच होतो.

## उत्तर–प्रकृतींच्या प्रदेशबंधांत साद्यादि ४ प्रकारच्या बंधांचें
## [ कोष्टक नं. ५१. ]

| ४ प्रकार | ३० प्रकृति. | ९० प्रकृति. |
|---|---|---|
| उत्कृष्ट | २ | २ |
| अनुत्कृष्ट | ४ | २ |
| अजघन्य | २ | २ |
| जघन्य | २ | २ |

**गाथा** २१०–उत्कृष्ट व जघन्यप्रदेश बंध कोणास होतो ? संज्ञी पर्याप्त, अल्प प्रकृति बांधणारा, व उत्कृष्ट योग असणारा जो असेल त्याला उत्कृष्ट प्रदेशबंध होईल. आणि या उलट असंज्ञी, अपर्याप्त ज्यास्त प्रकृति बांधणारा व जघन्ययोग असणारा असेल त्यास जघन्य प्रदेशबंध होईल.

**गाथा** २११–आयुकर्माचा उत्कृष्ट प्रदेशबंध सहा गुणस्थानें उल्लंघून प्राप्त झालेल्या अप्रमत्त गुणस्थानांत होतो. मोहनीयाचा उत्कृष्ट प्रदेशबंध नवव्या गुणस्थानांत होतो. ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, नाम, गोत्र, अंतराय यांचा उत्कृष्ट प्रदेशबंध दहाव्या गुणस्थानांत होतो.

**गाथा** २१२ ते २१४–उत्तर प्रकृतींचा उत्कृष्ट प्रदेशबंध कोणास होतो ?

| | |
|---|---|
| ५ ज्ञानावरण. ४ दर्शनावरण. ५ अंतराय. १ यशस्कीर्ति. १ उच्चगोत्र. १ सातावेदनीय. | दहाव्या गुणस्थानांत उत्कृष्ट प्रदेशबंध होतो. |
| ५ पुरुषवेद+संज्वलन | अनिवृत्तिकरणांत उ. प्रदे. बं. होतो. |
| ४ प्रत्याख्यानावरण | देशविरत गुणस्थानांत ,, ,, |
| ४ अप्रत्याख्यानावरण | असंयत ,, ,, ,, |
| ९ हास्यादि, निद्रा, प्रचला, तीर्थंकर | सम्यग्दृष्टि |
| १३ मनुष्यायु, देवायु, असाता, देवचतुष्क वज्रवृ. ना.सं. समचतु संस्था. प्रशस्तविहायोगति, सुभग, सुस्वर, आदेय. | ,, व मिथ्यादृष्टि |

२ आहारकद्विकाचा उत्कृष्ट प्रदेश बंध अप्रमत्तगुणस्थानांत होतो एकूण ५४ प्रकृति झाल्या.

बाकीच्या ६६ प्रकृतींचा उत्कृष्ट प्रदेशबंध . मिथ्यादृष्टीस होईल.

**गाथा** २१५–मूल प्रकृतींचा जघन्य प्रदेशबंध कोणास होतो ? सूक्ष्म निगोदिया लब्ध्यपर्याप्तक आपल्या पर्यायाच्या प्रथम समयांत आयु सोडून बाकी सात मूळ प्रकृतींचा जघन्यप्रदेशबंध जघन्ययोगानें करील. व या जीवास नवीन आयुर्बंध होईल तेव्हां आयुचाही जघन्यप्रदेशबंध होईल.

**गाथा** २१६–उत्तर प्रकृतींचा जघन्य प्रदेश बंध कोणास होतो ? घोटमानयोगस्थानधारी असंज्ञी जीव, नरकद्विक, देवायु, नरकायु यांचा जघन्य प्रदेशबंध करील. आहारकद्विकचा जघन्य प्रदेशबंध अप्रमत्तगुणस्थानवाल्यास होईल. घोटमानयोगास परिणामयोग ही म्हणतात.

तीर्थंकरप्रकृति व देवचतुष्क या पांच प्रकृतींचा जघन्य प्रदेशबंध असंयत सम्यग्दृष्टि जीवास ( जो जन्माच्या पहिल्या समयांत जघन्य उपपाद योगधारी असेल ) होतो.

**गाथा** २१७–गाथा २१६ मधें ११ प्रकृति सांगितल्या त्या वगळून बाकी १०९ प्रकृति उरल्या त्यांचा जघन्य प्रदेशबंध, सूक्ष्म, निगोद, लब्ध्यपर्याप्तक जीवास [ शेवटच्या ६०१२ व्या क्षुद्रभवांत तीन वळणें [मोडे] घेऊन जन्म पावणारा पाहिल्या वळणांत [ मोड्यांत ] असतांना होईल.

नोटः–या गाथे बरोबर गाथा २१९ व गाथा २५६ पहा.

## एका जीवाला एका समयांत किती प्रकृतींचा बंध होतो तें दाखविणारें

## [ कोष्टक नं. ५२. ]

| गुणस्थान. | ज्ञाना. | दर्श | वेदं. | मोहनीय. | आयु. | नाम | गोत्र | अंत | बेरीज. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मिथ्या. | ५ | ९ | १ | २२ | १ | २३-२५-२६-२८-२९ ३० | १ | ५ | ६७-६९-७०-७२-७३ ७४. |
| सासा. | ५ | ९ | १ | २१ | १ | २८-२९-३० | १ | ५ | ७१-७२-७३. |
| मिश्र, | ५ | ६ | १ | १७ | ० | २८-२९ | १ | ५ | ६३-६४ |
| अविर. | ५ | ६ | १ | १७ | १ | २८-२९-३० | १ | ५ | ६४-६५-६६ |
| देश. | ५ | ६ | १ | १३ | १ | २८-२९ | १ | ५ | ६०-६१ |
| प्रमत्त. | ५ | ६ | १ | ९ | १ | २८-२९ | १ | ५ | ५६-५७ |
| अप्रम. | ५ | ६ | १ | ९ | १ | २८-२९-३०-३१ | १ | ५ | ५६-५७-५८-५९ |
| अपूर्व. | ५ | ६ व ४ | १ | ९ | ० | २८-२९-३०-३१-१ | १ | ५ | ५५-५६-५७-५८-२६ |
| अनि. | ५ | ४ | १ | ५-४-३-२-१ | ० | १ | १ | ५ | २२-२१-२०-१९-१८ |
| सूक्ष्म | ५ | ४ | १ | ० | ० | १ | १ | ५ | १७ |
| उप. | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | १ |
| क्षीण. | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | १ |
| सयो. | ० | ० | १ | ० | ० | ० | ० | ० | १ |
| अयो. | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० | ० |
| बेरीज | ५ | ९,६,४ | १ | २२-२१-१७-१३ ९-५-४-३-२-१ | १ | २३-२५-२६-२८-२९ ३०-३१-१ | १ | ५ | ७४-७३-७२-७१-७० ६९-६७-६६ ६५-६४ ६३-६१-६०-५९-५८ ५७-५६-५५-२६-२२ २१-२०-१९-१८-१७-१ |

वरील कोष्टकाचें विशेष स्पष्टीकरण.

दर्शनावरण–६ प्रकृति म्हणजे ९ मूळ प्रकृतींत १ निद्रानिद्रा, १ प्रचलाप्रचला, १ स्त्यान गृद्धि या तीनकमी. ४ प्रकृति म्हणजे वरील ६ तून १ निद्रा, १ प्रचला कमी

**मोहनीय**—२२ प्रकृति म्हणजे–मोहनीयाच्या एकंदर प्रकृति २८ त्यांत मिश्र व सम्यक्त्व मोहनीयाचा बंध होत नाहीं म्हणून २६ प्रकृति राहिल्या. त्यांत तीन वेदांपैकीं

एकेकाळीं एकाच वेदाचा बंध होतो म्हणून २ वेद कमी केले बाकी उरल्या २४ त्यांतून हास्य, शोका पैकीं १ व रति अरतिपैकीं एकाचा बंध होतो म्हणून २४–२=२२.

२१ प्रकृति म्हणजे वरील २२ प्रकृतींतून मिथ्यात्व प्रकृति कमी झाली.

१७ म्हणजे वरील २१ पैकीं ४ अनंतानुबंधी कमी झाल्या.

१३ वरील १७ तून ४ अप्रत्याख्यानावरण कमी झाल्या.

९ म्हणजे १३ तून ४ प्रत्याख्यानावरण कमी झाल्या.

५ म्हणजे ९ तून भय, जुगुप्सा व हास्य, शोकांतून एक व रति अरतिंतून एक कमी झाली एकूण ४ प्रकृति कमी झाल्या म्हणून ९–४=५.

४ म्हणजे वरील ५ तून पुरुषवेदाची प्रकृति कमी झाली.

३ म्हणजे वरील ४ प्रकृतीपैकीं एक संज्वलन क्रोध कमी झाला.

२ म्हणजे वरील ३ प्रकृतींपैकीं संज्वलन मान कमी झाला.

१ म्हणजे वरील २तून संज्वलन मायाकषाय कमी झाला. नामकर्माच्या बंधस्थानाचें वर्णन गाथा ५२६ पासून ५३१ पर्यंत आहे. त्यावरून खालील माहिती लिहिली आहे.

**नाम कर्म**—(१) २३ प्रकृतींचें बंधस्थान एकच आहे त्या २३ प्रकृति खालीं लिहिल्याप्रमाणें–एकेंद्रिय अपर्याप्तयुत.

९ ध्रुव प्रकृति [ तैजसशरीर, कार्मणशरीर, अगुरुलघु, उपघात, निर्माण, वर्णादि ]
१ स्थावर.
१ बादर व सूक्ष्म पैकीं एक.
१ प्रत्येक साधारणांतून एक.
१ स्थिर अस्थिरांतून एक.
१ शुभ अशुभांतून एक.
१ सुभग दुर्भग पैकीं एक.
१ आदेय अनादेया पैकीं एक.
१ यश अयश पैकीं एक.
१ अपर्याप्त.
२ तिर्यंचद्विक.
१ एकेंद्रियजाति.
१ औदारिकशरीर
१ सहा संस्थानापैकीं एक,

२३

'एकेंद्रिय अपर्याप्तयुत' चा अर्थ असा आहे कीं, जो कोणी जीव या २३ प्रकृति बांधील तो मरून एकेंद्रिय अपर्याप्ति होऊं शकतो.

एकेंद्रिय अपर्याप्त झाल्यास तिथें या २३ प्रकृतींचा उदय होईल.

( २ ) २५ प्रकृतीचें दुसरें बंधस्थान आहे त्याचे ६ प्रकार आहेत.

१ **एकेंद्रिय पर्याप्तयुत**:–वरील २३ प्रकृतीं पैकीं अपर्याप्त काढून टाकावी म्हणजे २२ राहतील त्या शिवाय पर्याप्त, उच्छ्वास, परघात या तीन प्रकृति मिळून २५.

१ **द्वींद्रिय अपर्याप्तयुत**:–वरील पंचवीस पैकीं पांच प्रकृति ( १स्थावर, १पर्याप्त, १ एकेंद्रिय, १ उच्छ्वास, १ परघात. ) काढून ज्या वीस प्रकृति राहिल्या त्यांत आणखी पांच प्रकृति [ १ त्रस, १ अपर्याप्त, १ द्वींद्रिय, १ सृपाटिका संहनन, औदारिक, अंगोपांग ) मिळविल्या म्हणजे २५ होतील.

१ **त्रींद्रिय अपर्याप्तयुत**:-द्वींद्रिय अपर्याप्तयुतामध्यें ज्या २५ प्रकृति आहेत त्यापैकीं द्वींद्रिय काढून त्रींद्रियजाति मिळवावी.

१ **चतुरिंद्रिय अपर्याप्तयुत**:–त्रींद्रियच्या ऐवजीं चतुरिंद्रियजाति प्रकृति मिळवावी.

१ **पंचेंद्रिय अपर्याप्तयुत**:-चतुरिंद्रियजाति प्रकृतीच्या ऐवजीं पंचेंद्रियजाति मिळवावी.

१ **मनुष्य अपर्याप्तयुत**:–पंचेंद्रिय अपर्याप्तच्या २५ प्रकृतीपैकीं तिर्यंचगति काढून मनुष्यगति मिळवावी.

६ या प्रमाणें सहा प्रकार २५ प्रकृतीचे झाले.

[ ३ ] २६ प्रकृतींच्या बंधस्थानाचें २ प्रकार आहेत.

१ **एकेंद्रिय पर्याप्त आतपयुत**:–मनुष्यगति अपर्याप्ताच्या २५ प्रकृतींतून ६ ) प्रकृति ( त्रस, अपर्याप्त, मनुष्यगति, पंचेंद्रिय, सृपाटिकासंहनन, औदारिक अंगोपांग काढून ७ प्रकृति ( स्थावर, पर्याप्त, तिर्यंचगति, एकेंद्रिय, उच्छ्वास, परघात, आतप ) मिळवाव्या.

१ **एकेंद्रिय पर्याप्त उद्योतयुत**:–वरील आतप प्रकृतींच्या ऐवजीं उद्योत प्रकृति १ घालावी.

२

[ ४ ] २८ प्रकृतिच्या बंधस्थानाचे प्रकार २

१ **देवगतियुत**:–९ ध्रुव प्रकृति, त्रस, बादर, पर्याप्त, प्रत्येक, स्थिरअस्थिरांतून एक, शुभाशुभांतून एक, यश अयशामधून एक, सुभग, आदेय, देवगति, देवगत्यानुपूर्व्य, वैक्रियिकद्विक, पंचेंद्रियजाति, समचतुरस्रसंस्थान, सुस्वर, प्रशस्तविहायोगति, उच्छ्वास, परघात एकूण २८.

१ **नरकगतियुत**:–९ ध्रुव प्रकृति, त्रस, बादर, पर्याप्त, प्रत्येक, अस्थिर, अशुभ, अनादेय, दुर्भग, अयश, नरकद्विक, वैक्रियिकद्विक, पंचेंद्रियजाति, हुंडकसंस्थान, दुःस्वर, अशुभविहायोगति, उच्छ्वास, परघात एकूण २८.

२

[ ५ ] २९ प्रकृतींच्या बंधस्थानाचें ६ प्रकार.

१ **द्वींद्रियपर्याप्तयुतः**–९ ध्रुव, त्रास, बादर, पर्याप्त, प्रत्येक, स्थिरास्थिरांतून एक, शुभाशुभांतून एक, दुर्भग, अनादेय, यश अयशांतून एक, तिर्यंचद्विक, द्वींद्रिय, औदारिकद्विक, हुंडक संस्थान, सृपाटिका संहनन, दुःस्वर, अप्रशस्तविहायोगति, उच्छ्वास, परघात मिळून २९.

१ **त्रींद्रिय पर्याप्तयुतः**–वरील द्वींद्रिय पर्याप्तयुतापैकीं द्वींद्रिय प्रकृति काढून त्या ऐवजीं त्रींद्रिय प्रकृति घालावी.

१ **चतुरिंद्रिय पर्याप्तयुतः**—त्रींद्रिय पर्याप्तयुतापैकीं त्रींद्रियाऐवजीं चतुरिंद्रिय प्रकृति घालावी.

१ **पंचेंद्रिय पर्याप्तयुत [ तिर्यंच ]**:—९ ध्रुव, त्रास, बादर, प्रत्येक, पर्याप्त, स्थिरास्थिरांतून एक, शुभाशुभांतून एक, सुभग दुर्भगापैकीं एक, आदेयानादेयांतून एक, यशअयशांतून एक, सहा संस्थानांतून एक, सहा संहननांतून एक, सुस्वर दुःस्वरांतून एक, दोन विहायोगतींपैकीं एक, तिर्यंचद्विक, औदारिकद्विक, पंचेंद्रियजाति, उच्छ्वास, परघात एकूण २९.

१ **मनुष्य पर्याप्तयुतः**–वरील २९ प्रकृतीं पैकीं तिर्यंचद्विकाच्या ऐवजीं मनुष्यद्विक घालावी.

१ **देवगति तीर्थंकरयुतः**—९ ध्रुव, त्रास, बादर, पर्याप्त, प्रत्येक, स्थिरास्थिरांतून एक, शुभाशुभांतून एक, सुभग, आदेय, यश अयशांतून एक, देवद्विक, वैक्रियिकद्विक पंचेंद्रिय, समचतुरस्र संस्थान, सुस्वर, प्रशस्तविहायोगति, उच्छ्वास, परघात, तीर्थंकर, एकूण २९ प्रकृति.

नोटः—२८ प्रकृतींच्या बंधस्थानांत देवगति युत जो प्रकार सांगितला त्या पेक्षां तीर्थंकर प्रकृति यांत वाढली आहे.

## ( ६ ) तीस प्रकृतींची बंधस्थानें ६ प्रकार.

( १ ) **द्वींद्रिय पर्याप्त उद्योतयुतः**–२९ प्रकृतींच्या द्वीन्द्रियपर्याप्त स्थानांत एक उद्योत प्रकृति वाढवावी.

( १ ) **त्रींद्रिय पर्याप्त उद्योतयुतः**—२९ प्रकृतींच्या त्रींद्रिय पर्याप्तयुतांत एक उद्योत प्रकृति वाढवावी.

( १ ) **चतुरिंद्रिय पर्याप्त उद्योतयुत**–२९ प्रकृतींच्या चतुरिंद्रिय पर्याप्तयुतांत एक उद्योत प्रकृति वाढवावी.

( १ ) **पचेंद्रिय पर्याप्त उद्योतयुत** [ तिर्यंच ]—वरीलप्रमाणें २९ व्या स्थानांत उद्योत प्रकृति वाढवावी.

( १ ) **मनुष्य तीर्थंकर युत**—मनुष्य पर्याप्त नामक २९ प्रकृतींचें जें स्थान आहे त्यांत तीर्थंकर प्रकृति वाढवावी.

( १ ) **देवगति आहारकयुत**—देवतीर्थंकर युत म्हणून २९ प्रकृतींचें जें स्थान आहे त्यांतून तीर्थंकर काढून आहारकद्विक मिळवावी.

---

६

[ ७ ] ३१ एकतीस प्रकृतींचें एकच स्थान आहे,

( १ ) **देवगति आहारकतीर्थंकर युत**—२९ प्रकृतींच्या " देवगति तीर्थंकरयुत " या स्थानांत आहारकद्विक वाढवावें.

[ ८ ] १ एक प्रकृतीचें एकच स्थान आहे. ती प्रकृति " यशस्कीर्ति " याप्रमाणें नाम कर्माच्या आठ स्थानाचें २५ प्रकार झाले.

**नोट**:—नरकगतियुत २८ प्रकृतींच्या स्थानांत आणि एकेंद्रिय अपर्याप्त युत २३ प्रकृतींच्या स्थानांत व त्रस अपर्याप्तयुत २५ प्रकृतींच्या स्थानांत दुर्भग सुभगादि शुभाशुभ प्रकृतींपैकीं एकाचा बंध होईल असें लिहिलें आहे तो अशुभ प्रकृतीचाच होईल.

( गाथा ५३३ कर्मकांड पहा. )

नामकर्माचीं आठ स्थानें मागें दाखविलीं त्यांचे भंग खालीं दिले आहेत.

[ गाथा २१७-५३३-५३७ वरून )

## ( कोष्टक नं. ५३ )

| गुणस्थान | बंध स्थान | भंग | विवरण. |
|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | २३ | १ | यांत केवळ अशुभ प्रकृतींचाच बंध होतो म्हणून भंग एकच आहे एकेंद्रिय अपर्याप्तयुताचा. |
| | २५ | ९ | एकेंद्रिय पर्याप्तयुतांत ८ भंग होतात, कारण स्थिर, अस्थिर, शुभ अशुभ व यश अयश अशीं तीन युगलें असल्यामुळें ८ भंग होतात. ते दाखविले आहेत. |

| गुणस्थान | बंध स्थान | भंग | विवरण. |
|---|---|---|---|
| | | | १ स्थिरशुभ यश  १ अस्थिर शुभ यश.<br>२ स्थिरशुभ अयश  २ अस्थिर शुभ अयश.<br>३ स्थिर अशुभ यश  ३ अस्थिर अशुभ यश.<br>४ स्थिर अशुभ अयश  ४ अस्थिर अशुभ अयश.<br>४ +४ = ८<br>द्वींद्रिय अपर्याप्तयुतापासून मनुष्य अपर्याप्तापर्यंत एक अशुभ प्रकृतीचाच बंध होतो. म्हणून एकच भंग मिळून ९ भंग. [ तीन युगलांपैकीं एक अशुभ ] |
| | २६ | ८ | पर्याप्त एकेंद्रिय आतप वा उद्योत युतांत ही २५ एकेंद्रियपर्याप्त–युत–प्रकृतींच्या बंधस्थानांतील भंग ८ होतील. |
| | २८ | ९ | देवगतियुतामध्यें वरीलप्रमाणें ८ भंग. } मिळून<br>नरकगति युतामध्यें अशुभ प्रकृतीचा १ भंग. } ९ भंग<br>स्थिर अस्थिर, शुभाशुभ, यश अयश या तीन युगलांपैकीं अशुभाचाच भंग होईल. |
| | २९ | ९२१६ | ४६०८ भंग तिर्यंच पंचेंद्रियपर्याप्तयुतांचे होतील ते<br>६ संस्थान × ६ संहनन × २ विहायोगति ×<br>२ शुभाशुभ × २ स्थिरास्थिर × २ सुभग दुर्भग×<br>२ आदेय अनादेय × २ सुस्वर दुःस्वर ×<br>२ यश अयश = ४६०८<br>४६०८भंग. मनुष्य पर्याप्तयुताचेही वरीलप्रमाणेंच भंग होतात<br>९२१६<br>**नोट**–द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय पर्याप्तचेही ८-८भंग एकेंद्रिय पर्याप्तप्रमाणें होतील. ते तिर्यंचाच्या ४६०८ भंगांत गर्भित आहेत. |
| मिथ्यात्व | ३० | | पंचेंद्रिय पर्याप्त उद्योतयुताचे हे भंग तिर्यंच पंचेंद्रिय बंधस्थान २९ प्रमाणें होतात.<br>तीस मधील द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय पर्याप्त उद्योत युताचें ८–८ भंग २५ एकेंद्रिय पर्याप्ताप्रमाणें होतात ते ४६०८ मध्यें गर्भित आहेत. |
| २ सासादन | २८ | ८ | २८ मधील देवगतियुता प्रमाणें ८ भंग होतात [ देवगतियुताचे ] |

| गुणस्थान | बंध स्थान | भंग | विवरण. |
|---|---|---|---|
| | २९ | ६४०० | ३२०० पंचेंद्रिय पर्याप्ततिर्यंचांचें व ३२०० मनुष्यपर्याप्तांचे मिळून ६४००. ३२००कसें होतात ते खालीं दाखविलें आहे. '५ संस्थान हुंडकविना × ५ संहनन सृपाटिकाविना× २ विहायोगति×२ स्थिरास्थिर ×२ शुभाशुभ × २ सुभगदुर्भग× २ आदेय अनादेय × २ सुस्वर दुःस्वर × २ यशअयश= ३२०० |
| | ३० | ३२०० | तीस पंचेंद्रिय पर्याप्तउद्योतयुताचे वरील पंचेंद्रिय पर्याप्त-तिर्यंच प्रमाणें. |
| ३ मिश्र | २८ | ८ | देवयुताचे हे भंग देवगतियुता प्रमाणें. |
| | २९ | ८ | मनुष्यपर्याप्ताचे २५ एकेंद्रिय पर्याप्ताप्रमाणें. |
| ४ असंयत | २८ | ८ | देवयुताचे हे भंग वरील प्रमाणें. |
| | २९ | १६ | मनुष्यपर्याप्ताचे ८ आणि ८ देवतीर्थकरयुताचे–२९ मनुष्यपर्याप्ताप्रमाणें. |
| | ३० | ८ | मनुष्य पर्याप्त तीर्थकर–युताचे २९ मनुष्य पर्याप्ताप्रमाणें. |
| ५ देश. | २८ | ८ | देवयुत २८ चे हे भंग वरील देवयुताप्रमाणें. |
| | २९ | ८ | देवतीर्थंकरयुताचे हे ८ भंग देवयुत २८ प्रमाणें |
| ६ प्रम. | २८ | ८ | देवयुताचे हे भंग वरील प्रमाणें |
| | २९ | ८ | देवतीर्थकर–युताचे हे भंग वरील देवतीर्थकरयुताप्रमाणें. |
| ७ अप्रम. | २८ | १ | हा भंग देवयुताचा होय. |
| | २९ | १ | हा भंग देवतीर्थकरयुताचा होय. |
| | ३० | १ | ,, ,, देव आहारकयुताचा. |
| | ३१ | १ | ,, ,, देवतीर्थकर आहारकयुताचा. |
| ८ अपूर्व. | २८ | १ | ,, ,, देवयुताचा. |
| | २९ | १ | ,, ,, देवतीर्थकरयुताचा. |
| | ३० | १ | ,, ,, देवआहारक युताचा. |
| | ३१ | १ | ,, ,, देवतीर्थकर आहारक युताचा. |
| | १ | १ | ,, ,, यशस्कीर्तिचा. |
| ९ | १ | १ | ,, ,, ,, |
| १० | १ | १ | ,, ,, ,, |

सातव्या गुणस्थानापासून स्थिर अस्थिर आदिमध्यें शुभ प्रकृतीचाच बंध आहे म्हणून एक एकच भंग होतो.

## योगस्थान प्रकरण ( गाथा २१८ ते २६० )

**गाथा २१८**–योगस्थानें ३ प्रकारचीं असतात. यांच्या योगें प्रकृतिबंध व प्रदेशबंध होतात. तीं स्थानें.—

१ उपपाद–योगस्थान, १ एकान्तवृद्धि–योगस्थान, १ परिणाम–योगस्थान=३.

जीव–समास १४ आहेत त्या प्रत्येकाचे वरील तीन भेद केले म्हणजे ४२ योगस्थानें होतील. पुनः याचे सामान्य, जघन्य, उत्कृष्ट असे तीन भेद धरले तर खालीं लिहिल्याप्रमाणें स्थानें होतील.

| | उपपाद. | एकांत. | परिणाम. |
|---|---|---|---|
| सामान्य | १४ | १४ | १४ |
| सामान्य, जघन्य | २८ | २८ | २८ |
| सामा. जघ. उत्कृ. | ४२ | ४२ | ४२ |

**गाथा २१९**–[ या गाथेबरोबर गाथा २५६ पहा. ] उपपाद–योगस्थान म्हणजे उत्पत्तीच्या पहिल्या समयांत जें योगस्थान असतें तें.

१ विग्रहगतींत वळण घेऊन जो जीव नवीन जन्मास जाईल त्यास जघन्य उपपाद योगस्थान होईल.

१ ऋजुगतीनें वळण ( मोडे ) न घेतां जो जन्मेल त्यास उत्कृष्ट उपपादयोगस्थान होईल.

**गाथा २२०**–परिणाम योगस्थान=पर्याप्तजीवाची शरीरपर्याप्ति पूर्ण झाल्यानंतर पहिल्या समयापासून आयुष्याच्या अंतसमयापर्यंत जें योगस्थान असेल तें परिणाम योगस्थान.

लब्ध्यपर्याप्तक जीवाची स्थिति श्वासाचा $\frac{१}{१८}$ असते. यांचा त्रिभाग करतां करतां आठवा त्रिभाग जो येईल त्या कालांत हें परिणामयोगस्थान असेल.

$$\frac{१}{१८} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} \times \frac{१}{३} = \frac{१}{११८०९८}$$

नोटः–श्वासाच्या या अंशांत परिणाम योगस्थान असेल.

**गाथा २२१**–शरीरपर्याप्ति पूर्ण झाल्यावर नंतर सर्व आयुष्यांत परिणाम योगस्थान उत्कृष्ट आणि जघन्य दोन्हींही संभवतात. लब्ध्यपर्याप्तकाचें आयुष्य श्वासाचे अठराव्या भाग प्रमाणाचे आहे. त्यांतील अन्तिम त्रिभागाच्या पहिल्या समयापासून अन्तिसमयापर्यन्त सर्व स्थितिभेदामध्यें उत्कृष्ट परिणाम योग व जघन्य परिणाम योग हीं संभवतात. पर्याप्त अपर्याप्त जीवाचें परिणामयोगस्थान जें वर लिहिलें आहे त्यांतच उत्कृष्ट

| प्रकृतींचें नांव. | बंधव्युच्छित्ति गुणस्थान | उदयव्युच्छित्ति गुणस्थान | विशेष. |
|---|---|---|---|
| १ यशस्कीर्ति | १० | १४ | |
| १ निर्माण | ८ च्या ६ व्या भागांत | १३ | |
| १ तीर्थकर | " | १४ | |
| १ उच्चगोत्र | १० | १४ | |
| १ नीचगोत्र | २ | ५ | |
| ५ अंतराय | १० | १२ | |
| | ८१ | | |

एकाच गुणस्थानांत बंधव्युच्छित्ति व उदयव्युच्छित्ति पावणाऱ्या ३१ प्रकृतींचा नकाशा.

## ( कोष्टक नं. १४० )

| प्रकृतींचें नांव | बंधव्युच्छित्ति गुणस्थान | उदयव्युच्छि. गुणस्थान | विशेष. |
|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | १ | हा नकाशा महाधवलाचें अथवा कषायप्राभृताचे कर्ते यतिवृषभाचार्य यांच्या मताप्रमाणें केला आहे. कोष्टक १४५९ पहा. |
| १ आतप. | १ | १ | |
| १ मनुष्यगत्यानु. | ४ | ४ | |
| १ स्थावर | १ | १ | |
| १ सूक्ष्म | १ | १ | |
| १ अपर्याप्तक | १ | १ | |
| १ साधारण | १ | १ | |
| ४ अनंतानुबंधि. | २ | २ | |
| ४ अप्रत्याख्यान | ४ | ४ | |
| ४ प्रत्याख्यान | ५ | ५ | |
| ३ संज्वलन= क्रोध,मान,माया | ९ | ९ | |
| २ भय, जुगुप्सा | ८ | ८ | |
| २ हास्यरति | ८ | ८ | |
| ४ एकेंद्रियादिजाति | १ | १ | |
| १ पुरुषवेद. | ९ | ९ | |
| ३१ | | | |

**गाथा ४०२–४०३**— दुसऱ्या भागाचे तीन प्रश्न आहेत त्यांचें उत्तर या दोन गाथांत दिलें आहे.

११—परप्रकृतींचा उदय असतांना पर उदयांत ज्यांचा बंध होतो त्या ११ प्रकृतींचीं नांवें.

१ देवायु, १ नरकायु, १ तीर्थंकर, २ वैक्रियिकद्विक, २ देवद्विक, २ नरकद्विक. २ आहारकद्विक = ११.

२७—उदय होतांना ज्यांचा बंध होतो त्या प्रकृति २७.

१ मिथ्यात्व, ५ ज्ञानावरण, ४ दर्शनावरण, ५ अंतराय, २ तैजसद्विक, ४ वर्णादि, २ स्थिरद्विक, २ शुभद्विक, १ अगुरुलघु, १ निर्माण=२७.

८२—प्रकृति अशा आहेत कीं, ज्यांचा उदय असतांना बंध होतो व उदय नसतानाही बंध होतो.

५ निद्रा, २ वेदनीय, २५ मोहनीय, २ मनुष्य तिर्यंचायु, २ तिर्यंचमनुष्यगति ५ जाति, २ औदारिक, ६ संहनन, ६ संस्थान, २ तिर्यंच मनुष्यगत्यानुपूर्वी, १ उपघात, १ परघात, १ आतप, १ उद्योत, १ उच्छ्वास, २ विहायोगति, २ त्रसस्थावर, २ बादर सूक्ष्म, २ पर्याप्त अपर्याप्त, १ प्रत्येक, १ साधारण, १ सुभग, १ दुर्भग, २ सुस्वर दुःस्वर, २ आदेय अनादेय, २ यशअयश, २ उच्चनीच गोत्र, एकूण ८२.

१२०

**गाथा ४०४–४०७**—तृतीय भागाचे तीन प्रश्न आहेत. त्यांचें उत्तर.

५४—निरंतर बंध पावणाऱ्या प्रकृतींचीं [ ५४ ] नांवें. त्यांत ४७ प्रकृति ध्रुवोदयी ( उदयव्युच्छित्तिपर्यंत नेहमीं उदय पावणाऱ्या ) आहेत त्या.

५ ज्ञानावरण, ९ दर्शनावरण, ५ अंतराय, १ मिथ्यात्व, १६ कषाय, २ भय जुगुप्सा, २ तैजसकार्मण २ अगुरुलघुद्विक [ १ अगुरुलघु, १ उपघात ] १ निर्माण, ४ वर्णादि =४७

अध्रुवोदयी प्रकृति ७ आहेत त्या–१तीर्थंकर, २ आहारकद्विक, ४ आयु. =७

५४

तीर्थंकर आहारकद्विक यांचा बंध ज्या गुणस्थानांत प्रारंभ होतो त्या गुणस्थानांत निरंतर [ प्रत्येक समयांत ] बंध होतो म्हणून निरंतर बंध असें म्हटलें आहे.

आयुर्बंध होण्याचा वेळ एक अंतर्मुहूर्ताचा आहे त्या एका अंतर्मुहूर्तांत

बंध झाला तर तो अंतर्मुहूर्त पूर्ण होईपर्यंत आयुबंध सारखा होत जातो म्हणून त्याला निरंतर बंध असें म्हटलें आहे. आयुर्बंधाचा काल ८ अपकर्षणांत केव्हां तरी येतो.

३४ सांतरबंध प्रकृति म्हणजे ज्यांचा बंध कधीं होतो व कधीं होत नाहीं त्या—या प्रकृति ३४ आहेत,

२ नरकद्विक, ४ एकेंद्रियादि, ५ वृषभनाराचविना संहनन, ५ संस्थान (समचतुरस्र सोडून) १ अप्रशस्त विहायोगति १ आतप, १ उद्योत, १० स्थावर दशक [ १ स्थावर, १ सूक्ष्म, १ अपर्याप्त, १ साधारण, १अस्थिर, १अशुभ, १दुर्भग, १ दुःस्वर, १ अनादेय, १ अयश, ]१असातावेदनीय, १ स्त्रीवेद, १नपुंसकवेद, १ अरति, १ शोक = ३४.

३२ सांतर व निरंतर बंध पावणाऱ्या प्रकृति.

२ देवद्विक, २ मनुष्य द्विक, २ तिर्यंचद्विक, २ औदारिकद्विक, २ वैक्रियकद्विक, १ प्रशस्त विहायोगति, १ वज्रवृषभनाराच संहनन, १ परघात, १ उच्छ्वास, १ समचतुरस्र संस्थान, १ पंचेंद्रिय जाति, १० त्रसदशक [ १ त्रस, १ बादर, १ पर्याप्त, १ प्रत्येक, १ स्थिर, १ शुभ, १ सुभग, १ सुस्वर, १ आदेय, १ यशस्कीर्ति ], १ सातावेदनीय, १हास्य, १रति, १पुरुषवेद, २गोत्रद्विक=३२

१२०

वरील ३२ प्रकृतिमध्यें ज्या प्रकृतींच्या प्रतिपक्षी प्रकृतींचा बंध संभवनीय असेल त्या प्रकृतींचा बंध सांतर होईल व प्रतिपक्षी प्रकृतींची बंधव्युच्छित्ति जिथें होईल किंवा झाली असेल तिथें त्या प्रकृतींचा बंध निरंतर होत राहील; म्हणजे प्रतिपक्षी प्रकृतींची बंधव्युच्छित्ति झाल्यानंतर त्या सांतरबंध होणाऱ्या प्रकृतींची बंधव्युच्छित्ति होईपर्यंत सांतरच्या ऐवजीं निरंतर बंध होत राहील.

स्वजातीय अन्य प्रकृतींचा जिथें बंध होऊं शकेल तिथें त्या प्रकृतीला सप्रतिपक्ष प्रकृति म्हणावें व तों पर्यंतच ती प्रकृति सांतरबंधी असते व जिथें केवल आपलाच बंध होत असेल तिथें तिला निष्प्रतिपक्षी प्रकृति म्हणावें व त्या वेळीं ती निरंतर बंधी असते.

उभयबंधी ३२ प्रकृतींच्या सांतर निरंतर बंधाचें विवरण करणारा नकाशा.

## (कोष्टक नं. १४१)

| प्रकृतींची संख्या. | उभयबंधी प्र०चें नांव | प्रतिपक्षी प्रकृतींचीं नांवें. | कोणत्या गुणस्थानापर्यंत सांतर बंध होतो. | निरंतरबंध कोठें कोठें होईल. | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| २ | देवद्विक | नरकद्विक<br>तिर्यंचाद्विक<br>मनुष्यद्विक | १ मिथ्यात्व<br>२ सासादन<br>४ असंयत | ५व्या गुणस्थानापासून ८व्याच्या ६व्या भागापर्यंत | भोगभूमींत देवद्विकाचा निरंतर बंध होईल. |
| २ | मनुष्यद्विक | नरकद्विक<br>तिर्यंचद्विक<br>देवद्विक | १ मिथ्यात्व<br>२ सासादन<br>४ असंयत | १३व्या स्वर्गापा. सर्वार्थसिद्धीपर्यंत प्रथमच्या ४ गुण० | |
| १ | नीचगोत्र | उच्चगोत्र | २ सासादन | ७व्या नरकांत तेज.कायवायु–कायतिर्यंचांत. | |
| २ | तिर्यंचद्विक | नरकाद्विक<br>मनुष्यद्विक<br>देवद्विक | १ मिथ्यात्व<br>२ सासादन<br>२ सासादन | वरप्रमाणें | |
| २ | औदारिक. | वैक्रियिकद्विक | ४ असंयत | नरकदेवगतींत | नरक व देव गतींत वैक्रियिकद्विकाचा बंध होत नाहीं |
| १ | उच्चगोत्र | नीचगोत्र | २ सासादन | ३ऱ्यापासून १० व्या गुणस्थापर्यंत | भोगभूमींत उच्च गोत्राचा निरंतर बंध होते |
| २ | वैक्रियिकद्वि. | औदारिकद्विक | ४ असंयत | ५व्या गुणस्थानापासून ८व्या गुणस्थानाच्या ६ व्या भागापर्यंत | भोगभूमींत निरंतर बंध होतो. |
| १ | प्रशस्तविहायोगति | अप्रशस्त विहायोगति | २ सासादन | ३ऱ्या गुणस्थानापासून ८ व्याच्या ६व्या भागापर्यंत | |
| १ | वज्रवृषभनाराच संहनन. | सृपाटिकसंहनन<br>कीलक ,, | १<br>२ | ३ व ४ गुणस्थानांत | |

| प्रकृतींची संख्या | उभयबंधी प्रकृतीचें नांव | प्रतिक्षी प्रकृतींची नांवें. | कोणत्या गुणस्थानापर्यंत सांतर बंध होतो | निरंतर बंध कोठें कोठें होईल. | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| | | अर्धनाराच ,, | २ | | |
| | | नाराच ,, | २ | | |
| | | वज्रनाराच ,, | २ | | |
| १ | परघात | अपर्याप्त | १ | २ऱ्यापासून ८व्या | ही आतप |
| १ | उच्छ्वास | अपर्याप्त | १ | च्या ६व्या भागा- | प्रकृति उभय- |
| १ | आतप | ,, | १ | पर्यंतच्या गु० त. | बंधाच्या ३२ |
| | | | | पर्याप्तप्रकृतिबरो- | प्रकृतींत नाहीं |
| | | | | बर निरंतर बंध | पण टीकेत हि |
| | | | | होईल अपर्याप्ताशीं | चें नांव आहे |
| | | | | होणार नाहीं. गु- | गोम्मटसार |
| | | | | णस्थान १ | पान५७१पह |
| १ | समचतुरस्र | हुंडक | १ | ३ऱ्या गु०पासून | |
| | संस्थान | कुब्जक | २ | ८व्याच्या ६ व्या | |
| | | वामन | २ | भागापर्यंत. | |
| | | स्वाति | २ | | |
| | | न्यग्रोध | २ | | |
| १ | पंचेंद्रिय | ४ एकेंद्रियादि | १ | सासादनापासून | |
| | | | | अपूर्व करणाच्या | |
| | | | | ६व्या भागापर्यंत | |
| ४ | त्रस | स्थावर | १ | २ऱ्या गु०पासून | |
| | बादर | सूक्ष्म | १ | ८व्याच्या ६ व्या | |
| | पर्याप्त | अपर्याप्त | १ | भागापर्यंत. | |
| | प्रत्येक | साधारण | १ | ७ व्या पासून | |
| १ | स्थिर | अस्थिर | ६ | ८व्याच्या ६ व्या | |
| | | | | भागापर्यंत. | |
| १ | शुभ | अशुभ | ६ | ,, | |
| १ | यशस्कीर्ति | अयशस्कीर्ति | ६ | ७ व्यापासून | |
| १ | सुभग | दुर्भग | २ | १०व्या गु०पर्यंत | |
| १ | सुस्वर | दुःस्वर | २ | तिसऱ्यापासून | |
| १ | आदेय | अनादेय | २ | ८ व्याच्या ६ व्या | |
| | | | | भागापर्यंत | |

| प्रकृतींची संख्या | उभयबंधी प्रकृतींचें नांव | प्रतिपक्षीं प्रकृतींचीं नांवें | कोणत्या गुणस्थानापर्यंत सांतर बंध होतो | निरंतर बंध कोठें कोठें आहे. | विशेष |
|---|---|---|---|---|---|
| १ | सातावेद | असातावेदनीय | ६ | ७ते१३गु०पर्यंत | |
| १ | हास्य | शोक | ६ | ७ पासून ८ व्या गुणस्थानाच्या अंतिम भागापर्यंत | |
| १ | रति | अरति | ६ | | |
| १ | पुरुषवेद | नपुंसकवेद | १ | तिसऱ्या पासून नवव्याच्या १ल्या भागापर्यंत | |
| | | स्त्रीवेद | २ | ,, | |

इति नवप्रश्नचूलिका नाम प्रथम चूलिका समाप्त.

—=*=—

## पंचभागहार द्वितियचूलिका.

**गाथा ४०८** अभयनंदी आचार्यांचा निर्मल शास्त्रसमुद्र जीवांच्या पापमलाला दूर करो. त्याच शास्त्रसमुद्रांतून मंथन न करितां ही उत्कृष्ट नेमिचन्द्र निर्मल झाला. म्हणजे अभयनंदि आचार्यांनीं उपदेशिलेल्या शास्त्रसमुद्राचें थोडेंसें अध्ययन केल्यानें नेमिचन्द्र आचार्यरूपी निर्मलचन्द्र प्रकट झाला.

**गाथा ४०९** संक्रमणाचे प्रकार पांच आहेत.

१ उद्वेलन, १ विध्यात, १ अधःप्रवृत्त, १ गुणसंक्रम, १ सर्व-संक्रम=५

भागहार म्हणजे भाजक.

पांच प्रकारच्या संक्रमणांत पांच प्रकारचे भागहार होतात. एखाद्या प्रकृतीच्या परमाणूंना या पांच भागहारापैकीं कोणत्या एका भागहारानें भाग दिल्यास जें लब्ध येईल तितके परमाणु जीवाच्या परिणामानुरूप अन्य प्रकृतीरूप होऊन जातील जसें— उद्वेलन भागहाराचें प्रमाण पांच मानिलें व उद्वेलनकर्मप्रकृतीचे परमाणु ( १०० ) मानिले तर भाग कार २० येईल. हे वीस परमाणु अन्य-प्रकृतीरूप होऊन जातील.

**गाथा ४१०** ज्या कर्मप्रकृतीचा जेथ पावेतों बंध होतो तेथपर्यंत त्या प्रकृतीमध्यें अन्य कर्म-प्रकृतीचें संक्रमण होईल जसें—

असाताचा बंध ६ व्या गुणस्थानापर्यंत होतो त्या अर्थी साताचें संक्रमण सहाव्या गुणस्थानापर्यंत होऊन असातारूप होईल. त्याच प्रमाणें साताचा बंध १३ व्या गुणस्थानापर्यंत होतो म्हणून असाताचें संक्रमण १३ व्या गुणस्थानापर्यंत होतें. परंतु दर्शनमोहनीयाचा जिथें बंध होतो तिथें हा नियम नाहीं. मूल प्रकृतीचें परस्पर संक्रमण होत नाहीं. जसें ज्ञानावरणाचें दर्शनावरणांत संक्रमण होत नाहीं.

उत्तर प्रकृतींत परस्पर संक्रमण होतें. परंतु दर्शनमोहनीय व चारित्रमोहनीयाचें परस्पर संक्रमण होत नाहीं व चार आयूंचें ही परस्पर संक्रमण होत नाहीं.

**गाथा ४११** सम्यक्त्वमोहनीयाचे संक्रमण चौथ्यापासून सातव्या गुणस्थानापर्यंत होत नाहीं. मिथ्यात्वाचें संक्रमण मिथ्यात्व गुणस्थानांत होत नाहीं व सम्यङ्मिथ्यात्वाचें संक्रमण ३ ऱ्या गुणस्थानांत होत नाहीं. सासादन आणि मिश्र गुणस्थानांत तीनही दर्शन-मोहनीय प्रकृतींचें संक्रमण होत नाहीं. सामान्यपणें दर्शनमोहनीयाचें संक्रमण असंयतादि [ ४ ते ७ ] चार गुणस्थानापर्यंत होतें.

**गाथा ४१२** कोणी सम्यग्दृष्टि जीव जेव्हां मिथ्यात्वगुणस्थानांत येतो त्या वेळीं सम्यक्त्वमोहनीय व मिश्रमोहनीय या दोन प्रकृतींत अधःप्रवृत्त संक्रमण अंतर्मुहूर्त-पर्यंत होतें. नंतर उद्वेलनभागहार संक्रम उपांत्यकांडा [ कांड=भाग ] पर्यंत होतो.

एका समयांत संक्रमण होतें त्यास फालि म्हणतात.

अधःप्रवृत्त संक्रमणांत फालिरूप संक्रमण होतें व समयसमुदायांत जें संक्रमण होतें त्यांस कांडक म्हणतात. उद्वेलनासंक्रम कांडकरूपानें होतो.

**गाथा ४१३** उद्वेलन प्रकृतींत द्विचरमकांडापर्यंत उद्वेलनसंक्रमण होतें व अंतकांडांत गुणसंक्रमण होतें. व अंतकांडकांच्या अंतफालींत सर्वसंक्रमण होतें. सम्यक्त्वमोहनीय व मिश्रमोहनीय या प्रकृति उद्वेलनप्रकृतींत समाविष्ट आहेत म्हणून त्या प्रकृतींत उद्वेलन, गुण व सर्वसंक्रमण होतें. ( गाथा ६१२ ते ६१७ पहा )

पांच प्रकारच्या संक्रमणांचें स्वरूप.

**अधःप्रवृत्त संक्रमण**—ज्या प्रकृतींचा बंध झाला आहे त्या प्रकृतींच्या परमाणूंचें आपल्या बंधांत संभवणाऱ्या प्रकृतींत संक्रमण होणें तें अधःप्रवृत्त संक्रमण होय.

**उद्वेलन संक्रमण**—तीन करणपरिणामावांचून कोणत्याही कर्मप्रकृतींच्या परमाणूंचें अन्य प्रकृतींत परिणमन होणें तें उद्वेलन संक्रमण होय.

**विध्यातसंक्रमणः**—स्थिति, अनुभाग कमी करणारें कांडक संपल्यानंतर व गुणश्रेण्यादि परिणाम होऊन गेल्यानंतर मंदविशुद्धि असणाऱ्या जीवाच्या कर्म प्रकृतींचें जें संक्रमण होणें तें विध्यातसंक्रमण होय.

**गुणसंक्रमण**:—असंख्यात असंख्यात पट परमाणूंचें समयासमयाला श्रेणीरूप जें संक्रमण होणें तें गुणसंक्रमण होय.

**सर्वसंक्रमण**:—शेवटच्या कांडकाची जी शेवटची फाली तींत अन्य प्रकृति-रूप परिणमन पावलेल्या उर्वरित परमाणूंचें जें संक्रमण होणें तें सर्वसंक्रमण होय.

**सर्वसंक्रमण होणाऱ्या प्रकृतींतील तिर्यक् एकादश प्रकृति.**

**गाथा** ४१४— २ तिर्यंचद्विक, ४ एकेंद्रियादि चार जाति, १ आतप, १ उद्योत, १ स्थावर, १ सूक्ष्म, १ साधारण. या ११ प्रकृतींचा उदय तिर्यंच गतींतच होतो.

१३ उद्वेलन होणाऱ्या प्रकृति व त्यांचीं नांवें.

**गाथा** ४१५— २ आहारकद्विक, १ सम्यक्त्वमोहनीय, १ मिश्रमोहनीय, २ देवद्विक, २ नरकद्विक, २ वैक्रियिकद्विक, १ उच्चगोत्र, २ मनुष्यद्विक.

**गाथा** ४१६–बंधव्युच्छित्ति होईपर्यंत बंध पावणाऱ्या प्रकृतींत अन्य प्रकृतींचें अधःप्रवृत्त संक्रमण होतें परंतु मिथ्यात्वाचें संक्रमण पहिल्या गुणस्थानांत होत नाहीं.

बंधव्युच्छित्ति झाली असतां चौथ्यापासून सातव्या गुणस्थानापर्यंत विध्यात-संक्रमण होतें.

आठव्या गुणस्थानापासून अकराव्या गुणस्थानापर्यंत बंधरहित अप्रशस्त प्रकृतींत गुणसंक्रमण होतें. प्रथमोपशम सम्यक्त्वग्रहण होऊं लागण्याच्या प्रथम समयापासून अंत-र्मुहूर्तपर्यंत गुणसंक्रमण होतें व क्षायिकसम्यक्त्व होतांना मिथ्यात्वाचा क्षय करण्यास्तव अपूर्व–करणाचें जे परिणाम होतात त्या परिणामामुळें मिथ्यात्वाच्या अंतकांडाच्या उपांत्य-फालीपर्यंत गुणसंक्रमण व चरमफालींत सर्व संक्रमण होतें.

सर्वसंक्रमण होणाऱ्या ५२ प्रकृतींचीं नांवें.

**गाथा** ४१७—११ तिर्यक् एकादश [ गाथा ४१४ पहा ], १३ उद्वेलनप्रकृति [ गाथा ४१५ पहा ], २५ मोहनीयाच्या प्रकृति [ २८–३ संज्वलन लोभ १, सम्य-क्त्वमोहनीय मिश्रमोहनीय ] ३ स्त्यानगृद्धि निद्रा=५२.

कोणत्या प्रकृतींत किती संक्रमणें होतात.

| **गाथा** ४१८–प्रकृतींची संख्या | संक्रमणांची संख्या. |
|---|---|
| ३९ | १ |
| ३० | ४ |
| ७ | २ |
| २० | ३ |

| | |
|---|---|
| १ | ३ |
| १ | ४ |
| १२ | ५ |
| ४ | २ |
| ४ | २ |
| ४ | ३ |
| १२२ | |

या १२२ प्रकृतींत ४ आयु: प्रकृति आल्या नाहींत परंतु वर्णादिकांच्या प्रकृति ४ च्या ऐवजीं ४ शुभवर्णादि व ४ अशुभवर्णादि मिळून ८ प्रकृति यांत घेतल्यामुळें १२२ प्रकृति झाल्या.

**गाथा ४१९ ते ४२८**–कोणत्या प्रकृतींत कोणतें संक्रमण होतें याचा नकाशा.

## [ कोष्टक नं. १४२ ]

| प्रकृतींचें नांव | अध:प्रवृत्त | उद्वेलन संक्रमण | विध्यात संक्रमण | गुण संक्रमण | सर्व संक्रमण |
|---|---|---|---|---|---|
| ३९ प्रकृतींचा तपशील. | ,, | | | | |
| ५ ज्ञानावरण | ,, | | | | |
| ४ दर्शनावरण | ,, | | | | |
| ५ अंतराय | ,, | | | | |
| १ सातावेदनीय | ,, | | | | |
| १ संज्वलनलोभ | ,, | | | | |
| १ पंचेंद्रिय जाति | ,, | | | | |
| २ तैजसकार्मण. | ,, | | | | |
| १ समचतुरस्रसंस्था | ,, | | | | |
| ४ वर्णादि शुभ | ,, | | | | |
| १ अगुरुलघु | ,, | | | | |
| १ परघात | ,, | | | | |
| १ उच्छ्वास | ,, | | | | |
| १ प्रशस्तविहायोगति | ,, | | | | |
| १ त्रस | ,, | | | | |
| १ बादर | ,, | | | | |
| १ पर्याप्त | ,, | | | | |
| १ प्रत्येक | ,, | | | | |

| प्रकृतीचें नांव | अध:प्रवृत्त | उद्वेलन संक्रमण | विध्यात संक्रमण | गुण संक्रमण | सर्व संक्रमण |
|---|---|---|---|---|---|
| १ स्थिर | ,, | | | | |
| १ शुभ | ,, | | | | |
| १ सुभग | ,, | | | | |
| १ सुस्वर | ,, | | | | |
| १ आदेय | ,, | | | | |
| १ यशस्कीर्ति | ,, | | | | |
| १ निर्माण. | ,, | | | | |
| २९ | | | | | |
| ३० प्रकृतींचा तपशील. | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| ३ स्त्यानगृध्यादि | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १२ कषाय. अनंतानुबंधि अप्रत्याख्यान, प्रत्याख्यान | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ नपुंसकवेद | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ स्त्रीवेद | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ अरति | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ शोक | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| २ तिर्यंचद्विक | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| ४ एकेंद्रियादिजाति | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ आतप | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ उद्योत | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ स्थावर | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ सूक्ष्म | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| १ साधारण | ,, | ० | ,, | ,, | ,, |
| ३० | | | | | |
| ७ प्रकृतींचा तपशील | | | | | |
| १ निद्रा | ,, | ० | ० | ,, | ० |
| १ प्रचला | ,, | ० | ० | ,, | ० |
| ४ अशुभवर्णादि | ,, | ० | ० | ,, | ० |
| १ उपघात | ,, | ० | ० | ,, | ० |
| ७ | | | | | |

| प्रकृतीचें नांव | अध:प्रवृत्त संक्रमण | उद्वेलन संक्रमण | विध्यात संक्रमण | गुण संक्रमण | सर्व संक्रमण |
| --- | --- | --- | --- | --- | --- |
| २० प्रकृतींचा तपशील | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ असातावेदनीय | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अप्रशस्तविहायोग. | ,, | ० | ,, | ,, | ० |
| ५ संहनन ( वज्रवृषभ नाराच सोडून ) | ,, | ० | ,, | ,, | ० |
| ५ संस्थान [ पहिलें समचतुरस्र सोडून ] | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ नीचगोत्र | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अपर्याप्त | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अस्थिर | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अशुभ | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ दुर्भग | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ दुःस्वर | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अनादेय | ,, | ० | ,, | ,, | ० |
| १ अयशस्कीर्ति | ,, | ० | ,, | ,, | ० |
| २० | | | | | |
| १ मिथ्यात्व | ० | ० | ,, | ,, | ,, |
| १ सम्यक्त्वमोहनीय | अध:प्रवृत्त | ,, | ० | ,, | ,, |
| १२ प्रकृतींचा तपशील | ,, | ,, | विध्यात | ,, | ,, |
| २ आहारकाद्विक | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| १ मिश्रमोहनीय | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| २ देवद्विक | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| २ नरकद्विक | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| २ वैक्रियिकद्विक | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| १ उच्चगोत्र | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| २ मनुष्यद्विक | ,, | ,, | ,, | ,, | ,, |
| १२ | | | | | |
| ४ प्रकृतींचा तपशील | ,, | ० | ० | ० | ,, |
| ३ संज्वलन १क्रोध, १मान १ माया. | ,, | ० | ० | ० | ,, |
| १ पुरुषवेद | ,, | ० | ० | ० | ,, |
| ४ | | | | | |

| प्रकृतींचें नांव | अध:प्रवृत्त संक्रमण | उद्वेलन संक्रमण | विध्यात संक्रमण | गुण संक्रमण | सर्व संक्रमण |
|---|---|---|---|---|---|
| ४ प्रकृतींचा तपशील | | | | | |
| २ औदारिक | ,, | ० | ,, | ० | ० |
| १ वज्रवृषभनाराच. | ,, | ० | ,, | ० | ० |
| १ तीर्थंकर | ,, | ० | ,, | ० | ० |
| ४ | | | | | |
| ४ प्रकृतींचा तपशील | | | | | |
| १ हास्य | ,, | ० | ० | गुण संक्रमण | सर्व संक्र. |
| १ रति | ,, | ० | ० | ,, | ,, |
| १ भय | ,, | ० | ० | ,, | ,, |
| १ जुगुप्सा | ,, | ० | ० | ,, | ,, |
| | १२१ | १३ | ६७ | ७५ | ५२ |

**गाथा** ४२९–दहाव्या गुणस्थानापर्यंतच कषायांचा उदय असल्यामुळे स्थिति व अनुभागबंधही १० व्या गुणस्थानापर्यंतच होतो. सातावेदनीयाचा प्रकृति व प्रदेशबंध ११ ते १३ गुणस्थानापर्यंत होतो. बंधरूप झालेल्या परमाणूंचें संक्रमण १० व्या गुणस्थानापर्यंतच होतें.

**गाथा** ४३० ते ४३५ पंचभागहारा [ गाथा ४०९ पहा ] चें अल्पबहुत्व.

[१] सर्वसंक्रमण भागहाराचें प्रमाण सर्वांहून कमी म्हणजे एक आहे.

[२] गुणसंक्रमणाच्या भागहाराचें प्रमाण सर्वसंक्रमणाच्या भागहाराच्या असंख्यातपट आहे म्हणजे पल्ल्याच्या अर्धच्छेदाच्या असंख्यातव्या भागा [ इतकें ]

[३] अध:प्रवृत्त-संक्रमणाच्या भागहाराचें प्रमाण गुणसंक्रमणाच्या भागहाराच्या असंख्यात पट–तें प्रमाण ही पल्ल्याच्या अर्धच्छेदाच्या असंख्यातव्या भागाइतकेंच आहे.

[४] विध्यातसंक्रमणाच्या भागहाराचें प्रमाण अध:प्रवृत्ताच्या असंख्यातपट म्हणजे सूच्यंगुलाच्या असंख्यातव्या भागाइतकें.

[५] उद्वेलन-संक्रमणाच्या भागहाराचें प्रमाण विध्यातसंक्रमणाच्या असंख्यातपट म्हणजे सूच्यंगुलाच्या असंख्यातव्या भागाइतकें.

नोट—ज्याच्या भागहाराचें प्रमाण ज्यास्त त्याचा भागाकार कमी येईल म्हणजे **कमी परमाणूंचें संक्रमण होईल.** व ज्याचा भागहार कमी त्याचा भागाकार ज्यास्त येईल **म्हणजे** ज्यास्त परमाणूंचें संक्रमण होईल.

## पंचभागहारचूलिका समाप्त.



# दशकरणनामक तृतीय चूलिका.

**गाथा** ४३६—ज्यांच्या पादप्रसादानें वीर इंद्रनंदि आचार्यांचा शिष्य जो मी ग्रंथकर्ता संसारसमुद्रांतून उत्तीर्ण झालों त्या अभयनंदिश्रुतगुरूस मी नमस्कार करितों.

**गाथा** ४३७—कर्मप्रकृतींत दहा करणें होऊं शकतात.

१ बंध, २ उत्कर्षण, ३ संक्रम, ४ अपकर्षण, ५ उदीरणा, ६ सत्त्व, ७ उदय ८ उपशम, ९ निधत्ति, १० निष्काचना.

**गाथा** ४३८—

[ १ ] **बंधः**—मिथ्यात्वादि परिणामांनीं पुद्गलद्रव्यांचें जें ज्ञानावरणादिरूप परिणमन तें.

[ २ ] **उत्कर्षण**—कर्मांच्या स्थिति व अनुभागांत वाढ होणें तें.

[ ३ ] **संक्रमः**—कर्मप्रकृतीचें पहिलें रूप बदलून दुसऱ्या प्रकृतींत परिणमन होणें तें.

[ ४ ] **अपकर्षणः**—कर्मांच्या स्थिति व अनुभागांत हानि होणें तें.

**गाथा** ४३९—

[ ५ ] **उदीरणाः**—उदयावलीच्या बाहेर असणाऱ्या द्रव्याचें अपकर्षण होऊन उदयावलींत येणें म्हणजे ज्या कर्मप्रकृतीच्या निषेकाचा उदयकाल अजून आला नाहीं त्याची स्थिति कमी करून तो निषेक उदय पावणाऱ्या द्रव्यांत मिळविणें तें.

[ ६ ] **सत्त्वः**—पुद्गलांचें कर्मरूप राहणें तें.

[ ७ ] **उदयः**—कर्मांच्या स्थितिकालाची समाप्ति ती.

**गाथा** ४४०—

[ ८ ] **उपशमः**—कर्माचें उदयावलींत न येऊं शकणें.

[ ९ ] **निधत्ति**—जींत उदीरणा व संक्रमण होऊं शकत नाहीं अशी कर्माची स्थिति ती.

[ १० ] **निष्काचनाः**—जींत उदीरणा, संक्रमण, उत्कर्षण व अपकर्षण होऊं **शकत** नाहीं अशी कर्माची स्थिति ती.

**गाथा ४४१**–चार आयूंत संक्रमण सोडून बाकीचीं ९ करणें होतात आणि बाकीच्या सर्व कर्मांत दहाही करणें होऊं शकतील. पहिल्या गुणस्थानापासून ८ व्या गुणस्थानापर्यंत दहाही करणें होतात.

**गाथा ४४२**–९ । १० या दोन गुणस्थानांत उपशम, निधत्ति व निष्काचना हीं तीन करणें होत नाहींत बाकीचीं ७ करणें होतात. व ११-१२-१३ या गुणस्थानांत संक्रमण हीं होत नाहीं म्हणजे या तीन गुणस्थानांत ६ च करणें होऊं शकतात व अयोगी गुणस्थानांत सत्त्व व उदय हीं दोनच करणें होतात.

**गाथा ४४३**–उपशांतकषाय नामक ११ व्या गुणस्थानांत मिथ्यात्व व मिश्र प्रकृतींच्या परमाणूंचें संक्रमण सम्यक्त्वमोहनीयांत होतें म्हणून ७ करणें होतात. इतर कर्मांत संक्रमणकरण होत नसल्यामुळें ६ करणें होतात.

**गाथा ४४४**–ज्या प्रकृतीचीं जेथपर्यंत ( ज्या गुणस्थानांत ) बंधव्युच्छित्ति होईल तेथपर्यंतच त्या प्रकृतीचें बंधकरण व उत्कर्षणकरण होतें. आपल्या जातीच्या प्रकृतींत संक्रमण होतें तें त्या प्रकृतीची बंध व्युच्छित्ति जेथें होत असेल तेथपर्यंतच होईल. जसें—

ज्ञानावरणाच्या ५ प्रकृति एका जातीच्या आहेत त्यांची बंधव्युच्छित्ति दहाव्या गुणस्थानांत होते. म्हणून त्यांचें संक्रमणही १० व्या गुणस्थानापर्यंत होईल.

**गाथा ४४५**–अयोगीगुणस्थानांत ज्या ८५ प्रकृतींचें सत्त्व असतें त्यांचें अपकर्षण सयोगी गुणस्थानापर्यंत होतें म्हणजे १३ व्या गुणस्थानाच्या अंतसमयापर्यंत होतें. ( कोष्टक ११६ व १२५ पहा. )

क्षीणकषाय गुणस्थानांत १६ प्रकृतींची व १० व्या गुणस्थानांत सूक्ष्मलोभाची सत्ता-व्युच्छित्ति सांगितली आहे. या १७ प्रकृतींचें अपकर्षण "**क्षयदेश**" पर्यंत होईल. [ कोष्टक ११६ व १२५ पहा. ]

ज्या प्रकृति अन्यप्रकृतिरूप होऊन नष्ट होतात त्या प्रकृतींस '**परमुखोदयी**' म्हणतात व ज्या प्रकृति आपल्या रूपांनच उदय पावून नष्ट होतात त्यांना '**स्वमुखोदयी**' म्हणतात.

परमुखोदयी प्रकृतींचा **क्षयदेश** अंतकांडकाची अंतफाली व स्वमुखोदयी प्रकृतींचा **क्षयदेश** एक आवली व एक समय असतो.

वर लिहिलेल्या १७ प्रकृति स्वमुखोदयी आहेत म्हणून यांचा क्षयदेश एक आवली एक समय आहे म्हणजे एक आवली एक समयपर्यंत या प्रकृतींचें अपकर्षण होतें.

**गाथा ४४६**–देवायूचें अपकर्षणकरण उपशांतकषायापर्यंत होतें व मिथ्यात्व, सम्यङ्मिथ्यात्व, व सम्यक्त्वप्रकृति या तीन प्रकृति व नवव्या गुणस्थानांत नष्ट होणाऱ्या

१६ प्रकृति मिळून १९ प्रकृतींचें अपकर्षण क्षयदेशापर्यंत होतें म्हणजे अंतकांडकाच्या अंतफालीपर्यंत होतें. अनिवृत्ति करणाच्या दुसऱ्या भागापासून नवव्या भागापर्यंत नष्ट होणाऱ्या २० प्रकृतींचें अपकर्षण आपआपल्या क्षयदेशापर्यंत होतें. ज्या स्थानांत क्षय होतो त्या स्थानास क्षयदेश म्हणतात. ( कोष्टक ११६ पहा. )

**गाथा ४४७**–उपशमश्रेणींत मिथ्यात्व, मिश्र, व सम्यक्त्वप्रकृति आणि नवव्या गुणस्थानाच्या पहिल्या भागांत नष्ट होणाऱ्या नरकद्विकादि १६ प्रकृति या १९ प्रकृतींचें अपकर्षण ११व्या गुणस्थानापर्यंत होतें. परंतु बाकीच्या आठ कषाय वगैरे (नवव्या गुणस्थानांत नष्ट होणाऱ्या) २० प्रकृतींचें अपकर्षण उपशमश्रेणींत आपआपल्या उपशमस्थानापर्यंत होते. [ को. ११६ पहा. ]

**गाथा ४४८**–अनंतानुबंधि चार कषायांचें अपकर्षण ४थ्या पासून ७व्या गुणनापर्यंत ( जिथें त्यांचें विसंयोजन होईल तेथपर्यंत ) होईल. नरकायुची उदीरणा, सत्त्व व उदय हीं ४ थ्या गुणस्थानापर्यंत व तिर्यंचायूची उदीरणा, सत्त्व व उदय हीं ५ व्या गुणस्थानापर्यंत होतील.

**गाथा ४४९**–मिथ्यात्वप्रकृतीची उदीरणा मिथ्यात्व गुणस्थानांत उपशम सम्यक्त्वाप्रत सन्मुख झालेल्या जीवांस एक समय अधिक एक आवलीपर्यंत होते. सूक्ष्मलोभाची उदीरणा १०व्या गुणस्थानांतच होते.

**गाथा ४५०**–उपशमकरण, निधत्तिकरण, व निकाचित करण, हीं तीन द्रव्यें ८ व्या गुणस्थानापर्यंतच असतात.

**दशकरण–चूलिका समाप्त. चतुर्थाधिकार समाप्त**

---

# स्थानसमुत्कीर्तनाधिकार. ( ५ )

**गाथा ४५१**–सत्ययुधिष्ठिरांनीं ज्याला प्रत्यक्ष नमस्कार केला त्या नेमिनाथ तीर्थंकराला नमस्कार करून बंध, उदय, सत्ता यांनीं युक्त असें स्थान–समुत्कीर्तन मीं सांगेन.

पूर्वी प्रकृति–समुत्कीर्तन नामक अधिकारांत ज्या प्रकृति सांगितल्या त्यांचा बंध वगैरे क्रमानें होतो कीं क्रमावांचून होतो हें कळण्याकरितां हा अधिकार सांगितला आहे.

एका जीवाला एके काळीं जितक्या प्रकृति संभवतात. म्हणजे एका जीवाला एकेकाळीं जितक्या प्रकृतींचा बंध, उदय व सत्ता हीं असूं शकतात त्यांच्या समूहाला '**स्थान**' म्हणतात.

**गाथा ४५२**–तिसरें गुणस्थान सोडून अप्रमत्तापर्यंत [ १-२-४-५-६-७ ] सहा गुणस्थानांत आयुवांचून सात व आयुसहित ८ आठ प्रकारच्या मूलकर्मांचा बंध होतो,

३--८--९ या तीन गुणस्थानांत आयु सोडून ७ मूल प्रकृतींचा बंध होतो. १० व्या गुणस्थानांत आयु व मोह सोडून ६ मूल प्रकृतींचा व ११--१२--१३ या गुणस्थानांत एक वेदनीय कर्माचाच बंध होतो. १४ व्या गुणस्थानांत बंध नाहीं.

याप्रमाणें सर्व गुणस्थानांत मिळून मूलप्रकृतींच्या बंधाचीं चार स्थानें झालीं. ( ८--७--६--१ या प्रकृतींचा बंध संभवतो म्हणून चार स्थानें होतात. )

**गाथा ४५३**–बंध चार प्रकारचा होतो ते प्रकार.

१ भुजाकार, २ अल्पतर, ३ अवस्थित, ४ अवक्तव्य.

[१] भुजाकार—पूर्वी थोड्या प्रकृति बांधून पुढें अधिक प्रकृतींचा बंध होणें तो.

[२] अल्पतर—पूर्वी अधिक प्रकृति बांधून नंतर कमी बांधणें तो.

[३] अवस्थित—जितक्या प्रकृति पहिल्या समयांत बांधिल्या तितक्याच पुढील समयांत बांधणें तो.

[४] अवक्तव्य—ज्या मूळ प्रकृतींचा पूर्वी बंध मुळींच नव्हता तिचा पुढें बंध होणें. हा अवक्तव्य बंध मूळप्रकृतींत होत नाहीं उत्तर प्रकृतींत संभवतो.

४

मूळप्रकृतींत बंधस्थानें ( ८-७-६-१ अशीं ) चार होतात. यांतून भुजाकार बंध तीन होतात. उपशांतकषायांत एका वेदनीय कर्माचा बंध होता तिथून सूक्ष्मसांपरायांत आला. त्यावेळीं ६ मूल प्रकृतींचा बंध होऊं लागला म्हणजे एका नंतर ६ प्रकृतींचा बंध होणें हा एक भुजाकार.

सूक्ष्मसांपरायांतील जीव नवव्या गुणस्थानांत आला तेव्हां ७ मूल प्रकृतींचा बंध होऊं लागतो म्हणून हा दुसरा भुजाकार.

९ व्या गुणस्थानांतून ८ व्या गुणस्थानांत आला तर ७ च प्रकृतींचा बंध होईल. ८ व्यांतून खालील गुणस्थानांत गेल्यास आयुबंधासह ८ प्रकृतींचा बंध संभवतो. म्हणजे सात ७ नंतर ८ आठ प्रकृतींचा बंध आला म्हणून हा तिसरा भुजाकार. ( हीं तीन स्थानें भुजाकाराचीं झालीं ) १ ते ६, ६ ते ७, ७ ते ८. वरील गुणस्थानांत चढतांना अल्पतर बंधाचीं तीन स्थानें संभवतात. ८ प्रकृतींचा बंध अगोदर होत होता त्याला पुढील गुणस्थानांत ७ प्रकृतींचा बंध झाला तर अल्पतर बंधाचें हें **पहिलें स्थान.**

७ प्रकृतींचा बंध होत होता त्याला पुढील गुणस्थानांत ६ प्रकृतींचा बंध होऊं लागला म्हणजे हें अल्पतर बंधाचें **दुसरें स्थान.** व ६ प्रकृतींचा बंध होत होता त्याला पुढें १ प्रकृतीचा बंध होऊं लागला म्हणजे अल्पतरबंधाचें हें **तिसरें स्थान.** ( ८ ते ७, ७ ते ६, ६ ते १ हीं अल्पतरबंधाचीं तीन स्थानें )

अवस्थित बंधाचीं चार स्थानें ( ८-७-६-१ ) कारण पहिल्या समयांत व पुढील
( ८-७-६-१ )
समयांत ८ चाच ७ चाच ६ चाच व १ चाच बंध होणें संभवनीय आहे. सातव्या गुणस्थानापासून ११ व्या गुणस्थानापर्यंत उपशमश्रेणी चढणारा जीव क्रमा क्रमानें एक एक गुणस्थान चढत जातो व ११ व्या गुणस्थानापासून सातव्या गुणस्थानापर्यंत उतरणारा जीवही क्रमा क्रमानें एक एक गुणस्थान उतरत जातो. क्रम सोडून एकदम चढत ही नाहीं व उतरतही नाहीं

शंका:—११ व्या गुणस्थानांत एखादा जीव मरण पावला व तो देवगतीत गेला तर [ ११ व्या गुणस्थानांत १ वेदनीयाचाच बंध देवगतींत ४ व्या गुणस्थानांत आयुर्बंध सोडून ७ प्रकृतींचा बंध असतो म्हणून ) १ नंतर ७ हा भुजाकार बंध किंवा एक नंतर ८ हा भुजाकारबंध संभवतो पण तो कां सांगितला नाहीं याचें समाधान.

उत्तर:—अबद्धायूला मरण नसतें म्हणून एकापासून ७ साताचा बंधरूप भुजाकाराचा अभाव आहे. व बद्धायूचें मरण होऊन तो असंयत गुणस्थानवर्ती देव होतो तेथें देवायूंतून सहा महिने उरले असतांच आयुर्बंध होतो त्या अर्थी एकापासून आठाच्या बंधरूप भुजाकाराचा अभाव आहे म्हणून सांगितले नाहीत.

### उदय

**गाथा** ४५४—दहाव्या गुणस्थानापर्यंत आठही कर्मांचा उदय असतो; ११-१२ गुणस्थानांत मोहनीय सोडून सात कर्मांचा व १३-१४ या गुणस्थानांत चार अघाति कर्मांचा उदय असतो.

### उदीरणा,

**गाथा ४५५**—मोहनीयकर्माची उदीरणा १० व्या गुणस्थानापर्यंत होते बाकीच्या तीन ( ज्ञानावरण, दर्शनावरण, अंतराय ) कर्मांची उदीरणा १२ व्या गुणस्थानापर्यंत होते. वेदनीय आणि आयुकर्माची उदीरणा ६ व्या गुणस्थानापर्यंत होते. व नाम आणि गोत्र कर्मांची उदीरणा १३ व्या गुणस्थानापर्यंत होते.

**गाथा ४५६**—मिश्रगुणस्थानांत भुज्यमान आयूचा एक आवलिकाल शिल्लक राहिला म्हणजे ३ रें गुणस्थान सुटून अन्य गुणस्थानांत जातो. मिश्र वगळून प्रमत्तापर्यंत [ १—२—४—५—६ ] पांच गुणस्थानांत आयूचा एक आवलिकाल बाकी राहील तेव्हां त्या आवलींत आयु विना सात कर्मांची उदीरणा होते. सूक्ष्मसांपराय गुणस्थानांतही एक आवलिकाल बाकी राहील तेव्हां त्या आवलिकालांत आयु, मोहनीय, व वेदनीय हीं सोडून बाकीच्या पांच कर्मांची उदीरणा होते.

क्षीणकषाय गुणस्थानांतही एक आवलिकाल बाकी राहील तेव्हां त्या आवलिकालांत नाम गोत्र या दोन कर्मांची उदीरणा होते.

## सत्ता.

**गाथा** ४५७–एक पासून अकराव्या गुणस्थानापर्यंत ८ कर्मांची, बाराव्यांत मोह सोडून ७ कर्मांची व १३–१४ या गुणस्थानांत ४ अघाति कर्मांचीच सत्ता असते.

## उत्तर प्रकृतींचें स्थानसमुत्कीर्तन.

| | | |
|---|---|---|
| **गाथा** ४५८–दर्शनावरणाचीं बंध स्थानें | | ३ |
| मोहनीयचीं | ,, | १० |
| नाम कर्माचीं | ,, | ८ |
| ज्ञानावरणाचें | ,, | १ |
| अंतरायचें | ,, | १ |
| गोत्राचें | ,, | १ |
| आयूचें | ,, | १ |
| वेदनीयाचें | ,, | १ |

**गाथा** ४५९.–दर्शनावरणाचीं तीन बंधस्थानें ९–६–४ अशीं होतील.

९=चक्षु, अचक्षु, अवधि, केवल दर्शनावरण + ५ निद्रा.

६=९–३=स्त्यानगृद्धि, निद्रानिद्रा, प्रचलाप्रचला.

४=६–२=निद्रा व प्रचला.

यांत भुजाकार बंध २ होतील. उपशमश्रेणींतून उतरतांना अपूर्वकरणाच्या दुसऱ्या भागांत चार प्रकृतींचा बंध करून अपूर्वकरणाच्या प्रथम भागांत आल्यास सहा प्रकृतींचा बंध होतो म्हणून हा एक भुजाकार–मग मिश्र गुणस्थानापर्यंत सहा प्रकृतींचा बंध होतो व तेथून पहिल्या गुणस्थानांत आल्यास नऊ प्रकृतींचा बंध होतो अथवा मिश्र गुणस्थानांतून प्रथमोपशम सम्यक्त्वी होऊन सासादन गुणस्थानांत गेल्यास ९ प्रकृतींचा बंध होईल हा दुसरा भुजाकार

| | |
|---|---|
| ४ | ६ |
| ६ | ९ |

अल्पतर बंधस्थानें २ होतील. प्रथमोपशम सम्यक्त्वाला सन्मुख झालेला मिथ्यादृष्टि जीव अनिवृत्तिकरण लब्धीच्या शेवटच्या समयांत ९ दर्शनावरणीय प्रकृतींचा बंध पावून पुढें तो ४-५-७ या पैकीं एखाद्या गुणस्थानांत गेल्यास ६ प्रकृति बांधील हा एक अल्पतर (१) उपशमक अथवा क्षपक जीव अपूर्वकरणाच्या पहिल्या भागाच्या अंतिम समयांत

६ दर्शनावरण प्रकृतींचा बंध पावेल नंतर दुसऱ्या भागाच्या पहिल्या समयांत १ निद्रा, १ प्रचला कमी होऊन ४ प्रकृतींचा बंध पावेल. हा दुसरा अल्पतर ( $\frac{६}{४}$ )

अवस्थित बंध तीन होतील.

| | | |
|---|---|---|
| ९ | ६ | ४ |
| ९ | ६ | ४ |

अवक्तव्यबंध दोन होतील. $\frac{०}{४}$ $\frac{०}{६}$

अकराव्या गुणस्थानांत दर्शनावरणाचा बंध नसतो. तेथून १० व्या गुणस्थानांत आल्यास ४ दर्शनावरणाचा बंध होईल. हा १ ला अवक्तव्य बंध होय.

११ व्या गुणस्थानांतील बद्धायु जीव मरून देव [ असंयत ] होईल. तिथें ६ दर्शनावरणाचा बंध होईल म्हणून हा दुसरा अवक्तव्य बंध होय.

**गाथा** ४६०—दर्शनावरणाच्या ९ प्रकृतींचा बंध सासादन गुणस्थानापर्यंतच होतो. पुढें ८ व्याच्या १ ल्या भागापर्यंत ६ प्रकृतींचाच होतो. आणि पुढें १० व्याच्या अंत समयापर्यंत ४ प्रकृतींचाच बंध होतो.

## दर्शनावरणाचा उदय.

**गाथा** ४६१—दर्शनावरणाच्या ४ प्रकृतींचा उदय होतो असें एकस्थान जाग्रत जीवांत १ ल्या गुणस्थानापासून १२ व्या गुणस्थानाच्या अंतापर्यंत होतें ( चार प्रकृती म्हणजे चक्षु, अचक्षु, अवधि, केवलदर्शन. ) परंतु निद्रावान् जीवांत ६ व्या गुणस्थानापर्यंत ५ प्रकृतींचें एक उदयस्थान होतें. पांच प्रकृति म्हणजे वरील ४ व पांच निद्रांपैकीं कोणती तरी एक निद्रा. सातव्या पासून १२ व्या गुणस्थानाच्या द्विचरम समयापर्यंत ही पांच प्रकृतींचें एक उदयस्थान होईल. म्हणजे चक्षु आदि ४ व पहिल्या दोन निद्रांपैकीं एक निद्रा, कारण कीं स्त्यानगृद्धि, निद्रानिद्रा, प्रचलाप्रचला या ३ हींचा उदय ६ व्या गुणस्थानापर्यंतच असतो.

## दर्शनावरणाची सत्ता.

**गाथा** ४६२-दर्शनावरण ९ प्रकृतींचें सत्त्वस्थान पहिल्या गुणस्थानापासून उपशम श्रेणीच्या ११ व्या गुणस्थानापर्यंत व क्षपकश्रेणींत ९ व्या गुणस्थानाच्या प्रथम भागापर्यंत असतें.

पुढें क्षीणकषायाच्या द्विचरमसमयापर्यंत ६ प्रकृतींचें सत्त्वस्थान असतें ६=९-३ स्त्यानगृद्ध्यादि निद्रा.

क्षीणकषायाच्या अंतसमयांत निद्रा, प्रचला सोडून चार प्रकृतींचेंच सत्व असतें. पुढें सत्त्वाचा अभाव असतो.

## मोहनीय कर्माचीं बंधस्थानें.

**गाथा ४६३**–मोहनीय कर्माचीं बंधस्थानें १०

| | |
|---|---|
| बंधस्थान पहिलें—२२ प्रकृतीचें | बंधस्थान सहावें पांच ५ प्रकृतीचें |
| ,, दुसरें—२१ ,, | ,, सातवें ४ चार ,, |
| ,, तिसरें—१७ ,, | ,, आठवें ३ ,, |
| ,, चौथें—१३ ,, | ,, नववें २ ,, |
| ,, पांचवें ९ ,, | ,, दहावें १ ,, |

**गाथा ४६४** गुणस्थानापेक्षनें बंधस्थानें.

मिथ्यात्वगुणस्थानांत २२ प्रकृतींचा बंध.

सासादन ,, २१ ,, प्रमत्त, अप्रमत्त } ,, ९ ,, ,,

मिश्र व असंयत १७ ,, अपूर्वकरण }

देशसंयत ,, १३ ,, अनिवृत्तिकरण५,४,३,२,१ प्रकृतींचा बंध

**गाथा ४६५**–वरील गाथेंत सांगितलेल्या प्रकृतींत ध्रुवबंधयोग्य प्रकृति किती असतात तें सांगतात. ज्यांचा बंध अवश्य होतो त्यांना ध्रुवबंध–प्रकृति म्हणतात.

पहिल्या गुणस्थानांत—१९ प्रकृति ध्रुवबंधाच्या आहेत. = ( १९ = १ मिथ्यात्व, १६ कषाय, १ भय, १ जुगुप्सा ).

३ प्रकृति अध्रुव बंधांच्या=हास्य व शोकांपैकीं १ एक, रति अरतिपैकीं १ एक, तीन वेदांपैकीं १ एक मिळून ध्रुव-प्रकृति १९ + अध्रुव प्रकृति ३ = २२.

२ ऱ्या गुणस्थानांत—१८ प्रकृति ध्रुव [ १९–१ मिथ्यात्व = १८ ]

३ ,, अध्रुव पहिल्या गुणस्थानाप्रमाणें.

२१.

३-४ गुणस्थानांत —१४ प्रकृति ध्रुव [ १८–४ अनंतानुबंधि कषाय ]

३ ,, अध्रुव १ ल्या गु०प्रमाणें.

१७.

५ऱ्या ,, १० प्र०ध्रुव [ १४–४ अप्रत्याख्यानावरण ]

३ प्र०अध्रुव १ल्या गु०प्रमाणें.

१३.

६,७,८ व्या ,, ६ प्र०ध्रुव [ १०–४, प्रत्याख्यानावरण ]

३ प्र० अध्रुव.
—
९.

९ व्या गुणस्थानाच्या प्रथम भागांत ४ ध्रुव संज्वलन ( ६–२ भय–जुगुप्सा )
,, ,, १ अध्रुव पुरुष वेद.
—
५

,, २ऱ्या ,, ४ संज्वलन.
,, ३ऱ्या ,, ३ ,, [ ४–१ संज्वलन क्रोध ]
,, ४थ्या ,, २ ध्रुवप्रकृति [ ३–१ संज्वलन मान ]
,, ५व्या ,, १ ,, [ २–१ माया. ]

**गाथा ४६६– बंधस्थानांचे भंग.**

मिथ्यात्वगुणस्थानांत २२ प्रकृतींचा बंध होतो. त्याचे भंग ६.

१ भंग = १ मि. + १६ कषाय + १ पु.वेद + २ हास्यरति, + २ भयजुगुप्सा
१ ,, = १ मि. + १६ कषाय + १ स्त्रीवेद + २ हास्यरति + २ भयजुगुप्सा
१ ,, = १ मि. + १६ कषाय + १ नपुं.वेद + २ ,, + २ ,,
१ ,, = १ मि. + १६ ,, + १ पु० वे० + २ शोक अरति + २ ,,
१ ,, = १ मि. + १६ ,, + १ स्त्रीवेद + २ ,, + २ ,,
१ ,, = १ मि. + १६ ,, + १ नपुं.वेद + २ ,, + २ ,,
—
६ सासादन गुणस्थानांत २१ प्रकृतींचा बंध होतो. त्याचे भंग ४.

१ भंग = १६ कषाय + १ पु. वेद. + २ हास्यरति + २ भय जुगुप्सा.
१ भंग = १६ ,, + १ स्त्री ,, + २ ,, + २ ,,
१ भंग = १६ ,, + १ पु. वेद. + २ शोक अरति २ ,,
१ भंग = १६ ,, + १ स्त्री ,, + २ ,, + २ ,,

३–४ गुणस्थानांत १७ प्रकृतींचा बंध होतो. त्याचे भंग. २ | २

१ भंग = १२ कषाय + १ पु. वेद. + २ हास्यरति + २ भय जुगुप्सा
१ भंग = १२ ,, + १ ,, + २ शोक अरति + २ ,,

५ व्या गुणस्थानांत १३ प्रकृतींचा बंध होतो. त्यांचे भंग २

१ भंग = ८ कषाय + १ पु. वेद + २ हास्यरति + २ भयजुगुप्सा.
१ ,, = ८ ,, + १ ,, + २ शोक अरति + २ ,,

६ व्या गुणस्थानांत ९ प्रकृतींचा बंध होतो. त्याचे भंग २

१ भंग = ४ कषाय + १ पु. वेद + २ हास्यरति + २ भयजुगुप्सा.

१ ,, = ४ ,, + १ ,, + २ शोकअरति+ २ ,,

७ व्या व ८ व्या गुणस्थानांत ९ प्रकृतींचा बंध होतो. त्याचा भंग १ | १

१ भंग = ४ कषाय + १ पु. वेद + २ हास्यरति + २ भय जुगुप्सा.

९ व्या गुणस्थानांतील. प्रथम भागांत ५ प्रकृतींचा बंध होतो. त्याचा भंग १

१ भंग = ४ कषाय + १ पु. वेद.

दुसऱ्या भागांत ४ प्रकृतींचा बंध होतो. त्याचा भंग १

१ भंग = ४ संज्वलनकषाय.

३ ऱ्या भागांत ३ प्रकृतींचा बंध होतो. त्याचा भंग १

१ भंग = ३ कषाय संज्वलन [ १ मान, १ माया, १ लोभ ]

४ थ्या भागांत २ प्रकृतींचा बंध होतो त्याचा भंग १

१ भंग = २ कषाय संज्वलन [ माया, लोभ ]

५ व्या भागांत १ बंध होतो त्याचा भंग १

१ भंग = १ कषाय संज्वलन लोभ.

**गाथा ४६७**-भंगांची संख्या.

| | | | |
|---|---|---|---|
| १ ल्या गुणस्थानांत | ६ | ९ व्या गुण. दुसऱ्या भागांत | १ |
| २ ऱ्या ,, | ४ | तिसऱ्या ,, | १ |
| ३ ऱ्या ,, | २ | चौथ्या ,, | १ |
| ४ थ्या ,, | २ | पांचव्या ,, | १ |
| ५ व्या ,, | २ | | —— |
| ६ व्या ,, | २ | | २५ |
| ७ व्या ,, | १ | | |
| ८ व्या ,, | १ | | |
| ९ व्या ,, च्या पहिल्या भागांत | १ | | |

**गाथा** ४६८ मोहनीय कर्माच्या बंधाचे प्रकार ३.

१ भुजाकार—यांचीं स्थानें २०

१ अल्पतर— ,, ,, ११

१ अवस्थित— ,, ,, ३३

**गाथा** ४६९ अगोदर थोड्या प्रकृतींचा बंध होऊन पुढील समयांत अधिक प्रकृतींचा बंध होतो तो **भुजाकारबंध.**

अगोदर अधिक प्रकृतींचा बंध होऊन पुढील समयांत कमी प्रकृतींचा बंध होतो

तो अल्पतरबंध,

पहिल्या समयांत जितक्या प्रकृतींचा बंध होईल तितक्याच प्रकृतींचा बंध पुढील समयांत होतो तो **अवस्थितबंध.**

नोट—अगोदर मोहनीय कर्माचा बंध नसून पुढील समयांत त्याचा बंध झाल्यास तो **अवक्तव्यबंध.**

**गाथा ४७०** अवक्तव्यबंधांचीं स्थानें दोन आहेत.

( १ ) उपशमश्रेणीच्या दहाव्या गुणस्थानीं मोहनीयाचा बंध नव्हता तो जीव नवव्या गुणस्थानांत आल्यास त्यास मोहनीयाचा बंध होतो. हें पहिलें स्थान.

( १ ) दहाव्या गुणस्थानांत मरण पावून चौथ्या गुणस्थानांत आल्यावर जो मोहनीयाचा बंध होतो तें दुसरें स्थान.

वरील अवक्तव्य बंधस्थानांत दोन अवस्थित बंध ही होतात.

उदाहरणार्थः—[ १ ] दहाव्या गुणस्थानांतून नवव्या गुणस्थानांत आल्यावर पहिल्या समयांत लोभकषायाचा बंध होईल व पुढील समयांत ही लोभकषायाचा बंध होऊं शकेल म्हणून तो अवस्थितबंध म्हटला जाईल.

[ २ ] दहाव्या गुणस्थानांत मरून चौथ्या गुणस्थानांत आल्यास प्रथम समयांत १७ प्रकृतींचा बंध होईल व नंतरच्या समयांत ही १७ प्रकृतींचा बंध होऊं शकेल. या अपेक्षेनें तो अवस्थितबंध म्हटला जाईल.

भुजाकार, अल्पतर व अवस्थित बंध उत्पन्न होण्याचें विधान. भुजाकार—

१ नवव्या गुणस्थानांतील पांचव्या भागांत उपशम श्रेणीमध्यें संज्वलन लोभाचा बंध होत होता तो पतन पावून चौथ्या भागांत गेल्यास लोभ व माया या दोहोंचा तिथें बंध होईल. हा एक भुजाकार बंध. १ अथवा बद्धायु असल्यास नवव्या गुणस्थानाच्या पांचव्या भागांत मरण पावून चौथ्या गुणस्थानांत जाईल त्यावेळीं १७ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकारबंध. मिळून २

१ नवव्या गुणस्थानांतील चौथ्या भागांत लोभ व माया यांचा बंध होता तो पतन पावून तिसऱ्या भागांत जाईल त्यावेळीं लोभ, माया, मान, या तिहींचा बंध होईल हा एक भुजाकारबंध व—

१ चौथ्या भागांत मरण पावून चौथ्या गुणस्थानांत जाईल त्यावेळीं १७ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

—
२

१ नवव्या गुणस्थानांतील तिसऱ्या भागांत लोभ, माया, मान या कषायांचा बंध होता

तेथून पतन पावून दुसऱ्या भागांत जाईल. त्यावेळीं लोभ, मान, माया व क्रोध या चार संज्वलन कषायांचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध व–

१ तिसऱ्या भागांत मरण पावून चौथ्या गुणस्थानांत जाईल त्यावेळीं १७ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

२

१ नवव्या गुणस्थानांतील दुसऱ्या भागांत चार संज्वलन कषायांचा बंध असतो तेथून पतन पावून पहिल्या भागांत येईल. त्यावेळीं चार संज्वलन कषाय व पुरुषवेद एक मिळून पांचांचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध व–

१ या दुसऱ्या भागांत मरण पावून चौथ्या गुणस्थानांत जाईल त्यावेळीं १७ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकारबंध.

२

१ नवव्या गुणस्थानांतील पहिल्या भागांत पांच प्रकृतींचा बंध होता तेथून पतन पावून आठव्या गुणस्थानांत जाईल तेथें ९ प्रकृतींचा बंध होईल ( **गाथा ४६६ पहा** ) हा एक भुजाकार व–

१ मरण पावून चौथ्या गुणस्थानांत जाईल तेथें १७ प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध.

२

१ आठव्या गुणस्थानांतून ७ व्यांत व तेथून ६ व्यांत जाईल तेथें ९ प्रकृतींचा बंध होईल. सहाव्यांतून पतन पावून पांचव्या गुणस्थानांत जाईल तेथें १३ प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध. अथवा–

१ सहाव्या गुणस्थानांतून एकदम चौथ्या गुणस्थानांत जाईल किंवा मरणोत्तर चौथ्या गुणस्थानांत जाईल व तिथें १७ प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध.

१ सहाव्या गुणस्थानांतील प्रथमोपशम सम्यक्त्वी जीव तेथून पतन पावून एकदम २ ऱ्या गुणस्थानांत जाईल. तेथें २१ प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध.

१ तोच सहाव्या गुणस्थानांतील प्रथमोपशमसम्यक्त्वी अथवा वेदक सम्यक्त्वी जीव एकदम १ल्या गुणस्थानांत जाईल तिथें २२प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध.

४ याप्रमाणें ६ व्या गुणस्थानांतील जीवाचें ४ भुजाकार बंध झाले.

१ पांचव्या गुणस्थानांत १३ प्रकृतींचा बंध होता तेथून एकदम किंवा मरणोत्तर चौथ्या गुणस्थानांत जाईल तेव्हां १७ प्रकृतींचा बंध होईल हा एक भुजाकार बंध.

१ पांचव्या गुणस्थानांतील प्रथमोपशम सम्यक्त्वी जीव एकदम पतन पावून दुसऱ्या गुण-

स्थानांत जाईल तिथें २१ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

१ पांचव्या गुणस्थानांतील प्रथमोपशम सम्यक्त्वी किंवा वेदकसम्यक्त्वी जीव एकदम पहिल्या गुणस्थानांत जाईल तिथें २२ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

३

१ चौथ्या गुणस्थानांत १७ प्रकृति बांधणारा प्रथमोपशमसम्यक्त्वी जीव पतन पावून दुसऱ्या गुणस्थानांत जाईल तेथें २१ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

१ चौथ्या गुणस्थानांतील प्रथमोपशम अथवा वेदकसम्यक्त्वी जीव पतन पावून पहिल्या गुणस्थानांत जाईल अथवा मिश्र गुणस्थानवर्ती जीव मिथ्यात्व गुणस्थानांत येईल त्या वेळीं २२ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

२

१ सासादन गुण. त २१ प्रकृतींचा बंध होता तेथून पतन पावून १ ल्या गुणस्थानांत येईल त्यावेळीं २२ प्रकृतींचा बंध होईल. हा एक भुजाकार बंध.

१

२० एकूण २० भुजाकार बंध झाले.

अल्पतर:—

१ अनादि वा सादि मिथ्यादृष्टि जीव अनिवृत्तिकरण लब्धीच्या अंतसमयांत २२ प्रकृति बांधीत होता अनंतर समयांत ४ थ्या गुणस्थानांत प्रथमोपशमसम्यक्त्वी झाला किंवा सादिमिथ्यादृष्टि जीव सम्यक्त्व मोहनीयाच्या उदयानें वेदकसम्यक्त्वी होऊन ४ थ्या गुणस्थानांत आला तिथें १७ प्रकृति बांधील हा एक अल्पतर बंध.

१ तोच मिथ्यात्वी जीव एकदम पांचव्या गुणस्थानांत जाऊन तेरा प्रकृति बांधील हा एक अल्पतर बंध.

१ तोच मिथ्यात्वी जीव एकदम ७ व्या गुणस्थानांत जाऊन ९ प्रकृति बांधील हा एक अल्पतर बंध.

३

१ चौथ्या गुणस्थानांतील वेदक अथवा क्षायिक सम्यक्त्वी जीव १७ प्रकृति बांधीत होता तो पांचव्या गुणस्थानीं चढल्यास १३ प्रकृति बांधील हा एक अल्पतर किंवा

१ तोच चौथ्या गुणस्थानांतील जीव सातव्या गुणस्थानांत जाईल तेव्हा ९ प्रकृति बांधील

२ हा एक अल्पतर.

१ पांचव्या गुणस्थानांतील जीव १३ प्रकृति बांधीत होता तो ७ व्या गुणस्थानांत येऊन ९ प्रकृति बांधील हा एक अल्पतर.

१

१ आठव्या गुणस्थानांतील जीव ९प्रकृति बांधीत होता तो ९व्या गुणस्थानांतील पांचव्या भागांत ५ प्रकृति बांधितो हा एक अल्पतर.

१

१ नवव्या गुण. तील प्रथम भागांत ५ प्रकृति बांधीत होता तो द्वितीय भागांत ४ प्रकृति बांधतो हा एक अल्पतर.

१

१ नवव्या गुणस्थानांतील दुसऱ्या भागांत ४ प्रकृति बांधित होता तो तिसऱ्या भागांत ३ प्रकृति बांधितो हा एक अल्पतर बंध.

१

१ नवव्या गुणस्थानांतील तिसऱ्या भागांत ३ प्रकृति बांधित होता तो चौथ्या भागांत दोन बांधील हा एक अल्पतर.

२

१ नवव्याच्या ४ थ्या भागांत २ प्रकृति बांधित होता तो पांचव्या भागांत एक बांधील हा एक अल्पतर.

१

एकूण ११ अल्पतर बंध झाले.

**अवस्थित बंध**

अवक्तव्य बंधस्थानांत २ अवस्थित बंध होतात. [ याच गाथेंत मागें पहा ] भुजाकार बंध २० वीस व अल्पतर बंध ११ अकरा मिळून ३३ तेहतीस बंध अवस्थित बंधस्थानाचे होतील कारण सर्व तऱ्हेचे बंध पहिल्या समयात होतील तितकेच दुसऱ्या समयांतही होऊं शकतील.

**गाथा** ४७१–भंगाच्या अपेक्षेनें भुजाकार बंध १२७, अल्पतर बंध ४५, अवस्थित बंध १७५ होतील.

२४ सासादन गुणस्थानांतील जीव मिथ्यात्व गुणस्थानांत जातो. सासादनाचे भंग ४ आहेत व मिथ्यात्वाचे भंग ६ आहेत म्हणून ४×६=२४ भंग झाले कारण सासादनांतील पहिल्या भागांत २१ प्रकृति बांधणारा जीव मिथ्यात्व गुणस्थानांत ६ प्रकारांनीं २२ प्रकृति बांधू शकेल त्याचप्रमाणें सासादनांतील बाकीच्या ३ भंगाचेही जीव पहिल्या गुणस्थानांत ६ प्रकारांनीं २२ प्रकृति बांधूं शकतील. मिळून सासादन गुणस्थानाच्या अपेक्षेनें २४ भंग होतील.

१२ मिश्र गुण. चे भंग २ आहेत तेथून जीव मिथ्यात्वांत येतो मिथ्यात्वाचे भंग

६ ह्मणून २×६=१२ भंग झाले.

२० चौथ्या गुण. चे भंग २ आहेत तेथून जीव सासादन गुणस्थानांत जातो. सासादनाचे भंग ४ म्हणून २×४=८ झाले. तसेंच ४ थ्या गुण. तील जीव मिथ्यात्वांतही जातो. चौथ्याचे भंग २ व मिथ्यात्वाचे भंग ६ म्हणून २×६=१२ एकूण ८+१२=२० भंग.

२४ देशसंयताचे भंग २ आहेत तेथून जीव मिश्र अथवा असंयत किंवा मरणोत्तर असंयत गुणस्थानांत जातो. तेथें म्हणजे तिसऱ्या व ४ थ्या गुणस्थानांत १७ प्रकृतींचाच बंध होतो व भंग दोन आहेत म्हणून २×२=४ भंग झाले.

पांचव्या गुणस्थानांतून २ ऱ्या गुणस्थानांत जाईल तेथें ४ भंग होतात म्हणून २×४=८ भंग झाले.

पांचव्या गुणस्थानांतून १ ल्या गुणस्थानांत जातो तेथें ६ भंग होतात म्हणून २×६=१२ भंग झाले. एकूण ४ + ८ + १२ = २४ भंग झाले.

२८ प्रमत्तगुणस्थानाचे भंग २ आहेत तेथून ५ व्यांत, ४ थ्यांत किंवा ३ ऱ्यांत, दुसऱ्यांत व पहिल्यांत जाईल म्हणून त्याचे भंग खालीं लिहिल्याप्रमाणें होतील.

| | | |
|---|---|---|
| ४ | प्रमत्तांतून | देशसंयतांत २×२=४ |
| ४ | ,, | मिश्र किंवा असंयतामधें २×२=४ |
| ८ | ,, | सासादनांत २×४=८ |
| १२ | ,, | मिथ्यात्वांत २×६=१२ |
| २८ | | |

२ अप्रमत्ताचा भंग एक. या गुणस्थानांत मरून चौथ्यांत जातो चौथ्याचे भंग २ म्हणून १ × २ = २

२ अपूर्वकरणाचा भंग १ या गुणस्थानांत मरून ४ थ्यांत जातो ह्मणून १×२=२

१५ अनिवृत्तिकरण गुणस्थानाचे पांच भांग आहेत.

३ पहिल्या भागांतून ८ व्या गुण. त येतो म्हणून १ × १ = १ किंवा मरून ४ थ्या गुणस्थानांत जाईल म्हणून १×२=२ मिळून १+२=३

३ दुसऱ्या भागांतून पहिल्या भागांत जाईल म्हणून १×१=१ किंवा मरून ४ थ्या गुणस्थानांत जाईल म्हणून १×२=२ मिळून १+२=३

३ तिसऱ्या भागांतून दुसऱ्या भागांत येईल किंवा मरून चौथ्यांत जाईल म्हणून वर प्रमाणें ३.

३ चौथ्या भागांतून तिसऱ्या भागांत किंवा मरून ४ थ्या गुणस्थानांत जाईल म्हणून वर प्रमाणें ३

३ पांचव्या भागांतून ४थ्या भागांत किंवा मरून ४थ्या गुणस्थानांत जाईल म्हणून वरप्रमाणें ३.

१५

१२७

गाथा ४७२–मागील गाथेंतील भुजाकार भंगांची संख्या.

| गुणस्थान | भंगसंख्या |
|---|---|
| १ | ० |
| २ | २४ |
| ३ | १२ |
| ४ | २० |
| ५ | २४ |
| ६ | २८ |
| ७ | २ |
| ८ | २ |
| ९ | १५ |
| पांच भाग. | प्रत्येक भागांत ३ |
| | एकूण १२७ भंग. |

गाथा ४७३–अल्पतर बंधाचें भंग.

३० मिथ्यात्व गुणस्थानाचे ६ भंग आहेत. तो जीव मिश्र वा असंयत गुणस्थानांत जातो त्याचे भंग २ आहेत म्हणून ६ × २ = १२.

तोच जीव मिथ्यात्वांतून पांचव्या गुणस्थानांत जातो.

त्याचे भंग २ आहेत म्हणून ६ × २ = १२.

तोच जीव सातव्यांत जातो त्याचा एक भंग म्हणून ६ × १ = ६

३०

नोट–सासादनांतून मिथ्यात्वगुणस्थानांतच जातो म्हणून अल्पतर बंध नाहीं.

तिसऱ्या गुणस्थानांतून ४थ्यांत जातो व या दोन्ही गुणस्थानांत समान १७ प्रकृतींचाच बंध होतो. म्हणून तो अवस्थित बंध आहे. अल्पतर नाहीं.

६ चौथ्या गुणस्थानांत २ भंग आहेत तेथून पांचव्या गुणस्थानांत जातो त्याचे २ भंग म्हणून २ × २ = ४

किंवा ७ व्यांत जातो त्याचा १ भंग म्हणून २ × १ = २

६

२ पांचव्यात २भंग आहेत तेथून७व्यांत जातो त्याचा एक भंग म्हणून २ × १ = २

२ ६व्याचें २ भंग तेथून ७व्यांत जातो त्याचा एक भंग म्हणून २ × १ = २

**शंका**:–६व्या गुण.त व ७व्या गुणस्थानांत ९ प्रकृतींचा बंध होतो व ही संख्या दोहोंत समान आहे त्या अर्थी अवस्थितबंध व्हावा तो अल्पतर कां होतो?

**समाधान**:–सहाव्या गु०तील ९ प्रकृतींत शोक अरति व हास्यरति, हीं दोन युगलें विकल्पानें होतीं व सातव्यांत शोक अरतीचा बंध होत नाहीं म्हणून अल्पतर बंध मानिला पाहिजे.

सातव्यांतून ८ गुण.त जातो दोन्ही गुण०त समान ९ प्रकृतींचा बंध होतो म्हणून तो अल्पतर बंध नाहीं.

१ आठव्यांतून ९ व्याच्या प्रथम भागांत जातो दोहोंचाही एकेकच भंग आहे म्हणून १ × १ = १

१ ९ व्याच्या प्रथम भागांतून २ ऱ्या भागांत जातो दोहोंचा एकेकच भंग आहे म्हणून १ × १ = १

१ नवव्याच्या २ ऱ्या भागांतून तिसऱ्यांत जातो म्हणून १ × १ = १

१ ,, ३ ऱ्या ,, ४ थ्यांत जातो म्हणून १ × १ = १

१ ,, ४ थ्या ,, ५ व्यांत जातो म्हणून १ × १ = १

**नोट**:–नवव्याच्या पांचव्या भागांतून १० व्या गुण०त जातो पण तेथें मोहनीयाचा बंध नाहीं म्हणून अल्पतर बंध नाहीं.

४५

याप्रमाणें अल्पतर बंधांची संख्या ४५ अवस्थित बंधांची भंगसंख्या १७५ कशी होते तें दाखवितात.

१२७ भुजाकार + ४५ अल्पतर + ३ अवक्तव्य = १७५.

**गाथा ४७४**–अवक्तव्य बंधाचे ३ भंग.

दहाव्या गुणस्थानांत मोहनीयाचा बंध नाहीं. तो पतन पावून ९ व्यांत संज्वलन लोभ बांधतो म्हणून १ भंग किंवा दहाव्या गुणस्थानांतील बद्धायुजीव उपशमश्रेणींत

चढत किंवा उतरत असतांना मरण पावल्यास ४ थ्या गुणस्थानांत १७ प्रकृति बांधील व त्याचे २ भंग आहेत म्हणून अवक्तव्याचे २ भंग. एकूण १+२=३

**गाथा** ४७५–मोहनीयाचीं उदयस्थानें.

मोहनीयकर्माचीं उदयस्थानें ९ आहेत. दहा प्रकृतींचें १ एक स्थान, नऊंचें १ एक स्थान, आठांचें १ एक, सातांचें १ एक, सहांचें १ एक, पांचांचें १ एक, चारांचें १ एक, दोनचें १ एक, एकचें १ एक, =९

**गाथा** ४७६–दर्शनमोहनीयाच्या तीन प्रकृती पैकीं मिथ्यात्वाचा उदय १ ल्या गुणस्थानांत, मिश्र प्रकृतीचा उदय ३ ऱ्या गुणस्थानांत व सम्यक्त्वमोहनीयाचा उदय वेदकसम्यग्दृष्टीला ४, ५, ६, ७ या चार गुण. त होतो.

क्रोध, मान, माया, लोभ या ४ कषायांचा उदय युगपत् होत नाहीं म्हणजे चोहोंपैकीं एकाचाच उदय एका समयांत होतो. अनंतानुबंधीकषायाचा उदय असेल त्यावेळीं अप्रत्याख्यान, प्रत्याख्यान, व संज्वलन यांचाही उदय होईल. त्याचप्रमाणें अप्रत्याख्यानाचा उदय असेल तेव्हां प्रत्याख्यान व संज्वलानाचाही होईल व प्रत्याख्यानाचा उदय असेल तेव्हां संज्वलनाचाही उदय होईल.

तीन वेदांपैकीं एका समयांत एकच वेदाचा उदय होईल.

हास्यरति व शोक अरति या दोन युगलापैकीं एका समयांत एकाचाच उदय होईल.

**गाथा** ४७७–पहिल्या गुणस्थानापासून ८ व्या गुणस्थानापर्यंत जीवाला मोहनीयाचा उदय ४ प्रकारांनीं नियमानें होईल.

१ भय व जुगुप्सासहित १ भयासहित १ जुगुप्सासहित १ भय व जुगुप्सारहित.

१ मिथ्यात्वगुणस्थान–यांत ४ उदयस्थानें होतात. ( १०-९-९-८ )

१ दहा प्रकृति–१ मिथ्यात्व + ४ अनंतानुबंधी, अप्रत्याख्यान, प्रत्याख्यान, संज्वलन क्रोध, किंवा मान किंवा माया किंवा लोभ. +१ वेद ( तिहींपैकीं ) + २ हास्यरति अथवा शोक अरति + २ भय जुगुप्सा.

१ नऊ प्रकृति–वरील दहा. उणें १ जुगुप्सा

१ नऊ प्रकृति–वरील दहा. उणें १ भय.

१ आठ प्रकृति–वरील दहा. उणें २ भयजुगुप्सा

—

४

२ सासादन गुणस्थानाचीं उदयस्थानें ४ [ ९-८-८-७ ]

१ नऊ प्रकृति–४ अनंतानुबंध्यादि क्रोधादि + १ वेद ( तिहींपैकीं ) + २ हास्यरति अथवा शोक अरति + २ भय जुगुप्सा.

१ आठ प्रकृति–वरील ९–१ जुगुप्सा
१ आठ प्रकृति ,, ९–१ भय
१ सात प्रकृति– ,, ९–२ भय जुगुप्सा
४

३ मिश्रगुणस्थान–याचीं उदयस्थानें चार [ ९-८-८-७ ]
१ नऊ प्रकृति–१ मिश्र + ३ अप्रत्याख्यानादि क्रोधादि + १ वेद (तिहींपैकीं) + २ हास्यरति अथवा शोक अरति + २ भय जुगुप्सा.
१ आठ प्रकृति–वरील ९–१ जुगुप्सा
१ आठ प्रकृति– ,, ९–१ भय
१ सात प्रकृति– ,, ९–२ भय जुगुप्सा
४

४ अविरतवेदक–सम्यक्त्वसहित–याचीं उदयस्थानें चार ( ९-८-८-७ )
१ नऊ प्रकृति–१ सम्यक्त्वमोहनीय + ३ अप्रत्याख्यानादि क्रोधादि + १ वेद ( तिहींपैकीं ) + २ हास्यरति अथवा शोक अरति २ + भयजुगुप्सा.
१ आठ प्रकृति–वरील ९–१ जुगुप्सा
१ आठ प्रकृति– ,, ९–१ भय
१ सात प्रकृति– ,, ९–२ भय जुगुप्सा
४

५ देशसंयत वेदकसम्यक्त्वयुत-याचीं उदयस्थानें चार ( ८, ७, ७, ६, )
१ आठ प्रकृति– १ सम्यक्त्व प्र. + २ प्रत्याख्यानादि क्रोधादि + १ वेद ( ति. पै. ) + २ हास्यरति किंवा शोक अरति +२ भय जुगुप्सा
१ सात प्रकृति–वरील आठ ८–१ जुगुप्सा
१ सात प्रकृति– ,, ८–१ भय
१ सहा प्रकृति– ,, ८–२ भय जुगुप्सा
४

६ प्रमत्तवेदक सहित–याचीं उदयस्थानें चार [ ७-६ ६-५ ]
१ सात प्रकृति = १ सम्यक्त्व प्र० + १ संज्व. क्रोधादि. + १ वेद ( ति. पै. ) +२ हास्यरति किंवा शोकअरति + २ भयजुगुप्सा.
१ सहा प्रकृति = वरील ७–१ जुगुप्सा.

१ सहा प्रकृति = ,, ७–१ भय.

१ पांच प्रकृति = ,, ७–२ भयजुगुप्सा.

४

७ अप्रमत्त वेदकसहित–याचीं ही उदयस्थानें ६ व्या गुणस्थानाप्रमाणें चार आहेत. ( ७–६–६–५ ).

८ अपूर्वकरण—याचीं उदयस्थानें चार ( ६, ५, ५, ४ )

१ सहा प्रकृति = १ संज्व. क्रोधादि+१ वेद [ ति. पै. ]+२ हास्यरति किंवा शोकअरति + २ भयजुगुप्सा.

१ पांच प्रकृति = वरील ६—१ जुगुप्सा.

१ पांच प्रकृति = ,, ६—१ भय.

१ चार प्रकृति = ,, ६—२ भय जुगुप्सा.

४

९ अनिवृत्तिकरण—याचें उदयस्थान एक.

( प्रथम भाग ) २ प्रकृतीचें स्थान.

१ दोन प्रकृति = १ संज्व. क्रोधादि + १ वेद ( ति. पै. )

अनिवृत्तिकरण द्वितीय भाग [ वेदरहित ] यांचें उदयस्थान १ संज्व. क्रोधादि.

,, तृतीय भाग उदयस्थान १ संज्व. मानादि

,, चतुर्थ भाग ,, १ ,, माया लोभ.

,, पंचम भाग ,, १ ,, बादर लोभ.

१० सूक्ष्मसांपराय—उदयस्थान १ प्रकृति सूक्ष्म लोभ.

**गाथा** ४७८–अनंतानुबंधीचें विसंयोजन ( म्हणजे अप्रत्याख्यानादिरूप होणें ) ज्या जीवास झालें असेल असा वेदकसम्यग्दृष्टि जीव मिथ्यात्वकर्माच्या उदयानें पतन पावून मिथ्यात्वगुणस्थानांत येतो तेव्हां एक आवलिपर्यंत अनंतानुबंधीचा उदय होत नाहीं. कारण अनंतानुबंधी सत्तेंत नसतें व मिथ्यात्वांत आल्यावर पहिल्या समयांत अनंतानुबंधीचा बंध करील त्याचा उदय एक आवलीपर्यंत होऊं शकत नाहीं यामुळें अनंतानुबंधी–रहित मिथ्यादृष्टीचीं उदयस्थानें चार होतील. अनंतानुबंधीरहित मिथ्यादृष्टींचीं चार उदयस्थानें. ( ९–८–८–७ )

१ नऊ प्रकृति – १ मिथ्यात्व + ३ अप्रत्याख्यानादि क्रोधादि + १ वेद [ तिन्ही पैकीं ] + २ हास्यरति किंवा शोक अरति + २ भय जुगुप्सा.

१ आठ प्रकृति – वरील ९–१ जुगुप्सा
१ आठ प्रकृति – ,, ९–१ भय
१ सात प्रकृति— ,, ९–२ भय जुगुप्सा
४

चौथ्यापासून ७ व्या गुणस्थानापर्यंत औपशमिक व क्षायिकसम्य. जीवांची उदयस्थानें खालीं लिहिल्याप्रमाणें असतात.

चौथ्या गुणस्थानांत उदयस्थानें चार [ ८·७·७·६ ]

१ आठ प्रकृति—३ अप्र. क्रोधादि + १ वेद [ ति. पै. ] + २ हास्यरति किंवा शोक अरति + २ भय जुगुप्सा
१ सात प्रकृति—वरील ८—१ जुगुप्सा
१ सात प्रकृति— ,, ८—१ भय
१ सहा प्रकृति— ,, ८—२ भय जुगुप्सा.
४

पंचम गुणस्थानांत उदयस्थानें चार ( ७-६-६-५ )

१ सात प्रकृति—२ प्रत्याख्या. क्रोधादि + १ वेद [ ति. पै. ] + २ हास्यरति किंवा शोक अरति + २ भयजुगुप्सा
१ सहा प्रकृति—वरील ७—१ जुगुप्सा
१ सहा प्रकृति— ,, ७—१ भय
१ पांच प्रकृति— ,, ७—२ भयजुगुप्सा
४

सहाव्या गुण. उदयस्थानें चार [ ६-५-५-४ ]

१ सहा प्रकृति—१ संज्वलन क्रोधादि + १ वेद [ ति. पै. ] + २ हा. रति किंवा शोक अरति + २ भय जुगुप्सा
१ पांच प्रकृति—वरील ६—१ जुगुप्सा
१ पांच प्रकृति— ,, ६—१ भय
१ चार प्रकृति— ,, ६—२ भय जुगुप्सा
सातव्या गुण. उदयस्थानें ६ व्या गुण. प्रमाणें ४ [ ६-५-५-४ ]

**गाथा** ४७९ गाथा ४७७ व ४७८ मधील उदयस्थानाचें

## कोष्टक नंबर ( १४३ )

| गुणस्था | मिथ्यात्व | सासा. | मिश्र | अविर. | दे. वि. | प्रमत्त | अप्रमत्त | अपूर्व | अनि | सूक्ष्म. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उदय-स्थानें | १०–९, ९–८ | ९–८ ८–७ | ९–८ ८–७ | ९–८ ८–७ | ८–७ ७–६ | ७–६ ६–५ | ७–६ ६–५ | ६–५ ५–४ | २–१ | १ |
| उदय स्थानें | ९–८ ८–७ | ० | ० | ८–७ ७–६ | ७–६ ६–५ | ६–५ ५–४ | ६–५ ५–४ | ० | ० | ० |
| बेरीज | ८ | ४ | ४ | ८ | ८ | ८ | ८ | ४ | २ | १=५५ |

अनिवृत्तिकरण गुण० चे ५ भाग आहेत त्यांचीं उदयस्थानें २–१–१–१–१ अशीं आहेत. परंतु कोष्टकांत २–१ असा संक्षेप केला आहे.

**गाथा ४८०**- गुणस्थानाच्या अपेक्षेनें अपुनरुक्त उदयस्थानें व त्यांचे भंग.

## ( कोष्टक नं. १४४. )

| गुणस्थान. | अपुनरुक्त स्थान संख्या | अपुनरुक्त उदयस्थानाच्या प्रकृतींचीं संख्या |
|---|---|---|
| १ | ४ | १०, ९, ८, ७ |
| २ | ३ | ९, ८, ७, |
| ३ | ३ | ९, ८, ७, |
| ४ | ४ | ९, ८, ७, ६ |
| ५ | ४ | ८, ७, ६, ५ |
| ६ | ४ | ७, ६, ५, ४ |
| ७ | ४ | ७, ६, ५, ४ |
| ८ | ३ | ६, ५, ४ |

मिथ्यात्व गुण. पासून अपूर्वकरण गुण. पर्यंत जितकीं उदयस्थानें सांगितलीं आहेत त्या प्रत्येक उदयस्थानाचे २४ भंग होतात अर्थात् प्रत्येक उदयस्थान २४

प्रकारचें असूं शकेल कारण प्रत्येक उदयस्थानांत क्रोध, मान, माया, लोभ या ४ कषायांचा एका समयांत उदय होत नाहीं. भिन्न भिन्न समयांत होतो तसेंच तिन्ही वेदांचा उदयही भिन्न भिन्न समयांत होतो आणि हास्यरति युगल व शोक अरति युगल यांचाही उदय भिन्न भिन्न समयांत होतो म्हणून ४×३×२=२४ भंग होतील.

उदाहरण—मिथ्यात्व गुणस्थानांत पहिलें उदयस्थान १० प्रकृतींचें आहे. त्याचे भंग २४ खालीं लिहिल्याप्रमाणें—

[१] १ मि. +४ अनं. अप्र. प्र. सं. क्रोध + १ पुंवेद + २ हा. र.+२ भ.जु.= १०
[२] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, मान + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[३] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, माया + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[४] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, लोभ + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[५] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, क्रोध + १ स्त्रीवेद + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[६] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, मान + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[७] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, माया + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[८] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, लोभ + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[९] १ मि. + ४ ,, ,, ,, ,, क्रोध+ १नपुं.वेद+ २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[१०]१ मि. + ४ ,, ,, ,, ,, मान + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[११]१ मि. + ४ ,, ,, ,, ,, माया + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०
[१२]१ मि. + ४ ,, ,, ,, ,, लोभ + १ ,, + २ ,, ,, +२ ,, ,, = १०

हे बारा भंग हास्यरतीच्या अपेक्षेनें समजावे. आणि हास्यरतीच्या ऐवजीं शोक अरति घातल्यास त्याचेही बारा भंग होतील मिळून याप्रमाणें २४ प्रकारचे भंग होतात.

**गाथा ४८१**–किती प्रकृतींचीं उदयस्थानें किती आहेत तें खालील कोष्टकांत दाखविलें आहे.

**( कोष्टक नं. १४५ )**

| प्रकृतींची संख्या | १० | ९ | ८ | ७ | ६ | ५ | ४ | २ | १ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थानांची संख्या | १ | ६ | ११ | ११ | ११ | ९ | ३ | १ | १ |

पहिल्या गुणस्थानापासून ८ व्या गुणस्थानापर्यंत उदयस्थानें ५२ होतात व प्रत्येक स्थानाचे २४ भंग होतात म्हणून ५२ × २४ = १२४८ भंग. दोन प्रकृतिरूप स्थानाचे भंग २४ व एक प्रकृतिरूप स्थानाचे भंग ११ होतात. याचें स्पष्टीकरण

पुढील ४८२ व्या गाथेंत येईल.

**गाथा** ४८२–नवव्या गुण. च्या पहिल्या भागांत ५ प्रकृतींचा बंध होतो. तेथें २ उदयस्थानें म्हणजे ४ संज्वलन कषाय व ३ वेद म्हणून ४×३=१२ भंग होतात.

अनिवृत्तिकरणाच्या दुसऱ्या भागांत चार प्रकृतींचा बंध होतो. या भागांतही कषायाबरोबर कांहीं कालपर्यंत वेदाचा उदय असतो म्हणून या भागांत ४ × ३= १२ भंग होतात.

| | |
|---|---|
| ९ व्या गुण. च्या दुसऱ्या भागाच्या शेवटीं वेदाचा उदय नसतो. | |
| केवल ४ संज्वलनाचा उदय असतो म्हणून त्याचे भंग | ४ |
| ९व्या गुण०च्या ३ऱ्या भागांत ३ संज्व०चा उदय असतो म्हणून त्याचे भंग | ३ |
| ९व्या गुण०च्या चवथ्या भागांत २ कषायांचा उदय असतो म्हणून त्याचे भंग | २ |
| ९व्या गुण०च्या ५व्या भागांत १ लोभाचा उदय असतो म्हणून भंग | १ |
| १०गुणस्थानांत सूक्ष्म १लोभाचा उदय असतो म्हणून त्याचा भंग | १ |
| | ११ |

**गाथा** ४८३–नवव्या गुणस्थानाच्या पहिल्या भागाच्या प्रथम समयापासून नपुंसकवेद किंवा स्त्रीवेद याचा उदयकाल समान असतो आणि याहून पुरुषवेद, संज्वलनक्रोध, मान, माया, लोभ, या प्रत्येकांचा उदयकाल अनुक्रमानें एकापेक्षां दुसऱ्याचा एक अंतर्मुहूर्तानें ज्यास्त असतो.

**गाथा** ४८४–जो जीव पुरुषवेदाचा उदय असतांना श्रेणी चढत असेल त्याच्या पुरुषवेदाची बंधव्युच्छित्ति व उदयव्युच्छित्ति युगपत् होते अथवा दुसरें मत असें आहे कीं बंधाची व्युच्छित्ति उदयाच्या द्विचरमसमयांत होते. म्हणजे उदयाच्या व्युच्छित्तिपूर्वी दुसऱ्या समयांत होते.

जो जीव स्त्री किंवा नपुंसक वेदाचा उदय असतांना श्रेणी चढत असेल त्याच्या पुरुषवेदाची बंधव्युच्छित्ति या दोन वेदाच्या उदयव्युच्छित्तीच्या द्विचरम समयांत होईल.

**गाथा** ४८५–नवव्या गुणस्थानाच्या प्रथमभागांत ५ प्रकृतींचा बंध होतो. तेथें २ उदयस्थानें आहेत व दुसऱ्या भागांत ४ प्रकृतींचा बंध होतो तेथें हीं ( कांहीं काळपर्यंत ) दोन उदयस्थानें असतात. ४ × ३ = १२ भंग प्रत्येकाचे होतात.(गाथा ४८२ पहा. ) .

**गाथा** ४८६–अनिवृत्तिकरणाच्या दुसऱ्या भागांपासून सूक्ष्म सांपरायापर्यंत कषायाच्या अपेक्षेनें ११ भंग होतात. त्यांचें वर्णन गाथा ४८२ मध्यें केलें आहे.

**गाथा** ४८७–मोहनीय कर्माच्या उदयस्थानाचे भंग १२४८ आठव्या गुण-

स्थानापर्यंत होतात व नवव्या, दहाव्या गुणस्थानाचे २४ + ११ = ३५ भंग होतात. मिळून एकंदर भंग १२८३ झाले. ( गाथा ४८१ पहा ).

प्रकृतींच्या अपेक्षेनें ८५०७ भंग होतात त्यांचा तपशील.

८४४८ आठव्या गुणस्थानापर्यंत ५२ उदयस्थानाच्या प्रकृतींची संख्या ३५२ होते. त्याचें भंग प्रत्येकीं २४ असतात म्हणून ३५२ × २४ = ८४४८.

४८ नवव्या गुणस्थानांत २ प्रकृतींचा उदय असतो त्याचे भंग २×२४=४८

११ नवव्या व दहाव्या गुणस्थानांत एक प्रकृतीचा उदय असतो त्याचे भंग ११ ( गाथा ४८२ पहा )

८५०७

**गाथा ४८८–४८९**—अपुनरुक्त उदयस्थान व प्रकृति यांचे भंग.

प्रकृति–स्थान

१० १

९ ६

८ ११

७ १० गाथा ४८१ मधें ११ स्थानें सांगितलीं आहेत परंतु वेदकसम्यक्त्वसहित प्रमत्त अप्रमत्ताच्या ७ प्रकृतींचीं दोन स्थानें समान असल्यामुळें एक कमी झालें.

६ ७ गाथा ४८१ मध्यें ६ प्रकृतींचीं स्थानें ११ सांगितलीं होतीं. इथें ४ स्थानें कमी झालीं. कारण वेदकसहित ६ व्या ७ व्या गुणस्थानांत ६-६ प्रकृति समान आल्यामुळें २ पुनरुक्त कमी झालीं व वेदकरहित प्रमत्त व अप्रमत्त व अपूर्वकरण यांत ३ ठिकाणीं ६ प्रकृतींची स्थानें आहेत म्हणून २ पुनरुक्त कमी झालीं मिळून ४ कमी झालीं.

५ ४ गाथा ४८१ मध्यें ५ प्रकृतींचीं ९ स्थानें सांगितलीं आहेत. इथें पांच स्थानें कमी झालीं कारण वेदकसहित प्रमत्त अप्रमत्त समान आहेत. दोहोंतही ५ प्रकृतींचें स्थान आहे म्हणून १ पुनरुक्त कमी. वेदकरहित देशसंयतांत ५ प्रकृतींचें एक स्थान आहे व प्रमत्त, अप्रमत्त यांत दोन दोन स्थानें आहेत व अपूर्वकरणांत २ स्थानें आहेत. यांत ४ पुनरुक्त स्थानें कमी केलीं कारण ६-७-८ या गुण. चीं २–२ स्थानें समान आहेत म्हणून १ + ४ = ५ कमी झालीं.

४    १ गाथा ४८१ मध्यें चार प्रकृतींचीं ३ स्थानें सांगितलीं आहेत एथें २स्थानें कमी झालीं कारण ६-७-८ या गुणस्थानांत ४-४ प्रकृतींचें एक एक स्थान समान आहे म्हणून २ पुनरुक्त कमी झालीं.

४० स्थानें अपुनरुक्त आहेत प्रत्येकांचे २४-२४ भंग होतात म्हणून एकंदर भंग ४० × २४ =    ९६०

दोन प्रकृतींच्या उदयस्थानाचे भंग चोवीस होतात म्हणून गाथा ४८२ त सांगितलें आहे. त्यांत पुनरुक्त १२ कमी केले म्हणून २४ − १२ =    १२

एक प्रकृतींच्या उदयस्थानाचे भंग गाथा ४८२ मध्यें ११ सांगितले त्यांत ६ पुनरुक्त आहेत ते कमी केले म्हणजे ११−६ =    ५

एकूण ९७७ भंग स्थान अपेक्षेनें झाले.    ९७७

वरील अपुनरुक्त ४० उदयस्थानाच्या प्रकृति २८८ होतात व प्रत्येकाचे भंग २४-२४ होतात म्हणून २८८ × २४ =    ६९१२

| | | |
|---|---|---|
| १०× १=१० | दोन प्रकृतींचें प्रत्येकीं भंग १२ म्हणून २×१२= | २४ |
| ९× ६=५४ | एक प्रकृतीचें भंग ५ = | ५ |
| ८×११=८८ | | ६९४१ |
| ७×१०=७० | एकूण ६९४१ भंग प्रकृतीच्या अपेक्षेनें झाले. | |
| ६× ७=४२ | | |
| ५× ४=२० | | |
| ४× १= ४ | | |
| २८८ | | |

यावर सांगितलेल्या स्थान व प्रकृतिद्वारा तीन काल संबंधीं त्रिलोकवासी चराचर संसारी जीव मोहित आहेत.

**गाथा** ४९०–मोहनीयकर्मांचीं उदयस्थानें व त्यांच्या प्रकृति यांस गुणस्थानापेक्षया उपयोग, योग, संयम, लेश्या व सम्यक्त्व यांच्या संख्येनें गुणून किती स्थानें व भंग होतात तें दाखवितात.

**गाथा** ४९१–जीवाचे उपयोग १२ होतात ४ दर्शनोपयोग (१ चक्षु २ अचक्षु ३ अवधि ४ केवल ) व ८ ज्ञानोपयोग ( १ मति २ श्रुत ३ अवधि ४ मनःपर्यय ५ केवल ६ कुमति ७ कुश्रुत ८ कुअवधि ) मिळून १२.

## ( कोष्टक नं. १४६ )

| गुणस्थान | उपयोग संख्या | उपयोग कोणते |
|---|---|---|
| १ | ५ | १ चक्षुर्दर्शन २ अचक्षुर्दर्शन ३ कुमति ४ कुश्रुत ५ कुअवधि |
| २ | ५ | ,, ,, ,, ,, ,, |
| ३ | ६ | वरील ५+१ अवधिदर्शन ( त्यांतील तीन ज्ञानें मिश्र असतात ) |
| ४ | ६ | १ चक्षुर्दर्शन २ अचक्षुर्दर्शन ३ अवधिदर्शन ४ मति ५ श्रुत ६ अवधि |
| ५ | ६ | ,, ,, ,, ,, ,, ,, |
| ६ | ७ | वरील ६ + १ मनःपर्यय ज्ञान |
| ७ | ७ | ,, ,, ,, |
| ८ | ७ | ,, ,, ,, |
| ९ | ७ | ,, ,, ,, |
| १० | ७ | ,, ,, ,, |
| ११ | ७ | ,, ,, ,, |
| १२ | ७ | ,, ,, ,, |
| १३ | २ | १ केवलदर्शन २ केवलज्ञान |
| १४ | २ | ,, ,, |

गुणस्थानापेक्षया उपयोग, मोहनीयाचीं उदयस्थानें व प्रकृतींचीं संख्या यांचा गुणाकार करून जीं स्थानें होतात तीं खालील कोष्टकांत दाखविली आहेत.

## ( कोष्टक नं. १४७ )

| गुणस्थान | उदयस्थान संख्या | प्रकृतींची संख्या | उपयोग संख्या | उदयस्थान ×उपयोग | प्रकृति × उपयोग |
|---|---|---|---|---|---|
| मिथ्यात्व | ८ | ६८=३६+३२ | ५ | ४० | ३४० |
| सासादन | ४ | ३२ | ५ | २० | १६० |
| मिश्र | ४ | ३२ | ६ | २४ | १९२ |
| अविरत | ८ | ६०=३२+२८ | ६ | ४८ | ३६० |
| देशविरत | ८ | ५२=२८+२४ | ६ | ४८ | ३१२ |
| प्रमत्त | ८ | ४४=२४+२० | ७ | ५६ | ३०८ |

| गुणस्थान | उदयस्थान संख्या | प्रकृतींची संख्या | उपयोग संख्या | उदयस्थान ×उपयोग | प्रकृति × उपयोग |
|---|---|---|---|---|---|
| अप्रमत्त | ८ | ४४=२४+२० | ७ | ५६ | ३०८ |
| अपूर्वकरण | ४ | २० | ७ | २८ | १४० |
| बेरीज | ५२ | ३५२ | ४९ | ३२० | २१२० |
| अनि.प्र.भाग | १ | २ | ७ | ७ | १४ |
| अ.शेष भाग | १ | १ | ७ | ७ | ७ |
| सूक्ष्मसांपराय | १ | १ | ७ | ७ | ७ |

उदयस्थान संख्या व प्रकृतींची संख्या कोष्टक नंबर १४९ मध्यें पहा.

आठव्या गुणस्थानापर्यंत उदयस्थानांची संख्या उपयोगापेक्षेनें ३२० होते.
व प्रत्येकाचे भंग २४ होतात म्हणून ३२० × २४= ७६८० भंग झाले
अनिवृत्तिकरण गुणस्थानाच्या प्रथम सवेद भागांत उदयस्थानांची
संख्या उपयोगापेक्षेनें ७ व प्रत्येकाचे भंग १२ म्हणून ७×१२= ८४
अनिवृत्ति करणाच्या अवेद भागांत उपयोगापेक्षेनें स्थानें ७
आहेत प्रत्येकाचे भंग ४ म्हणून ७ × ४ = २८
सूक्ष्मसाम्परायाचीं उपयोगापेक्षेनें ७ स्थानें आहेत व प्रत्येकाचा ७७९
१ भंग म्हणून ७ × १ =७

**गाथा** ४९२–७७९९ उपयोगापेक्षेनें भंग झाले.

**गाथा** ४९३–उपयोगापेक्षेनें ८व्या गुणस्थानापर्यंत प्रकृतींची संख्या २१२० होते
प्रत्येकाचे भंग २४ म्हणून २१२० × २४ = ५०८८०
अनिवृत्तिकरण गुणस्थानाच्या प्रथम सवेदभागाच्या प्रकृति १४ व प्रत्येकाचे
भंग १२ म्हणून १४ × १२ = १६८
अनिवृत्तिकरण गुणस्थानाच्या अवेदभागाच्या प्रकृति ७ व प्रत्येकाचे
भंग ४ म्हणून ७ × ४ = २८
सूक्ष्मसांपरायाच्या उपयोगापेक्षेनें प्रकृति ७ व प्रत्येकीं भंग १ म्हणून ७×१=७ ५१०८३

**गाथा** ४९४–योग १५ आहेत. ४ सत्य, असत्य, उभय, अनुभयमन, ४ सत्य, असत्य, उभय, अनुभयवचन, ७ काय = १ औदारिक २ औदारिक मिश्र, ३ वैक्रियिक, ४ वैक्रियिक मिश्र, ५ आहारक, ६ आहारक मिश्र, ७ कार्मण.

## गुणस्थानापेक्षेनें योगाचें [ कोष्टक १४८ ]

| गुणस्थान. | योगसंख्या. | विवरण. |
|---|---|---|
| १ | १०+३ | ४मन ४वचन १औदारिक १वैक्रियिक. ३=२मिश्र १कार्मण |
| २ | १०+३ | ,, ,, ,, ,, ,, ,, |
| ३ | १० | ४ मन ४ वचन १ औदारिक-काय १ वैक्रियिक-काय. |
| ४ | १३ | ४ मन ४ वचन १ औदारिक १ वैक्रियिक २ मिश्र १ कार्मण |
| ५ | ९ | ४ मन ४ वचन १ औदारिक. |
| ६ | १०+१ | ४मन ४वचन १औदारिक १आहारक=१०+१आहारकमिश्र |
| ७ | ९ | ४ मन ४ वचन १ औदारिक |
| ८ ते १२ | प्रत्येकीं ९ | ,, ,, ,, |
| १३ | ५ + २ | ५–सत्यमन, अनुभयमन, सत्यवचन, अनुभयवचन, ५औ. २–औदारिकमिश्र १, कार्मण २. |
| १४ | ० | |

**गाथा** ४९५-१ –२–४व६ या चार गुणस्थानांत अपर्याप्तयोग व पर्याप्तयोग मिळून मोहनीयकर्माच्या उदयस्थानाचें व प्रकृतीचें प्रमाण केलें जातें बाकीच्या गुणस्थानांत केवल पर्याप्त योग धरून मोहनीयकर्माच्या उदयस्थानाचें व प्रकृतीचें प्रमाण केलें जातें. अपर्याप्त व पर्याप्तावस्थेंत गुणस्थानापेक्षया योग व मोहनीयाचीं उदयस्थानें व प्रकृति यांचा गुणाकार करून जीं स्थानें होतात त्यांचें कोष्टक.

## ( कोष्टक नं. १४९ )

| गुणस्थान | उदय. संख्या | प्रकृतिसंख्या | योगसंख्या. | उदयस्थान× योग | प्रकृति×योग | विशेष. |
|---|---|---|---|---|---|---|
| मिथ्यात्व | ४ | ३६ | १३ | ५२ | ४६८ | |
| ,, | ४ | ३२ | १०–३योग कमी होण्याचें कारण येथें मरण नाहीं म्हणून २मिश्र व १ कार्मण कमी. | ४० | ३२० | येथें अनंतानुबंधीचें विसंयोजन आहे. |
| सासादन | ४ | ३२ | १२वैक्रियिक मिश्र वेगळें सां. | ४८ | ३८४ | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मिश्र | ४ | ३२ | १० | ४० | ३२० |
| असंयत | ८ | ३२+२८-६० | १० मिश्र व कार्मण वेगळे सां. | ८० | ६०० |
| देशसंयत | ८ | २८+२४-५२ | ९ | ७२ | ४६८ |
| प्रमत्त | ८ | २४+२०-४४ | आहारकद्विक वेगळें सांगतील | ७२ | ३९६ |
| अप्रमत्त | ८ | २४+२०-४४ | ९ | ७२ | ३९६ |
| अपूर्वकरण | ४ | २० | ९ | ३६ | १८० |
| | | | | ५१२ | ३५३२ |
| अनि. सवेद | १ | २ | ९ | ९ | १८ |
| अनि. अवेद | १ | १ | ९ | ९ | ९ |
| सूक्ष्मसंपाराय | १ | १ | ९ | ९ | ९ |

मागील उदयस्थानें व प्रकृति यांचे भंग. **उदयस्थानाचे भंग.**

पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानापर्यंत योगापेक्षेनें उदयस्थानें ५१२ व प्रत्येकाचे भंग २४ म्हणून ५१२×२४= १२२८८

नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत योगापेक्षेनें उदयस्थानें ९ व प्रत्येकाचें भंग १२ म्हणून ९×१२- १०८

नवव्याच्या अवेदभागांत योगापेक्षेनें उदयस्थानें ९व प्रत्येकाचे भंग ४ म्हणून ९×४-३६

सूक्ष्मसाम्परायाचीं स्थानें ९ व भंग १ म्हणुन ९×१- ९

१२४४१

## प्रकृतींचे भंग

पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानापर्यंत योगापेक्षेनें प्रकृति ३५३२ व प्रत्येकाचे भंग २४ म्हणून ३५३२×२४-८४७६८

नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत योगापेक्षेनें प्रकृति १८ व प्रत्येकाचे भंग १२ म्हणून १८×१२- २१६

नवव्या गुणस्थानाच्या अवेदभागांत प्रकृति ९ व भंग ४ म्हणून ९×४- ३६

सूक्ष्मसाम्परायाच्या प्रकृति ९ भंग १ म्हणून ९×१- ९

८५०२९

**गाथा ४९६**–सासादन, असंयत व प्रमत्त या गुणस्थानांतील अकथित योगांच्या अपेक्षेनें उदयस्थान, प्रकृति, व भंग यांचें वर्णन.

सासादन—या गुणस्थानांत वैक्रियिकमिश्र योगामध्यें नपुंसकवेदाचा उदय नसतो कारण या गुणस्थानांतून नरकांत जात नाहीं. या गुणस्थानाचीं उदयस्थानें ४

( ९--८--८--७ ) आहेत परंतु तीन वेदां ऐवजीं दोनच वेदांचा उदय असतो म्हणून ४ कषाय × २ वेद × २ हास्ययुगल = १६.

असंयत—या ठिकाणीं वैक्रियिकमिश्र व कार्मण या दोन योगांत स्त्रीवेदाचा उदय नाहीं कारण सम्यग्दृष्टि जीव मरून स्त्रीपर्याय पावत नाहीं. याचीं उदयस्थानें ९-८-८-७व ८-७-७-६ अशीं दोन प्रकारचीं मिळून आठ आहेत. यांत दोनच [ पुरु. नपुं. ] वेदांचा उदय असतो म्हणून कषाय ४ × वेद २ × २ हास्ययुगल = १६. याच गुणस्थानांत औदारिकमिश्रयोगामध्यें स्त्रीवेद व नपुंसक वेद यांचा उदय नसतो कारण सम्यग्दृष्टि देव अथवा नारकी, किंवा पुरुषवेदोदयासहित मनुष्य होतो. यांचींही वर लिहिल्याप्रमाणेंच आठ उदयस्थानें आहेत म्हणून ४ कषाय × १ वेद × २ हास्ययुगल = ८

प्रमत्त—या ठिकाणीं आहारकद्विकांत स्त्री व नपुंसकवेदाचा उदय नसतो. यांची उदयस्थानें ७-६-६-५ / ६-५-५-४ अशा प्रकारें ८ आहेत म्हणून ४कषाय×१वेद×२हास्ययुगल=८.

सासादन, असंयत व प्रमत्त या गुणस्थानांतील उदयस्थानें व प्रकृति यांचें योगापेक्षेनें कोष्टक.

## कोष्टक नंबर ( १५० )

| गुणस्थान | उदयस्थान | प्रकृतिसंख्या | योगसंख्या. | उदयस्थान×योग | प्रकृति×योग |
|---|---|---|---|---|---|
| सासादन | ४ | ३२ | १ वैक्रियिक मिश्र | ४ | ३२ |
| असंयत | ८ | ६० | २ वै०मि०कार्मण | १६ | १२० |
| ,, | ८ | ६० | १ औदारिक मिश्र | ८ | ६० |
| प्रमत्त | ८ | ४४ | २ आहारकद्विक | १६ | ८८ |

### उदयस्थानापेक्षया भंग.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| सासादन उदयस्थान | ४ | प्रत्येकीं भंग | १६ | म्हणून | ४ × १६ = | ६४ |
| असंयत उदयस्थान | १६ | ,, | ,, १६ | म्हणून | १६ × १६ = | २५६ |
| ,, ,, | ८ | ,, | ,, ८ | ,, | ८ × ८ = | ६४ |
| प्रमत्त ,, | १६ | ,, | ,, ८ | ,, | १६ × ८ = | १२८ |
| | | | | | | ५१२ |

## प्रकृत्यपेक्षया भंग.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सासादन–प्रकृति | ३२ | प्रत्येकीं भंग | १६ | म्हणून | ३२ × १६= | | ५१२ |
| असंयत–प्रकृति | १२० | प्रत्येकीं भंग | १६ | म्हणून | १२० × १६= | | १९२० |
| असंयतप्रकृति | ६० | ,, ,, | ८ | ,, | ६० × ८= | | ४८० |
| प्रमत्त ,, | ८८ | ,, ,, | ८ | ,, | ८८ × ८= | | ७०४ |
| | | | | | | | ३६१६ |

**गाथा** ४९७–सासादन गुणस्थानांत वैक्रियिकमिश्र योगामध्यें नपुंसकवेदाचा उदय नसतो कारण दुसऱ्या गुणस्थानांतून नरकांत जात नाहीं.

असंयत गुणस्थानांत वैक्रियिक मिश्र व कार्मणयोगामध्यें स्त्रीवेदाचा उदय नसतो कारण चौथ्या गुणस्थानांतील जीव मरून स्त्री होत नाहीं. मिथ्यादृष्टयादिक अपूर्वकरणापर्यंत जितकीं स्थानें आहेत तीं एकत्र करून चोवीस भंगांनीं गुणिल्यानें जें प्रमाण होतें त्यांत अनिवृत्तिच्या सवेद अवेद भागाचीं किंवा सूक्ष्मसांपरायाचीं एकशे त्रेपन्न स्थानें मिळवावीत आणि अपर्याप्त सासादन असंयत व प्रमत्त यांचीं पांचशें बारा स्थानें मिळवावी व सर्वांची बेरीज करावी.

**गाथा** ४९८–गाथा ४९५ मध्यें योगापेक्षेनें उदयस्थानाचे भंग १२४४१, व गाथा ४९६ मध्यें ५१२ भंग, दाखविले आहेत. दोन्हीं मिळून १२९५३ भंग झाले.

**गाथा** ४९९–गाथा ४९६ मध्यें प्रकृत्यपेक्षया भंग ३६१६ सांगितले. आहेत.

**गाथा** ५००–गाथा ४९५ मध्यें योगापेक्षया मोहनीयकर्माच्यां उदयप्रकृतींची संख्या ८५०२९ व गाथा ४९६ मध्यें ३६१६ दाखविली आहे. दोन्हीं मिळून ८८६४५ भंग झाले.

**गाथा** ५०१–संयमाच्या अपेक्षेनें मोहनीय कर्माच्या उदयस्थानाचे व प्रकृतींचे भंग दाखवितात.

### गुणस्थानापेक्षेनें संयम.

प्रमत्तगुणस्थान—यांत संयम ३ सामायिक, छेदोपस्थापना, परिहारविशुद्धि.

अप्रमत्तगुणस्थान—यांत संयम ३ ,, ,, ,,

अपूर्वकरण—यांत संयम २ सामायिक, छेदोपस्थापना.

अनिवृत्तिकरण—यांत संयम २ ,, ,,

सूक्ष्मसाम्पराय—यांत संयम १ सूक्ष्मसाम्पराय.

११ ते १४ गुणस्थान—यांत संयम १ यथाख्यात.

संयमाच्या अपेक्षेनें मोहनीयाचीं उदयस्थानें व प्रकृति दाखविणारें कोष्टक.

## ( कोष्टक नं. १५१. )

| गुणस्थान | उदयस्थान | प्रकृति | संयम | उदयस्थान×संयम | प्रकृति × संयम |
|---|---|---|---|---|---|
| ६ प्रमत्त | ८ | ४४ | ३ | २४ | १३२ |
| ७ अप्रमत्त | ८ | ४४ | ३ | २४ | १३२ |
| ८ अपूर्वकरण | ४ | २० | २ | ८<br>५६ | ४०<br>३०४ |
| ९ अनि. सवेदभाग | १ | २ | २ | २ | ४ |
| ,, अवेदभाग | १ | १ | २ | २ | २ |
| १० सूक्ष्मसांपराय | १ | १ | १ | १ | १ |

### संयमापेक्षेनें उदयस्थान व प्रकृति यांचे भंग

**उदयस्थानाचे भंग.**

६–७–८ या गुणस्थानांतील उदयस्थान × संयमाची संख्या ५६ आहे. प्रत्येकाचे भंग २४ ह्मणून ५६×२४ = १३४४

९ व्या गुणस्थानांतील सवेदभागाच्या उदयस्थान × संयमाची संख्या २ आहे. प्रत्येकाचे भंग १२ म्हणून २ × १२ = २४

९ व्या गुणस्थानांतील अवेदभागाच्या उदयस्थान × संयमाची संख्या २ आहे. प्रत्येकाचे भंग ४ म्हणून २ × ४ = ८

१० व्या गुणस्थानाची संख्या १ भंग १ म्हणून १ × १ = १

१३७७

**गाथा ५०२**–गाथा ५०१ मध्यें सांगितल्याप्रमाणें ६–७–८ या गुणस्थानांतील मोहनीयाच्या प्रकृति × संयमाची संख्या ३०४ प्रत्येकाचे भंग २४ म्हणून ३०४×२४ = ७२९६

नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत प्रकृति × संयमाची संख्या ४ प्रत्येकाचे भंग १२ म्हणून ४ × १२ = ४८

नवव्या गुणस्थानाच्या अवेदभागांत प्रकृति × संयमाची संख्या २ प्रत्येकाचे भंग ४ म्हणून २ × ४ = ८

दहाव्या गुणस्थानांतील प्रकृति × संयमाची संख्या १ व भंग १ म्हणून १×१ = १

७३५३

याप्रमाणें संयमाच्या अपेक्षेनें मोहनीयकर्माच्या उदयप्रकृतींचे भेद ७३५३ झाले.

**गाथा** ५०३–गुणस्थानांत लेश्या किती असतात तें सांगतात—

| गुणस्थान | लेश्या व नांवें |
|---|---|
| १–२–३–४ | ६ = कृष्ण, नील, कापोत, पीत, पद्म, शुक्ल |
| ५–६–७ | ३ = पीत, पद्म, शुक्ल |
| ८ ते १३ | १ शुक्ल |
| १४ | ० |

**गाथा** ५०४–गुणस्थानांत लेश्यांच्या अपेक्षेनें मोहनीयाचीं उदयस्थानें ५२९७ होतात. त्यांचें कोष्टक.

## कोष्टक नं. १५२

| गुणस्थान | उदयस्थान | प्रकृति | लेश्या | उदयस्थान × लेश्या | प्रकृति × लेश्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | ८ | ६८ | ६ | ४८ | ४०८ |
| २ | ४ | ३२ | ६ | २४ | १९२ |
| ३ | ४ | ३२ | ६ | २४ | १९२ |
| ४ | ८ | ६० | ६ | ४८ | ३६० |
| ५ | ८ | ५२ | ३ | २४ | १५६ |
| ६ | ८ | ४४ | ३ | २४ | १३२ |
| ७ | ८ | ४४ | ३ | २४ | १३२ |
| ८ | ४ | २० | १ | ४ | २० |
| | | | | २२० | १५९२ |
| ९ सवेद | १ | २ | १ | १ | २ |
| ९ अवेद | १ | १ | १ | १ | १ |
| १० | १ | १ | १ | १ | १ |

| | | |
|---|---|---|
| लेश्यापेक्षेनें आठव्या गुणस्थानापर्यंत उदयस्थानें २२० × २४ प्रत्येकीं भंग | = | ५२८० |
| नवव्याच्या सवेदभागांत उदयस्थान १ × १२ भंग | = | १२ |
| नवव्याच्या अवेदभागांत उदयस्थान १ × ४ भंग | = | ४ |
| दहाव्या गुणस्थानांत १ × १ भंग | = | १ |
| | | ५२९७ |

**गाथा ५०५**–लेश्यांच्या अपेक्षेनें मोहनीयाच्या उदयप्रकृतींचे भंग ३८२३७ होतात. खालीं लिहिल्याप्रमाणें.

| | |
|---|---|
| आठव्या गुणस्थानापर्यंत प्रकृतिसंख्या १५९२ व प्रत्येकाचे × २४ भंग | = ३८२०८ |
| नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत प्रकृतिसंख्या २ व प्रत्येकाचे × १२ भंग | = २४ |
| ,, अवेदभागांत प्रकृतिसंख्या १ व प्रत्येकाचे × ४ भंग | = ४ |
| दहाव्या गुणस्थानांत प्रकृतिसंख्या १ व प्रत्येकाचे × १ भंग | = १ |
| | ३८२३७ |

**गाथा ५०६**–सम्यक्त्वापेक्षेनें मोहनीयाच्या उदयस्थानाचे भंग १३७८ होतात. पुढें कोष्टक पाहा.

| गुणस्थान | सम्यक्त्वें | |
|---|---|---|
| ४ ते ७ | ३ | = उपशम, क्षयोपशम, क्षायिक |
| ८ ते ११ | २ | = औपशमिक, क्षायिक |
| १२ ते १४ | १ | = क्षायिक |

**सम्यक्त्वापेक्षेनें मोहनीयाच्या उदयस्थानाचे भंग दाखविणारे**

**[ कोष्टक नं. १५३ ]**

| गुणस्थान | उदयस्थान | प्रकृति | सम्यक्त्व | उद०स्थान×सम्यक्त्व | प्रकृति×सम्य. |
|---|---|---|---|---|---|
| ४ | ४ | ३२ | १ वेदक | ४ | ३२ |
| ,, | ४ | २८ | २ औपशमिकक्षायिक | ८ | ५६ |
| ५ | ४ | २८ | १ वेदक | ४ | २८ |
| ,, | ४ | २४ | २ औपशमिकक्षायिक | ८ | ४८ |
| ६ | ४ | २४ | १ वेदक | ४ | २४ |
| ,, | ४ | २० | २ औपशमिकक्षायिक | ८ | ४० |
| ७ | ४ | २४ | १ वेदक | ४ | २४ |
| ,, | ४ | २० | २ औपशमिकक्षायिक | ८ | ४० |
| ८ | ४ | २० | २ औपशमिकक्षायिक | ८ | ४० |
| | | | | ५६ | ३३२ |
| ९ सवेद | १ | २ | २ औपशमिकक्षायिक | २ | ४ |
| ९ अवेद | १ | १ | २ औपशमिकक्षायिक | २ | २ |
| १० | १ | १ | २ औपशमिकक्षायिक | २ | २ |

पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानापर्यंत उदयस्थान प्रत्येकाचे भंग

५६ × २४ = १३४४

नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत उदयस्थानें व प्रत्येकीं भंग

२ × १२ = २४

नवव्या गुणस्थानाच्या अवेदभागांत उदयस्थानें व प्रत्येकीं भंग

२ × ४ = ८

दहाव्या गुणस्थानांत उदयस्थानें व प्रत्येकीं भंग

२ × १ = २

सम्यक्त्वापेक्षेनें मोहनीयाच्या उदयस्थानाचे भंग किंवा प्रकार १३७८ होतात. १३७८

**गाथा ५०७**–सम्यक्त्वाच्या अपेक्षेनें मोहनीयाच्या उदयप्रकृतींचे भंग ८०२६ होतात.

पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानापर्यंत प्रकृति×सम्यक्त्वाची संख्या भंग

३३२×२४=७९६८

नवव्या गुणस्थानाच्या सवेदभागांत प्रकृति×सम्यक्त्वाची संख्या भंग

४ × १२ = ४८

,, अवेद भागांत प्रकृति×सम्यक्त्वाची संख्या भंग

२ × ४ = ८

दहाव्या गुणस्थानांत प्रकृति × सम्यक्त्वाची संख्या भंग

२ × १ = २

८०२६

वर गाथा ४९० पासून गाथा ५०७ पर्यंत गुणस्थानानुरूप उपयोग, योग संयम, लेश्या व सम्यक्त्व यांच्या आश्रयानें होणारीं मोहनीयांचीं उदयस्थानें व प्रकृति यांचे भेद सांगितले. त्याचप्रमाणें जीवसमास व गतिमार्गणा किंवा पुढें सांगितलीं जाणारीं ४१ जीवपदें यांच्या आश्रयानें होणारीं मोहनीयाचीं उदयस्थानें व प्रकृति यांचे भेद काढतां येतील.

## मोहनीयकर्माच्या सत्त्वस्थानाचें प्रकरण.

**गाथा ५०८**–मोहनीयकर्माचीं सत्त्वस्थानें १५ आहेत.

| सत्त्वस्थान | प्रकृति | प्रकृतींचें विवरण |
|---|---|---|
| १ | २८ | = ३ दर्शनमोहनीय + २५ चारित्रमोहनीय |
| २ | २७ | = २८–१ सम्यक्त्वप्रकृति [ उद्वेलना झाल्यास ] |
| ३ | २६ | = २७–१ मिश्रमोहनीय [ ,, ] |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | २४ | = २८–४ | अनंतानुबंधीकषाय [ विसंयोजन झाल्यास ] |
| ५ | २३ | = २४–१ | मिथ्यात्व [ क्षय पावल्यास ] |
| ६ | २२ | = २३–१ | मिश्र [ क्षय पावल्यास ] |
| ७ | २१ | = २२–१ | सम्यक्त्वप्रकृति [ क्षय पावल्यास ] |
| ८ | १३ | = २१–८ | अप्रत्याख्यान ४ व प्रत्याख्यान ४[ क्षय पावल्यास ] |
| ९ | १२ | = १३–१ | स्त्री किंवा नपुंसकवेद ( क्षय पावल्यास ) |
| १० | ११ | = १२–१ | अवशिष्ट स्त्री किंवा नपुंसकवेद [ क्षय पावल्यास ] |
| ११ | ५ | = ११–६ | हास्यादिषट्क ,, |
| १२ | ४ | = ५–१ | पुरुषवेद ,, |
| १३ | ३ | = ४–१ | संज्वलनक्रोध ,, |
| १४ | २ | = ३–१ | संज्वलनमान ,, |
| १५ | १ | = २–१ | संज्वलनमाया ,, |

या १५ व्या स्थानांत १ बादरलोभ आहे व दहाव्या गुणस्थानांत १ सूक्ष्म लोभ असतो. ती ही एकच प्रकृति असल्यामुळें वेगळें स्थान गणलें नाहीं.

**गाथा ५०९–५१०–५११**–गाथा ५०८ मध्यें मोहनीयकर्माचीं सत्त्वस्थानें सांगितलीं. त्यांपैकीं कोणतीं सत्त्वस्थानें कोणत्या कोणत्या गुणस्थानांत असतात तें सांगतात.

## ( कोष्टक नं. १५४ )

| गुणस्थान | सत्त्वस्थान संख्या | विवरण |
|---|---|---|
| १ | ३ | २८–२७–२६ सम्यक्त्व व मिश्रप्रकृतीची उद्वेलना पहिल्या गुणस्थानांत चारही जीव करतात. नोट–अनादि मिथ्यादृष्टीस २६ प्रकृतींचें सत्त्व असतें. |
| २ | १ | २८ |
| ३ | २ | २८–२४ |
| ४ | ५ | २८–२४–२३–२२–२१ |
| ५ | ५ | ,, ,, ,, ,, ,, |
| ६ | ५ | ,, ,, ,, ,, ,, |
| ७ | ५ | ,, ,, ,, ,, ,, |
| ८ उ. श्रे. | ३ | २८ २४ २१ |
| ८ क्ष. श्रे. | १ | २१ |

| | | |
|---|---|---|
| ९ उ. श्रे. | ३ | २८ २४ २१ |
| ९ क्ष. श्रे. | ९ | २१ १३ १२ ११ ५ ४ ३ २ १ |
| १० उ. श्रे. | ३ | २८ २४ २१ |
| १० क्ष. श्रे. | १ | सूक्ष्म लोभ |
| ११ [illegible] | ३ | २८ २४ २१ |

**गाथा ५१२**–९व्या गुणस्थानांत ८ प्रकृतीचा क्षय झाल्यानंतर जो जीव पुरुष-वेदाच्या उदयासहित श्रेणी चढतो त्या जीवास नवव्या गुणस्थानाच्या पहिल्या भागांत ( जेथे पुरुषवेद व ४ संज्वलनांचा बंध होता ) तीन सत्त्वस्थानें [ १३--१२--११ ] असतात. अशा जीवाच्या नपुंसक व स्त्रीवेदाचा अनुक्रमानें क्षय होतो.

स्त्रीवेदाच्या उदयासहित जो जीव श्रेणी चढतो त्यासही नवव्या गुणस्थानाच्या प्रथमभागांत १३ प्रकृतीचे सत्त्वस्थान असतें. व नपुंसकवेदाचा क्षय झाल्यास १२ प्रकृतीचे सत्त्वस्थान असते. हा जीव ही अगोदर नपुंसकवेदाचा क्षय करून नंतर स्त्रीवेदाचा क्षय करील.

नपुंसकवेदाच्या उदयासहित जो जीव श्रेणी चढतो त्यासही नवव्या गुणस्थानाच्या प्रथम भागांत १३ प्रकृतीचेच सत्त्व असते. त्याच्या नपुंसक व स्त्रीवेदा ( पुरुष व स्त्रीवेदाच्या असे संस्कृत टीकेत आहे ) च्या क्षपणेचा आरंभ एकदम होतो.

**गाथा ५१३**–पुरुषवेदाच्या उदयासह जो जीव क्षपकश्रेणी चढेल त्यास पुरुष वेदाच्या अंतिमखंडाच्या अंतिम समयापर्यंत अर्थात् पुरुषवेदाचा क्षय होण्याच्या अंतिम समयापर्यंत पुरुषवेदाचा उदय व बंध होत राहतो म्हणजे पुरुषवेदाच्या उदयाची प्रथम स्थिति असतांना नपुंसकवेद–क्षपणाखंड किंवा स्त्रीवेद–क्षपणाखंड किंवा पुरुषवेदक्षपणा खंड या तिहींच्या अंतिमखंडाच्या अंतिमसमयापर्यंत पुरुषवेदाचा उदय व बंध होत राहतो. पुरुषवेदक्षपणेच्या अंतिमखंडाच्या निकट ( पुरुषवेदाच्या अंतखंडाचें क्षपण होण्यापूर्वीचा जो काल त्या कालाच्या अगदी जवळचा जो काल त्या कालीं ) नपुंसक व स्त्रीवेदाच्या उदयाचा अभाव होतो.

**गाथा ५१४**–पुरुषवेदाच्या उदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास अनिवृत्ति–करणाच्या सवेदभागांतील अंतिमखंडांत [ हे पहिले स्थान ] व त्याच खंडानिकट त्याच खंडकालांत स्त्री व नपुंसक वेदोदयासहित जो श्रेणी चढेल त्या जीवास स्त्री व नपुंसक वेदाचा उदयाभाव झाला. ( हें दुसरें स्थान ) अशा दोन स्थानांत ११ प्रकृतीं ( १पुरुष वेद ६ हास्यादि ४ संज्वलन ) चे सत्त्वस्थान असतें.

तीन वेदांपैकीं कोणत्याही एका वेदाच्या उदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ७ नोकषाया [ १ पुरुषवेद + ६ हास्यादिक ] च्या क्षपणाचा आरंभ व अंतिमखंडाच्या अंतसमयांत या ७ सातांची सत्त्वव्युच्छित्ति युगपत् होते. नंतर ४ संज्वलन कषायांचेंच सत्त्व राहतें. विशेष हा आहे कीं, जो जीव पुरुषवेदाच्या उदयासहित श्रेणी चढतो त्यास अंतिम आवलींत बांधलेले नूतन समयप्रबद्धाचे निषेक सत्तेंत राहतात म्हणून ५ प्रकृतींचें [ ४ संज्वलन १ पुरुषवेद ] सत्त्व असतें.

नवीन समयप्रबद्ध बद्ध झाल्यापासून एक आवलीपर्यंत तें बद्ध कर्म आहे त्या स्थितींत राहतें. संक्रमण, उदय, उदीरणा, क्षय वगैरे होत नाहीं. त्या कालास **अचलावलि** म्हणतात. पुरुषवेदाचे उर्वरित कर्मपरमाणु क्रोधाच्या क्षपणाकालांत क्रोधरूप होऊन नष्ट होतील.

**गाथा ५१५**–नपुंसक–वेदोदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ४ संज्वलनांचा बंध होतो अशा अनिवृत्तिकरणाच्या सवेदभागांत १३ प्रकृतीं ( ३ वेद + ६ हास्यादि + ४ संज्वलन ) चें सत्त्व असतें.

स्त्रीवेदोदयासहित श्रेणी चढतो त्या जीवास वरील अवस्थेंत १२ प्रकृतींचें सत्त्व असतें.

नपुंसक व स्त्रीवेदाच्या उदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ४ प्रकृतींचा बंध होतो अशा नवव्या गुणस्थानाच्या अवेदभागांत ११ प्रकृतींचें सत्त्व असतें.

नपुंसक व स्त्रीवेदाच्या उदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ७ नोकषायांचा क्षय झाल्यानंतर ४ चें सत्त्व राहतें. परंतु पुरुषवेदोदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ४ अथवा ५ प्रकृतींचें सत्त्व असतें.

तिन्ही वेदांच्या उदयासहित श्रेणी चढणाऱ्या जीवास ३–२–१ प्रकृतींचा बंध होणाऱ्या भागांत अनुक्रमें ३–२–१ प्रकृतींचें सत्त्वस्थान असतें.

येथें नूतन समयप्रबद्ध व उच्छिष्टावलि [ उदय न होतां शिलक राहिलेले प्रथम स्थितीचे निषेक ) यांची विवक्षा केली नाहीं.

पुरुषवेदाचे उर्वरित परमाणु क्रोधरूप होऊन नष्ट होतात त्याचप्रमाणें क्रोध, मान माया यांचे नूतन बद्धांतील उर्वरित कर्मपरमाणु क्रमानें मान, माया, लोभ यांच्या क्षपणाकालांत परमुख होऊन नष्ट होतील.

मोहनीयाच्या बंधस्थानांत कोणकोणतीं सत्त्वस्थानें असतात तें सांगतात.

**गाथा ५१६–५१७**–गाथा ४६३ मध्यें मोहनीयाचे बंधस्थान व गाथा ५०८ मध्यें सत्त्वस्थानाचें कोष्टक आहे.

मोहनीयाच्या बंधस्थानांत कोणकोणतीं सत्त्वस्थानें असतात हें दाखविणारें कोष्टक.

## ( कोष्टक नं. १५५ )

| मोहनीयाचें बंधस्थान | सत्त्वस्थानांची संख्या | सत्त्वस्थानांच्या प्रकृतींचे गट |
|---|---|---|
| २२ | ३ | २८–२७–२६ |
| २१ | १ | २८ |
| १७–१३–९ | ५ | २८-२४-२३-२२-२१ |
| ५ | ६ | २८-२४-२३-२२-२१-११ सं. टीकेप्रमाणें |
| | | २८-२४-२१-१३-१२-११ हिंदी ,, ,, |
| ४ | ७ | ,, ,, ,, ,, ,, ,, ४ |
| ३ | ४ | २८-२४-२१-३ |
| २ | ४ | २८-२४-२१-२ |
| १ | ४ | २८-२४-२१-१ |

येथेंही नूतन समयप्रबद्ध व उच्छिष्टावलि यांची विवक्षा नाहीं.

**गाथा ५१८**—मोहनीयकर्मांत बंधस्थानें १० ( गाथा ४६३ ) व उदयस्थानें ९ ( गाथा ४७५ ) व सत्त्वस्थानें १५ [ गाथा ५०८ ] सांगितलीं आहेत. पुढें नामकर्माचीं स्थानें सांगतील.

### नामकर्माचीं बंधस्थानें.

**गाथा ५१९–५२०**—जीवपदें ४१ असतात.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | नारकी | | पर्याप्त | ११ | ,, | ,, | अपर्याप्त |
| २ | पृथ्वीकायिक | बादर | ,, | १२ | ,, | सूक्ष्म | पर्याप्त |
| ३ | ,, ,, | ,, | अपर्याप्त | १३ | ,, | ,, | अपर्याप्त |
| ४ | ,, ,, | सूक्ष्म | पर्याप्त | १४ | वायुकायिक | बादर | पर्याप्त |
| ५ | ,, ,, | ,, | अपर्याप्त | १५ | ,, | ,, | अपर्याप्त |
| ६ | अप्कायिक | बादर | पर्याप्त | १६ | ,, | सूक्ष्म | पर्याप्त |
| ७ | ,, | ,, | अपर्याप्त | १७ | ,, | ,, | अपर्याप्त |
| ८ | ,, | सूक्ष्म | पर्याप्त | १८ | साधारण वनस्पति(निगोद) | बादर | पर्याप्त |
| ९ | ,, | ,, | अपर्याप्त | १९ | ,, ,, | ,, | ,, अपर्याप्त |
| १० | तेजस्कायिक | बादर | पर्याप्त | २० | ,, ,, | ,, | सूक्ष्म पर्याप्त |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २१ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | ३१ | असंज्ञी पंचेन्द्रिय | अपर्याप्त |
| २२ | प्रत्येक वनस्पति | पर्याप्त | ३२ | संज्ञी पंचेन्द्रिय तिर्यंच | पर्याप्त |
| २३ | ,, ,, | अपर्याप्त | ३३ | संज्ञी पंचेन्द्रिय तिर्यंच | अपर्याप्त |
| २४ | द्वीन्द्रिय | पर्याप्त | ३४ | मनुष्य | पर्याप्त |
| २५ | ,, | अपर्याप्त | ३५ | मनुष्य | अपर्याप्त |
| २६ | त्रीन्द्रिय | पर्याप्त | ३६ | सामान्य | केवलि |
| २७ | त्रीन्द्रिय | अपर्याप्त | ३७ | तीर्थंकर | केवलि |
| २८ | चतुरिन्द्रिय | पर्याप्त | ३८ | समुद्घातप्राप्तसामान्य | केवलि |
| २९ | चतुरिन्द्रिय | अपर्याप्त | ३९ | समुद्घात प्राप्ततीर्थंकर | केवलि |
| ३० | असंज्ञी पंचेन्द्रिय | पर्याप्त | ४० | आहारक शरीर | |
| | | | ४१ | देव | |

## कर्मपदें ३६ चीं नांवें.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | नरकगति नाम | | १९ | साधारण स्थावरवि. बादर एकें. | अपर्याप्त |
| २ | पृथ्वीकाय स्थावरवि. बादर एकें. | पर्याप्त | २० | ,, ,, सूक्ष्म ,, | पर्याप्त |
| ३ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | २१ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त |
| ४ | ,, ,, सूक्ष्म ,, | पर्याप्त | २२ | स्थावरबादरविशिष्ट प्रत्येक वन. | पर्याप्त |
| ५ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | २३ | ,, ,, ,, | अपर्याप्त |
| ६ | अप्काय ,, बादर ,, | पर्याप्त | २४ | त्रस विशिष्ट द्वीन्द्रिय | पर्याप्त |
| ७ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | २५ | ,, ,, ,, | अपर्याप्त |
| ८ | ,, ,, सूक्ष्म ,, | पर्याप्त | २६ | ,, ,, त्रीन्द्रिय | पर्याप्त |
| ९ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | २७ | ,, ,, ,, | अपर्याप्त |
| १० | तेजस्काय ,, बादर ,, | पर्याप्त | २८ | ,, ,, चतुरिंद्रिय | पर्याप्त |
| ११ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | २९ | ,, ,, ,, | अपर्याप्त |
| १२ | ,, ,, सूक्ष्म ,, | पर्याप्त | ३० | ,, ,, असंज्ञी पंचेंद्रिय | पर्याप्त |
| १३ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | ३१ | ,, ,, ,, | अपर्याप्त |
| १४ | वायुकाय स्थावरविशिष्ट बादर एकेंद्रिय | पर्याप्त | ३२ | ,, ,, संज्ञीपंचेंद्रिय तिर्यंच | पर्याप्त |
| १५ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | ३३ | ,, ,, ,, ,, ,,. | अपर्याप्त |
| १६ | ,, ,, सूक्ष्म ,, | पर्याप्त | ३४ | मनुष्यगति नाम | पर्याप्त |
| १७ | ,, ,, ,, ,, | अपर्याप्त | ३५ | ,, ,, | अपर्याप्त |
| १८ | साधारण ,, बादर ,, | पर्याप्त | ३६ | देवगति नाम | |

जीवपदें ४१ व कर्मपदें ३६ सांगितलीं. कर्मपदें ५ कमी व्हावयाचें कारण हें आहे कीं, ४ चार केवलि केवळ जीवपदेंच आहेत कारण केवलिपणा जीवाचा स्वभाव आहे आणि आहारकपदही जीवपद आहे कारण देवगति विना अन्यगतिसहित आहारक प्रकृतीचा बंध होत नाहीं म्हणून देवगतीमध्यें आहारकपद गर्भित केलें आहे.

## कर्मपद व जीवपद यांतील विशेष.

नामकर्माच्या बंधस्थानाच्या अपेक्षेनें कर्मपदें आहेत कारण ह्या ३६ प्रकृतिरूपानें नामकर्माचा बंध होतो व जीवपदें नामकर्माच्या उदय व सत्त्व यांच्या विवक्षेनें आहेत कारण यांचा उदय व सत्त्व हीं जीवांतच असतात.

**गाथा ५२१**—नामकर्माचीं बंधस्थानें ८ असतात.

| बंधस्थान | प्रकृति | |
|---|---|---|
| १ | २३ | हीं ७ सात बंधस्थानें पहिल्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानाच्या सहाव्या भागापर्यंत यथासंभव होतात. [ बांधिलीं जातात ] |
| २ | २५ | |
| ३ | २६ | |
| ४ | २८ | |
| ५ | २९ | |
| ६ | ३० | |
| ७ | ३१ | |
| ८ | १ | हें एक प्रकृतीचें स्थान दोन्ही श्रेणींत अपूर्वकरणाच्या सातव्या भागाच्या प्रथम समयापासून सूक्ष्मसांपरायाच्या अंतिमसमयापर्यंत बांधिलें जातें. |

**गाथा ५२२-२३**–तेवीस प्रकृतींचें बंधस्थान अपर्याप्त प्रकृतिसहित बांधलें जातें.

२५ प्रकृतींचें स्थान पर्याप्त किंवा अपर्याप्तप्रकृतिसहित बांधलें जातें.

२६ आदिशेषस्थानें पर्याप्त प्रकृतिसहितच बांधिलीं जातात त्यांत

२६ प्रकृतींचें स्थान आतप किंवा उद्योतसहित बांधलें जातें.

२८ प्रकृतींचें स्थान देवगति किंवा नरकगतिसहित बांधलें जातें.

२९ व ३० प्रकृतींचें स्थान तिर्यंच, मनुष्य, देव, यापैकीं कोणत्या तरी एका गतिसहित बांधिलें जातें.

३१ प्रकृतींचें स्थान देवगतिसहितच बांधलें जातें.

१ प्रकृतीचें स्थान कोणत्याही गतिसहित बांधलें जात नाहीं.

ज्या स्थानाला जे परिणाम योग्य असतील त्या परिणामासहित जीव त्या त्या स्थानाला बांधतो.

**गाथा** ५२४–आतपप्रकृतीचा बंध पृथ्वीकायबादरपर्याप्तसहितच होतो.

उद्योतप्रकृतीचा बंध तेज,वायु,साधारण वनस्पति,एतत्संबंधीं बादर सूक्ष्म व अन्यसूक्ष्म यांना सोडून तिर्यंचसंबंधी बादरपर्याप्त आदि प्रशस्त प्रकृतीपैकीं कोण्या एका प्रकृतीला घेऊन होतो. अर्थात् पृथ्वीकाय बादरपर्याप्त सहित २६ प्रकृतींचा बंध आतप अथवा उद्योतासहित होतो.

बादर अप्कायिकपर्याप्त आणि प्रत्येक वनस्पति पर्याप्त यांपैकीं एक व उद्योत मिळून २६ प्रकृतींचें बंधस्थान होतें.

द्वीन्द्रिय, त्रीन्द्रिय, चतुरिन्द्रिय, असंज्ञीपंचेंद्रिय व संज्ञीपंचेंद्रिय यांपैकीं कोण्या एका प्रकृतिसहित उद्योत प्रकृतीला घेऊन ३० प्रकृतींचें बंधस्थान होतें.

**गाथा** ५२५-तीर्थंकर प्रकृतीचा बंध देव अथवा नारकी जीव चौथ्या गुण-स्थानांत असतांना होतो व हा बंध मनुष्यगतिनामकर्मासहितच होतो परंतु चौथ्या गुणस्थानापासून ७ व्या गुणस्थानापर्यंत मनुष्यपर्यायांत तीर्थंकर प्रकृतीचा बंध होतो त्यावेळीं देवगतिसाहितच तो बंध होतो.

आहारकद्विक अथवा तर्थिकरप्रकृतिसह आहारकद्विक यांचा बंध देवगतिसहितच संयमी मुनींना होतो म्हणजे देव अथवा नारकीजीव मनुष्यगतिसहित तर्थिकर प्रकृति बांधील. तें बंधस्थान ३० प्रकृतींचें असेल व मनुष्यपर्यायांत देवगतिसाहित तीर्थंकर प्रकृतीचा बंध होईल तें बंधस्थान २९ प्रकृतींचें असेल.

आहारकद्विक ( देवगतिसाहित किंवा देवगति व तीर्थंकरसहित ) चा बंध ७ व्या गुणस्थानापासून आठव्या गुणस्थानाच्या सहाव्या भागापर्यंत संयमी मुनींना होतो त्यांपैकीं देवगतिसहित आहारकद्विकाचा बंध होतो तें बंधस्थान ३० प्रकृतींचें व देवगति व तीर्थंकरसहित आहारकद्विकाचा बंध होतो तें बंधस्थान ३१ प्रकृतींचें असेल.

**गाथा** ५२६–५२७–५२८— नामकर्माच्या ९३ प्रकृतिपैकीं ९ ध्रुव प्रकृति आहेत यांचा बंध सर्व जीवांना निरंतर होत असतो-त्या ध्रुवप्रकृति (गाथा ३१७ पहा)

१ तैजस शरीर २ कार्मण शरीर ३ अगुरुलघु ४ उपघात ५ निर्माण व ६-७-८-९ चार वर्णादिक [ स्पर्श, रस, गंध, वर्ण ] या ९३ प्रकृतींत ९ युगलप्रकृति आहेत. युगलाचा बंध मिळून होत नाहीं. युगलापैकीं एकच प्रकृतीचा बंध होईल.

९ युगल= १ त्रस–स्थावर २ बादर-सूक्ष्म ३ पर्याप्त-अपर्याप्त ४ प्रत्येक-साधारण ५ स्थिर–अस्थिर ६ शुभ–अशुभ ७ सुभग–दुर्भग ८ आदेय–अनादेय ९ यशःकीर्ति–अयशःकीर्ति.

चार गति, पांच एकेंद्रियादि जाति, तीन औदारिक, वैक्रियिक, आहारक शरीर, सहा समचतुरस्रादि संस्थानें, व चार गत्यानुपूर्व्य, या पांच प्रकारच्या पिंडप्रकृतींतून एका पिंडांतील एका प्रकृतीचाच बंध एका वेळेस होतो.

## सामान्य बंधयोग्य २३ प्रकृति

९ ध्रुव प्रकृति + ९ युगलांपैकीं एक एक प्रकृति + ५ पिंडप्रकृतींपैकीं एक एक = २३ यांचा बंध सामान्यपणें सर्व जीवांस होतो.

६ संहनन ३ औदारिक अंगोपांग या दोन पिंडप्रकृति पैकीं एक एक प्रकृतीचा बंध त्रस पर्याप्त किंवा त्रस अपर्याप्त यांसह होतो.

सुस्वर दुःस्वर, प्रशस्त-अप्रशस्त विहायोगति या दोन युगलांपैकीं एक एक प्रकृतीचा बंध त्रस पर्याप्तासहितच होतो.

उच्छ्वास व परघात कर्माचा बंध त्रस किंवा स्थावर पर्याप्तासहितच होतो.

आतप, उद्योत, तीर्थंकर, आहारकद्विक यांचा बंध गाथा ५२४–२५ मध्यें वर्णिल्याप्रमाणें योग्य पदांत होतो.

नोट—नामकर्माच्या ९३ प्रकृती पैकीं ६७ प्रकृति बंधयोग्य मानिल्या आहेत व २६ प्रकृति बंधयोग्य नाहींत.

५ बंधन + ५ संघात + १६ वर्णादिक वीस पैकीं चारांचाच बंध होतो म्हणून एकंदर २६ बंधयोग्य नाहींत.

या ६७ प्रकृतींचा बंध कसा होतो तें गाथा ५२६–५२७–५२८ यांत दाखविलें आहे.

आहारकद्विकाच्या दोन प्रकृति, औदारिकादि तीन शरीरें व औदारिकादिक तीन अंगोपांग यांत गार्भित आहेत त्या दोन कमी केल्या म्हणजे बाकी ६७ शिलक राहतात.

**गाथा ५२९**–तीर्थंकर व आहारकाद्विकाचा युगपत् ही बंध होतो. सामान्य बंधयोग्य प्रकृति २३–यांत यथायोग्य प्रकृति मिळवून बंधस्थानें व प्रकृतींची संख्या काढतां येतें.

**गाथा ५३०–३१**–नामकर्माच्या बंधस्थानाचें व प्रकृतींचें विवरण.

## ( कोष्टक नं. १५६ )

| बंधस्थान | प्रकार | संकेताक्षर | प्रकृति विवरण |
|---|---|---|---|
| (१)२३ | एकेंद्रिय अपर्याप्तयुत | ए. अ. | ९ ध्रुव<br>१ तैजसशरीर १ कार्मणशरीर १ अगुरुलघु १ उपघात १ निर्माण ४ वर्णादि = ९<br>१ स्थावर १ अपर्याप्त १ तिर्यंचगति १ एकेंद्रियजाति १ औदारिकशरीर १ तिर्यंचगत्यानुपूर्व्य १ संस्थान सहा पैकीं १बादर सूक्ष्मापैकीं, १ प्रत्येक साधारणा पैकीं, १ स्थिर अस्थिरापैकीं १ शुभ अशुभापैकीं, १ सुभग दुर्भगापैकीं, १ आदेय अनादेयापैकीं १ यश अयशापैकीं एकूण २३ |
| (२)२५ | १ एकेंद्रियपर्याप्तयुत | ए. प. | २५ = २३ वरील—१ अपर्याप्त + ३ पर्याप्त, उच्छ्वास, परघात. |
| | २ द्वींद्रिय अपर्याप्तयुत | द्वि. अ. | २५=वरील २५–५ स्थावर, पर्याप्त एकेंद्रिय, उच्छ्वास, परघात + ५ त्रस, अपर्याप्त, द्वीन्द्रिय, १ संहनन[स्फाटिक] १ औदारिक अंगोपांग |
| | ३ त्रींद्रिय अपर्याप्तयुत | त्रि. अ. | २५=दुसऱ्या प्रकारांतील २५–१ द्वींन्द्रिय + १ त्रीन्द्रिय |
| | ४ चतुरिंद्रिय अपर्याप्तयुत | च. अ. | २५=तिसऱ्या प्रकारांतील २५ –१ त्रीन्द्रिय + १ चतुरिंदिय. |
| | ५ पंचेंद्रिय अपर्याप्तयुत | पं. अ. | २५=चवथ्या प्रकारांतील २५ – १ चतुरिंद्रिय + १ पंचेंद्रिय. |
| | ६ मनुष्य अपर्याप्तयुत | म. अ. | २५=पांचव्या प्रकारांतील २५ – १ तिर्यचगति १ तिर्यचगत्यानुपूर्व + १ मनुष्यगति १ मनुष्यगत्यानुपूर्व. |
| (३)२६ | १ एकेंद्रिय पर्याप्त आतपयुत | ए. प. आ. | २६=२५च्या सहाव्या प्रकारांतील २५–७ त्रस, अपर्याप्त, मनुष्यगति, मनुष्यगत्यानुपूर्व्य, पंचेंद्रिय, संहनन (स्फाटिक), औदारिकअंगोपांग + ८ स्थावर, पर्याप्त, |

| बंधस्थान | प्रकार | संकेताक्षर | प्रकृति विवरण |
| --- | --- | --- | --- |
| | | | तिर्यंचगति, एकेंद्रियं, उच्छ्वास,आतप, परघात, तिर्यंचगत्यानुपूर्व्य. |
| | [२] एकेंद्रिय पर्याप्त उद्योतयुत | ए. प. उ. | २६ वरील–आतप + उद्योत |
| (४)२८ | १ देवगतियुत | दे. | २८=९ ध्रुव प्रकृति + १ त्रास, १ बादर, १ पर्याप्त, १ प्रत्येक १ स्थिर अस्थिरापैकीं एक १ शुभाशुभपैकीं एक, १सुभग,१आदेय,१यश अयशापैकीं एक, देवगति १ देवगत्यानुपूर्व्य, १ पंचेंद्रिय, १ वैक्रियिकशरीर, १ समचतु० संस्थान, १ वैक्रि०अंगोपांग १सुस्वर, १प्रशस्तविहायोगति, १ उच्छ्वास, १ परघात. |
| | (२) नरकगतियुत | न. | २८=९ध्रुव+त्रास, बादर, पर्याप्त, प्रत्येक, अस्थिर, अशुभ, दुर्भग, अनादेय, अयश, नरकगति, नरकगत्यानुपूर्व्य, पंचेंद्रिय, वैक्रियिकशरीर, वैक्रि०अंगोपांग, हुंडसंस्थान, दुःस्वर, अप्रशस्तविहायोगति, उच्छ्वास, परघात. |
| (५)२९ | (१) द्वींद्रियपर्याप्तयुत | द्वि. प. | २९=९ ध्रुव + २० [ त्रस, बादर, पर्याप्त, प्रत्येक, स्थिर अस्थिरापैकीं एक शुभाशुभापैकीं एक, दुर्भग, अनादय, यश अयशापैकीं एक, तिर्यंचद्विक, द्वींद्रिय, औदारिकद्विक, हुंडकसंस्थान, सृपाटिकसंहनन, दुःस्वर, अप्रशस्त विहायोगति, उच्छ्वास, परघात. ] |
| | [२] त्रींद्रियपर्याप्तयुत | त्रि. प. | २९=पहिल्या प्रकारांतील२९–द्वींद्रिय+त्रींद्रिय |
| | [३] चतुरिंद्रियपर्याप्तयुत | च. प. | २९=वरील प्रकारांतील२९–त्रींद्रि+चतुरिंद्रिय |
| | (४)पंचेंद्रियपर्याप्तयुत | पं. प. | २९=वरील २९–चतुरिंद्रि+पंचेंद्रिय<br>विशेष गोष्ट ही आहे कीं, या प्रकारांत स्थिर अस्थिरापैकीं एक, शुभअशुभापैकीं एक, सुभग दुर्भगापैकीं एक, आदेय अनादेयापैकीं एक, यशअयशापैकीं एक, सहासंस्थानापैकीं एक, सहासंहननापैकीं एक, सुस्वर दुस्वरापैकीं |

| बंधस्थान | प्रकार | संकेताक्षर | प्रकृतीविवरण |
| --- | --- | --- | --- |
| | | | एक, प्रशस्त अप्रशस्तविहायोगतिपैकीं एक, याप्रमाणें कोणास कोणता कोणास कोणता तरी बंध होईल. |
| | [५]मनुष्यपर्याप्तियुत | म. प. | २९=वरील २९ पैकीं तिर्यंचद्विक कमी करून मनुष्यद्विक वाढवावें. |
| | [६]देवतीर्थयुत | दे. ती. | २९=९ ध्रुव+२०[ त्रास,बादर,प्रत्येक,पर्याप्त, स्थिरअस्थिरापैकीं एक, शुभाशुभापैकीं एक, सुभग,आदेय,यशअयशापैकीं एक, देवद्विक, पंचेंद्रिय, वैक्रियिकद्विक, समचतुरस्रसंस्थान, सुस्वर, प्रशस्तविहायोगति, उच्छ्वास, परघात, तीर्थंकर. |
| [६]३० | [१]द्वींद्रियपर्याप्त उद्योतयुत | द्वी. प. उ० | ३०=पंचमस्थानांतील पहिल्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्या व + १ उद्योत. |
| | [२]त्रींद्रियपर्याप्त उद्योतयुत | त्रीं. प. उ० | ३०=पंचमस्थानांतील दुसऱ्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्यांत + १ उद्योत. |
| | [३]चतुरिंद्रियपर्याप्त उद्योतयुत | च. प. उ० | ३०=पंचमस्थानांतील तिसऱ्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्यांत + १ उद्योत. |
| | [४]पंचेंद्रियपर्याप्त उद्योतयुत | पं. प. उ० | ३०=पंचमस्थानांतील चवथ्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्यांत + १ उद्योत. |
| | [५] मनुष्यतीर्थयुत | म. ती. | ३०=पंचमस्थानांतील पांचव्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्यांत + १ तीर्थंकर यांत विशेष गोष्ट ही आहे कीं, स्थिर अस्थिर पैकीं एक, शुभाशुभा पैकीं एक, यश अयशा पैकीं एक, सुभग दुर्भगा पैकीं एक, यापैकीं कोणत्या तरी एका प्रकृतीचा बंध होतो. नोट:—या प्रकारांतील बंध चवथ्या गुणस्थानांतील देव किंवा नारकी जीवांस होईल. |
| | [६] देवआहारकयुत | दे. आ. | ३०=पंचमस्थानांतील सहाव्या प्रकारांत २९ प्रकृति आहेत त्यांत − १ तीर्थंकर + २ आहारकद्विक |

| बंधस्थान | प्रकार | संकेताक्षर | प्रकृति विवरण |
|---|---|---|---|
| [७]३१ | देवआहारक तीर्थयुत | दे. आ. ती. | ३१= पंचमस्थानांतील सहाव्या प्रकारांतील प्रकृति २९ + दोन आहारकद्विक. |
| [८]१ | (१) यश | य. | यशःकीर्ति प्रकृतीचा बंध अपूर्वकरणाच्या सातव्या भागापासून सूक्ष्मसांपराय गुणस्थानापर्यंत होतो. |

**गाथा ५३२**–सहा संस्थानें, सहा संहननें, विहायोगतियुगल, प्रत्येक साधारण, स्थिर अस्थिर, शुभ अशुभ, सुभग दुर्भग, आदेय अनादेय, यश अयश, या पिंडप्रकृतिपैकीं एक एक प्रकृतीचा बंध एका समयांत होईल.

प्रकृतीच्या परिवर्तनामुळें परस्पर गुणाकार केल्यास(६×६×२×२×२×२×२×२×२) ४६०८ भंग होतात.

**गाथा ५३३**-नरकगतिसहित बंधस्थानांत हुंडक संस्थान,अप्रशस्त विहायोगत्यादि अप्रशस्त प्रकृतीचाच बंध होतो. तसेंच त्रासस्थावरसहित अपर्याप्ताच्या बंधस्थानांत दुर्भग, अनादेय आदि अप्रशस्त प्रकृतींचाच बंध होतो. म्हणून २८ प्रकृतींच्या ( न ) प्रकारांत व २३ प्रकृतीच्या ( ए, अ ) प्रकारामध्यें व २५ प्रकृतीच्या पांच अपर्याप्त प्रकारांत एक एकच भंग होईल.

**गाथा ५३४**–एकेंद्रियांच्या अकरा भेदांत साधारण,बादर,पर्याप्त आणि सर्व सूक्ष्मपर्याप्त सहित २५ प्रकृतींच्या बंधस्थानांत पूर्वोक्त अप्रशस्त प्रकृतींचाच बंध होतो, परंतु स्थिर अस्थिरा पैकीं एक, शुभाशुभापैकीं एक, कोणत्याही प्रकृतीचा बंध होतो. पृथ्वी, अप्, तेज, वायु, साधारण यांच्या सूक्ष्मपर्याप्त सहित पंचवीसाच्या स्थानांतील पांच स्थानांमध्यें चार चार भंग समजावेत. म्हणून २ × २ = ४ भंग होतील.

**गाथा ५३५**–पृथ्वी, अप्, तेज, वायु, प्रत्येक वनस्पति, द्वींद्रिय, त्रींन्द्रिय, चतुरिंद्रिय, असंज्ञीपंचेंद्रियासहित २५, २६, २९, ३० च्या बंधस्थानांत दुर्भग अनादेयादि अप्रशस्त प्रकृतींचाच बंध होतो; परंतु तीन युगलांतून [ स्थिर, अस्थिर, शुभ अशुभ, यश अयश ] कोणत्या तरी एका प्रकृतीचा बंध होईल म्हणून(२×२×२) = ८ भंग होतील.

सारांश खालीं लिहिलेल्या स्थानांत आठ आठ भंग होतात.

[ १ ] पृथ्वीकाय बादर पर्याप्तयुत २५ चें स्थान

[ २ ] पृथ्वीकाय बादर आतपयुत २६ चें स्थान.

[ ३ ] ,, ,, उद्योतयुत २६ चें स्थान.

[ ४ ] अप्काय ,, २५ चें स्थान.

[ ५ ] ,, ,, उद्योतसहित २६ चें स्थान.

[ ६ ] तेजस्काय ,, २५ चें स्थान.

[ ७ ] वायुकाय ,, २५ चें स्थान.

[ ८ ] प्रत्येक वनस्पति पर्याप्तयुत २५ चें स्थान.

[ ९ ] ,, ,, उद्योतसहित २६ चें स्थान.

[ १० ] द्वीन्द्रिय पर्याप्तयुत २९ चें स्थान.

[ ११ ] त्रींद्रिय पर्याप्तयुत २९ चें स्थान.

[ १२ ] चतुरिंद्रिय पर्याप्तयुत २९ चें स्थान.

[ १३ ] असंज्ञी पंचेंद्रिय पर्याप्तयुत २९ चें स्थान.

[ १४ ] द्वीन्द्रिय पर्याप्त उद्योतयुत ३० चें स्थान.

[ १५ ] त्रींद्रिय ,, ,, ,, ३० चें स्थान.

[ १६ ] चतुरिंद्रिय ,, ,, ,, ३० चें स्थान.

[ १७ ] असंज्ञीपंचेंद्रिय पर्याप्त उद्योतयुत ३० चें स्थान.

**गाथा** ५३६–तिर्यंचगति पर्याप्तयुत संज्ञी २९ चें स्थान ( प्रकार ४ था ) व उद्योतयुत ३० चें स्थान ( प्रकार ४ था ) व मनुष्यगति पर्याप्तयुत २९ चें स्थान ( प्रकार ५ वा ) यांत ६ संस्थान, ६ संहनन, ७ युगल ( स्थिर अस्थिरादि ) या पैकीं कोणास कशाचा कोणास कशाचा बंध होईल म्हणून ६×६×२×२×२×२×२×२×२ =४६०८ भंग होतील. मिथ्यात्व गुणस्थानांत हा बंध होतो.

उद्योतरहित २९ चें स्थान ( प्रकार ४ था ) व उद्योतसहित ३० चें स्थान ( प्रकार ४ था ) १ मनुष्यगति पर्याप्तयुत २९ चें स्थान ( प्रकार ५ वा ) यांचा बंध सासादन गुणस्थानांत होईल.तेव्हां हुंडक सोडून बाकीचीं ५ संस्थानें व असंप्राप्तासृपाटिका सोडून ५ संहननें यांचा बंध होतो. हुंडकसंस्थान व असंप्राप्तासृपाटिका यांची बंधव्युच्छित्ति पहिल्या गुणस्थानांतच होऊन जाते. या २ऱ्या गुणस्थानांत स्थिर अस्थिरादि ७ युगलांचाही बंध होतो. या मुळें ५×५×२×२×२×२×२×२×२ =३२०० भंग होतील.

**गाथा** ५३७ देव अथवा नारक, मिश्र किंवा असंयत गुणस्थानांत असल्यास त्या जीवांस मनुष्यगतियुत २९ ( प्रकार ५ ) चा बंध होईल. तसेंच देव, नारक असंयत असतील तर ३० चा ( मनुष्यगति पर्याप्त तीर्थंकरयुत ५ वा प्रकार ) बंध होईल. यांत स्थिर अस्थिर, शुभ अशुभ, यश अयश, या तीन युगलांचा बंध होईल. इथें एक

शुभसंस्थान व शुभसंहननाचाच बंध होईल. बाकीच्या ४ युगलांपैकीं शुभ प्रकृतींचाच बंध होईल. म्हणून तीन स्थानाचे २×२×२=८ भंग होतील.

मिथ्यात्वापासून चौथ्या गुणस्थानापर्यंत देवगतियुत २८ चा ( पहिला प्रकार ) बंध होतो. व ४ थ्या गुणस्थानवर्ती जीवास देवगतितीर्थंकरयुत २९ चा [ ६ वा प्रकार ) बंध होतो व पांचव्या आणि सहाव्या गुणस्थानांत देवगतियुत २८ चा [प्रकार १ ला ] व देवगति तीर्थंकरयुत २९ चा ( ६ वा प्रकार ) बंध होतो. स्थिर अस्थिर, शुभ अशुभ, यश अयश, या तीन युगलांचा बंध होतो. बाकीच्या चार युगलांपैकीं शुभ प्रकृतींचाच बंध होईल म्हणून याचे आठ भंग होतील. २×२×२=८

अप्रमत्त व अपूर्वकरण गुणस्थानांत देवयुत २८ चा व तीर्थंकरयुत देवगति २९ चा व तीर्थंकररहित आहारकद्विकयुत ३० चा ( ६ वा प्रकार ) बंध होईल व तीर्थंकर आहारकद्विकयुत ३१ चा बंध होईल. या चारही बंधस्थानांत प्रतिपक्षी अशुभ प्रकृतींचा बंध होत नाहीं, शुभचाच बंध होतो, म्हणून १ एकच भंग होतो.

अपूर्वकरणाच्या अंतिम भागांतील प्रथमसमयापासून सूक्ष्मसांपरायाच्या अंतिमसमयापर्यंत एक यशस्कीर्ति नामकर्माचाच बंध होतो म्हणून एक एकच भंग होतो.

## कोणता पर्याय सोडून कोणत्या पर्यायांत जन्मतो याचें वर्णन.

### नरकगति.

**गाथा ५३८**—पहिल्या नरकापासून तिसऱ्या नरकापर्यंतचे नारकी जीव मरून गर्भज, पंचेंद्रिय, पर्याप्त, संज्ञी, कर्मभूमीचे मनुष्य किंवा तिर्यंचच होतात; परंतु ते चक्रवर्ती, बलभद्र, नारायण, प्रतिनारायण होत नाहींत.

विशेष—अडीच द्वीपांत १५ कर्मभूमि ( जंबूद्वीपांत १ भरत, १ ऐरावत, १ विदेह. धातकीखंडांत २ भरत, २ ऐरावत, २ विदेह, व पुष्करार्धांत २ भरत, २ ऐरावत, २ विदेह, मिळून १५ ) आहेत. त्यांत तिर्यंच अथवा मनुष्य व लवणोदधि, कालोदधिसमुद्रांत व स्वयंप्रभाचल पर्वताच्यापुढें अर्ध स्वयंभूरमणद्वीपांत व सर्व स्वयभूं रमणसमुद्रांत व त्याच्या पलीकडे मध्यलोकाचे चार कोण आहेत त्यांत पहिल्या तीन नरकाचे जीव जलचर, स्थलचर व नभश्चर तिर्यंच होऊं शकतात.

३० तीस भोगभूमि, ( ६ जंबूद्वीपांत, १२ धातकीखंडांत, १२ पुष्करार्धांत ) व ९६ कुभोगभूमि यांतील तिर्यंच किंवा मनुष्यांत वरील नारकी उत्पन्न होत नाहीं. तसेंच मानुषोत्तर पर्वत व स्वयंप्रभाचलपर्वत या दोहोंच्या मध्यांतील असंख्यांत द्वीप समुद्रांतही उत्पन्न होत नाहीं.

४ । ५ । ६ या नरकांतील जीव मरून पूर्वोक्त मनुष्य व तिर्यंच होतात. तिसऱ्या

नरकापर्यंतचे नारकी तीर्थंकर होऊं शकतात या पुढील नरकांतील नारकी तीर्थंकर होऊं शकत नाहींत. चौथ्या नरकापर्यंतचे नारकी चरमशरीरी होऊं शकतात. पांचव्यापर्यंतचे नारकी सकलसंयमी होऊं शकतात. सहाव्या नरकांतील नारकी देशसंयत गुणस्थानापर्यंत तिर्यंच किंवा मनुष्य होऊं शकतात. सातव्या नरकांतील नारकी मिथ्यादृष्टि तिर्यंच होईल.

**गाथा ५३९**—सातव्या नरकांतील जीवास तिसऱ्या किंवा चौथ्या गुणस्थानांत असतांना मनुष्यद्विक व उच्चगोत्राचा नियमानें बंध होतो; परंतु या नरकांतील जीव दुसऱ्या, तिसऱ्या किंवा चौथ्या गुणस्थानांत असेल तरी मरतांना त्याचें मिथ्यात्व गुणस्थानच होतें.

## तिर्यंचगति.

**गाथा ५४०**—तिर्यंचगतींतील बादर किंवा सूक्ष्म पर्याप्त किंवा अपर्याप्त, असे अग्निकायिक वा वातकायिक जीव मरून नियमानें तिर्यंच गतींतच उत्पन्न होतात. परंतु भोगभूमींत पंचेंद्रिय तिर्यंच होत नाहींत. तर बादर, सूक्ष्म, पर्याप्त, अपर्याप्त, पृथ्वी, अग्नि, जल, वायु, साधारण वनस्पति, पर्याप्त, अपर्याप्त, प्रतिष्ठित, अप्रतिष्ठित, प्रत्येक वनस्पति, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, असंज्ञी, संज्ञी, पंचेंद्रिय तिर्यंचांत ते उत्पन्न होतात.

बादर किंवा सूक्ष्म पर्याप्त किंवा अपर्याप्त पृथ्वीकायिक, जलकायिक, नित्यनिगोद इतरनिगोद, वनस्पति व पर्याप्त अपर्याप्त, प्रतिष्ठित अप्रतिष्ठित प्रत्येक वनस्पति व पर्याप्त अपर्याप्त द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, जीव मरून अग्नि व वायुकाय सोडून सर्व तिर्यंचांत आणि त्रेसष्ट शलाका पुरुष सोडून सर्व मनुष्यांत उत्पन्न होतात. नित्य व इतर निगोदांतील सूक्ष्म जीव मरून मनुष्य झाल्यास सम्यक्त्व व देशसंयम ग्रहण करूं शकतील. परंतु सकलसंयम ग्रहण करूं शकणार नाहींत.

असंज्ञीपंचेंद्रिय मरून पूर्वोक्त तिर्यंच अथवा मनुष्यांत उत्पन्न होतील किंवा पहिल्या नरकांत व भवनवासी व व्यंतरदेवांत उत्पन्न होतील, अन्यदेव अथवा नारकी होत नाहींत. कारण असंज्ञी जीवाच्या आयूचा उत्कृष्ट स्थितिबंध पल्याच्या असंख्याताव्या भागाहून अधिक असूं शकत नाहीं.

**गाथा ५४१**—संज्ञीपंचेंद्रिय तिर्यंचाहि असंज्ञी पंचेंद्रिय तिर्यंचाप्रमाणें सर्व ठिकाणीं जन्मतो. तसेंच सर्व नरक, सर्वभोगभूमि व अच्युतस्वर्गापर्यंतच्या देवांत जन्मतो.

## मनुष्यगति.

कर्मभूमींतील पर्याप्त मनुष्य संज्ञी पंचेंद्रिय तिर्यंचाप्रमाणें सर्व ठिकाणीं जन्मतो. तसेंच अहमिंद्रही होऊं शकतो.

अपर्याप्त मनुष्य कर्मभूमींतील तिर्यंचांत तसेंच तीर्थकरादि पद सोडून सामान्य मनुष्यांत जन्म घेतो.

तीस भोगभूमींतील तिर्यंच व मनुष्य व असंख्यात द्वीपसमुद्रांतील जघन्य भोग-भूमीचे तिर्यंच सम्यक्दृष्टि असतील तर सौधर्म व ईशानस्वर्गांत जन्मतात आणि त्यांचें गुणस्थान पहिलें किंवा दुसरें असेल तर भवनत्रिक देवांत जन्म होतो.

कुभोगभूमींतील मनुष्य भवनत्रिक देवांत जन्मतात.

चरमशरीरी मनुष्य मोक्षाला जातात.

**गाथा ५४२–४३** आहारक देहासः प्रमत्तसंयमी मरण पावल्यास वैमानिक देवांत उत्पन्न होतो.

## देवगति.

सर्वार्थसिद्धिपर्यंतचे देव पंधरा कर्मभूमींतील मनुष्यांतच जन्मतात, परंतु बारा स्वर्गापर्यंतचे देव कर्मभूमींतील मनुष्यांत व १५ कर्मभूमींत व लवणोदधि कालोदधि, स्वयंभूरमणाचें अपरार्धद्वीप, स्वयंभूरमणसमुद्र यांत संज्ञी, पर्याप्त जलचर, स्थलचर, नभश्चर, तिर्यंचही होतात.

दुसऱ्या ईशान स्वर्गापर्यंतचे देव वर सांगितल्याप्रमाणें मनुष्य तिर्यंचांत व बादर-पर्याप्त, पृथ्वी, जल, प्रत्येक वनस्पति, एकेंद्रियही होतात.

भवनत्रिक देव मरून सौधर्म ईशान स्वर्गांतील देवाप्रमाणेंच जन्मतात परंतु ते तीर्थंकरादि त्रेसष्ट शलाकापुरुषांत जन्मत नाहींत.

**गाथा ५४४**–गुणस्थानापेक्षेनें नामकर्माच्या बंधस्थानाचें **कोष्टक नं. १५७**

| गुणस्थान | बंधस्थान [ गाथा ५३०–३१ प्रमाणें |
|---|---|
| १ | (२३), ( २५ चे सहाही प्रकार ), ( २६ चे दोन्ही प्रकार ) ( २८ चे दोन्ही प्र. ) (२९ चे पहिले ५ प्रकार ) ( ३० चे पहिले चार प्रकार ) |
| २ | २९ चा चौथा प्रकार व पांचवा प्रकार, ३० चा चौथा प्र. २८ चा पहिला प्र. |
| ३ | २९ चा पांचवा प्रकार, २८ चा पहिला प्रकार. |
| ४ | २९ चा पांचवा व सहावा प्र. ३० चा पांचवा प्र. व २८ चा पहिला प्र. |
| ५ | २८ चा पहिला प्र, २९ चा सहावा प्र. |
| ६ | ,, ,, |
| ७ | ,, ,, व ३० चा ६ वा प्र. ३१ |
| ८ | ,, ,, ,, ,, ,, यशःप्रकृति |
| ९ | यशःप्रकृति–एकचें स्थान |
| १० | ,, ,, ,, |

नोटः—गाथा २१७ कोष्टक ५३ पहा.

## गतिमार्गणेच्या अपेक्षेनें बंधस्थानें.

नरकगतींत २९ चा ४ था व ५ वा प्रकार व ३० चा चौथा पांचवा प्रकार सहाव्या नरकापर्यंत २९ व्या स्थनाचे चौथा ४ व ५ पांचवा प्रका यांतील बंध होतो. सातव्या नरकापर्यंत २९ व्या स्थानाचा ४ था व ३० व्या स्थानाचा ४ था प्रकार यांतील बंध होतो. तिसऱ्या नरकापर्यंत ३० व्या स्थानाचा ५ वा प्र. यांतील बंध होतो.

## नारकीच्या गुणस्थानापेक्षेनें बंधस्थानाचें ( कोष्टक नं. १५८ )

| गुणस्थान | बंधस्थान |
|---|---|
| १ | २९ व्या बंधस्थानाचा ४ था प्र. २९ व्या बंधस्थानाचा ५ वा प्र. यांतील बंध होतो |
| २ | ,, ,, ,, ,, ,, |
| ३ | २९ चा पांचवा प्रकार यांतील बंध होतो. |
| ४ | २९ व्या बंधस्थानाचा ५ वा प्रकार व ३० व्या बंधस्थानाचा पांचवा प्रकार यांतील बंध होतो. |

## तिर्यंचगतिमध्यें बंधस्थानें.

तिर्यंचगतींत ६ ही ( २३, २५ सर्व प्रकार, २६ सर्व प्रकार, २८ सर्व प्रकार, २९ चे पहिले चार प्रकार ) स्थानें बंधस्थानें आहेत. परंतु लब्ध्यपर्याप्त तिर्यंच २८ व्या स्थानांस बांधीत नाहीं.

## मनुष्यगतीमध्यें बंधस्थानें.

मनुष्यगतींत सर्व बंधस्थानें असूं शकतात.

## देवगतींत बंधस्थानें.

देवगतींत २५ चा पहिला प्रकार, २६ चा पहिला व दुसरा प्रकार व २९ चा चौथा व पांचवा प्रकार व ३० चा चौथा व पांचवा प्रकार यांतील बंधस्थानें असूं शकतात.

## इंद्रिय व कायमार्गणेंत बंधस्थानें.

**गाथा** ५४५-पंचेंद्रिय व त्रस कायमार्गणेंत बंधांचीं सर्व स्थानें संभवतात. एकेंद्रियापासून चतुरिंद्रियापर्यंत व पृथ्वीकायादि पांच स्थावरांत बंधस्थानें ५ संभवतात. तीं स्थानें २३, २५, २६, २९, ३० ( यांतील संभवनीय प्रकार पहावे. )

## योगमार्गणेंत बंधस्थानें.

चार मनोयोग, चार वचनयोग व औदारिक काय योग यांत सर्व बंधस्थानें संभवतात वैक्रियिक व वैक्रियिक मिश्र योगांत देवगतीप्रमाणें चार बंधस्थानें संभवतात २५, २६, २९, ३०.

**गाथा ५४६**–आहारकद्विकयोगांत बंधस्थानें खालीलप्रमाणें संभवतात.

**२८ चा पहिला प्रकार, २९ चा सहावा प्रकार.**

कार्मण व औदारिकमिश्रयोगांत आदिचीं सहा ही बंधस्थानें संभवतात. म्हणजे २३–२५–२६–२८–२९–३० यथासंभव प्रकार. परंतु मिथ्यादृष्टि मनुष्य व तिर्यंच यांना हे दोन योग असतांना २८ चें बंधस्थान होत नाहीं कारण त्या अवस्थेंत देवद्विक व नरकद्विकाचा बंध होत नाहीं.

सासादन गुणस्थानांत मनुष्य अथवा तिर्यंच कार्मणयोगांत असेल त्यास २९ च्या चौथ्या व पांचव्या प्रकारचें व ३०च्या चौथ्या प्रकारचें बंधस्थान संभवतें.

असंयत गुणस्थानांत कार्मणयोग सहित तिर्यंच असेल त्यास २८ च्या पहिल्या प्रकारांतील बंधस्थान होतें आणि याच गुणस्थानांत कार्मणयोग सहित मनुष्य असेल तर त्यास २८ चें पहिलें व २९ चें सहावें बंधस्थान संभवतें.

## वेदमार्गणेंत बंधस्थानें.

तिन्ही वेदांत सर्व बंधस्थानें संभवतात. विशेष हा आहे कीं, पहिल्या तीन नरकांत नपुंसकवेद असतो त्या ठिकाणीं दोन बंधस्थानें असतात म्हणजे २९ चा चौथा, पांचवा प्रकार व ३० चा चौथा पांचवा प्रकार यांचें बंधस्थान संभवतें.

नपुंसकवेदसहित तिर्यंचगतींत २३–२५–२६–२९ चे पहिले पांच प्रकार व ३० चे पहिले चार प्रकार संभवतात. परंतु पंचेंद्रिय तिर्यंच नपुंसकवेदी असेल त्यास २८ चें स्थान हीं संभवतें.

तिर्यंचस्त्रीवेदींत व पुरुषवेदींत हीं ६ स्थानें संभवतात.

लब्ध्यपर्याप्त मनुष्य नपुंसक वेदीला एकेंद्रिय, विकलत्रयाप्रमाणें ५ बंधस्थानें संभवतात [ गाथा ५४५ पहा ]

पर्याप्त मनुष्य द्रव्यापेक्षेनें नपुंसक किंवा स्त्री किंवा पुरुष वेदवाले असतील ते पुरुषवेद, स्त्रीवेद व नपुंसकवेद या कर्माच्या उदयानें भाव पुरुष, भाव स्त्री व भाव नपुंसक होतात. पण तीर्थंकराना हा नियम लागू नाहीं.

या तिन्ही वेदांचा उदय ९ व्या गुणस्थानाच्या सवेद भागापर्यंत असतो म्हणून सर्व बंधस्थानें संभवतात ( नवव्या गुणस्थानापर्यंत वेदाच्या अपेक्षेनें ) परंतु जो मनुष्य

क्षपकश्रेणींत नपुंसक किंवा स्त्रीवेदासहित असेल त्यास २९ चा सहावा प्रकार, व ३१ या स्थानाचा बंध होणार नाहीं. कारण हीं दोन्ही स्थानें तीर्थंकरबंधासहित आहेत. जे पुरुष क्षपकश्रेणींत पुरुषवेदासह चढतात त्यानांच तीर्थंकर प्रकृतीचा बंध होतो.

चरमशरीरी पुरुष चौथ्या व पांचव्या गुणस्थानांत तीर्थंकरप्रकृतीचा बंध सुरू करील त्याचीं तप, ज्ञान, व निर्वाण हीं तीन कल्याणिकें होतील. आणि सहाव्या व सातव्या गुणस्थानांत तीर्थंकर प्रकृतीस सुरवात करील तर ज्ञान व निर्वाण हीं दोनच कल्याणिकें होतील. पूर्वभवांत ज्याच्या तीर्थंकर प्रकृतीचा आरंभ झाला असेल त्याचीं ५ हीं कल्याणिकें होतील.

## कषायमार्गणेंत बंधस्थानें.

क्रोधादि चार कषायांत ८ ही बंधस्थानें संभवतात.

| | |
|---|---|
| नरकांत २९ व ३० प्रकृतींचें बंधस्थान असतें.<br>तिर्यंचगतींत आरंभींचीं ६ बंधस्थानें संभवतात.<br>मनुष्यगतींत ८ ही बंधस्थानें संभवतात.<br>देवगतींत ४ बंधस्थानें संभवतात. | गतिमार्गणेंतील बंधस्थानें पहा. |

## ज्ञानमार्गणेंत बंधस्थानें.

कुमति, कुश्रुत, कुअवधि या तीन ज्ञानांत आदिचीं ६ बंधस्थानें संभवतात.

नारकींचीं बंधस्थानें २ ( २९ व ३० प्रकृतींचीं )

एकेंद्रियापासून चतुरिंद्रिय व पंचेंद्रियतिर्यंच, मनुष्य अपर्याप्त यांस कुमति, कुश्रुत हीं दोन ज्ञानें असतात. यांचीं बंधस्थानें ५ ( २३,२५,२६–२९,३० )

पर्याप्तपंचेंद्रिय तिर्यंच व मनुष्य यांस तीन कुज्ञानासहित १ व २ गुणस्थानें असतील. बंधस्थानें २३ ते ३० प्रकृतींचीं यथायोग्य संभवतील.

भवनत्रिक व सौधर्म ईशान यांत ५ बंधस्थानें संभवतात. तिर्यंचगतिसहित यथायोग्य २५,२६,२९,३० व मनुष्यगतियुत २९ हीं बंधस्थानें संभवतात.

तिसऱ्या स्वर्गापासून बाराव्या स्वर्गापर्यंत २ बंधस्थानें संज्ञी पंचेंद्रिय पर्याप्त तिर्यंच व मनुष्यगतिसहित २९ ( प्रकार ४-५ पहा ) व उद्योतसहित ३० ( प्रकार ४ पहा ) हीं बंधस्थानें संभवतात.

१३ व्या स्वर्गापासून नवग्रैवेयकापर्यंत २९चा पांचवा प्रकार हें बंधस्थान होतें. याप्रमाणें तीन कुज्ञानांचीं बंधस्थानें जाणावीं.

**गाथा ५४७**—मति, श्रुत, अवधि, मनःपर्यय या चार सम्यग्ज्ञानांत ५ बंधस्थानें संभवतात २८,२९,३०,३१,१

मति, श्रुत, अवधि, हीं तीन ज्ञानें पर्याप्त,अपर्याप्त, नारक, संज्ञी तिर्यंच व मनुष्य आणि देव यांना असूं शकतात. या अवस्थेंत नारकी जीवास २९ चा पांचवा प्रकार व ३० चा पांचवा प्रकार ही बंधस्थानें संभवतात.

सौधर्मादि सर्वदेवांत हींच दोन बंधस्थानें असतात.

भवनत्रिकांत २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान असतें.

तिर्यंचांत २८ चा पहिला प्रकार हें ,, ,,

मनुष्यगतींत २८ चा पहिला व २९ चा सहावा प्रकार हें बंधस्थान असतें.

मन:पर्ययज्ञानासहित चार ज्ञानें असणाऱ्या मुनीला प्रमत्त गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार व २९ चा सहावा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात. आणि सातव्या व आठव्याच्या ६ व्या भागापर्यंतच्या गुणस्थानांत चार बंधस्थानें संभवतात. (२८ चा प्रकार पहिला, २९ चा प्रकार ६ वा, ३० चा प्रकार ६ वा व ३१ ) आणि आठव्या गुणस्थानाच्या सातव्या भागापासून १० व्या गुणस्थानापर्यंत ८ वें ( १ यश:प्रकृतींचें ) बंधस्थान असतें. केवलज्ञानांत नामकर्माचा बंध नसतो.

## संयममार्गणेंत बंधस्थानें.

सामायिक, छेदोपस्थापना, परिहारविशुद्धि या तीन संयमांत श्रुतज्ञानवत् शेवटचीं ५ बंधस्थानें संभवतात परंतु परिहारविशुद्धि संयमांत अंतिम ८वें बंधस्थान नसतें.

६ ते ९ गुणस्थानांपर्यंत मन:पर्ययासहित चार ज्ञानाप्रमाणें बंधस्थानें ५ संभवतात.

समभावांत परिणमन होणें तें सामायिक–भगवान महावीर तीर्थकराच्यापूर्वी उत्तम संहननधारी जिनकल्पी मुनींचें सामायिकरूप एकच प्रकारचें चारित्र असे. पंचमकालांत स्थविरकल्पी हीनसंहननधारी मुनींना तेरा प्रकारचें चारित्र सांगितलें आहे.

**गाथा** ५४८–सूक्ष्मसांपराय संयमांत शेवटचें एकच बंधस्थान असतें. यथाख्यात संयमांत नामकर्माचा बंध होत नाहीं. देशसंयमांत मनुष्याला २८ चा पहिला प्रकार व २९ चा सहावा प्रकार हीं दोन बंधस्थानें व तिर्यंचाला २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान असतें. असंयमांत आदिचीं ६ बंधस्थानें संभवतात.

नारकी मिथ्यादृष्टि व सासादन गुणस्थानांत २९ चा चौथा व पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें असतात परंतु मिश्रगुणस्थानांत २९चा पांचवा प्रकार हें बंधस्थान असतें. चौथ्या गुणस्थानांत पहिल्या तीन नरकांत २९चा पांचवा प्रकार व ३०चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात. बाकीच्या चार नरकांत २९चा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवतें.

तिर्यंचगतींत पहिलीं ६ बंधस्थानें संभवतात.

विशेष—पर्याप्त, अपर्याप्त, एकेंद्रिय, विकलत्रय व अपर्याप्तपंचेंद्रिय यांत २८ प्रकृतींचें बंधस्थान होत नाहीं.

बादर, सूक्ष्म, पर्याप्त, अपर्याप्त, वायुकाय व अग्निकाय जीवांत २५ प्रकृतींच्या सहाव्या प्रकारचें व २९ प्रकृतींच्या पांचव्या प्रकारचें बंधस्थान होत नाहीं.

प्रथमोपशम सम्यक्त्वाची किंवा देशव्रती सम्यक्त्वाची विराधना करून सासादन गुणस्थानांत आलेला तिर्यंच तीन बंधस्थानें पावेल. २९चा चौथा, पांचवा प्रकार, ३०तीसांचा चौथा प्रकार व २८चा पहिला प्रकार हीं तीन बंधस्थानें त्या तिर्यंचांची होतील.

एकेंद्रिय, विकलत्रय, संज्ञी, असंज्ञी, तिर्यंच, सासादन गुणस्थानांत अपर्याप्तावस्थेंत असेपर्यंत २८चें बंधस्थान बांधणार नाहीं. तो मिथ्यात्वगुणस्थानांत येऊन पर्याप्तावस्था पावेल तेव्हां २८ चें बंधस्थान बांधील.

तिसऱ्या चौथ्या गुणस्थानांतील संज्ञी, पंचेंद्रिय पर्याप्त जीव २८ प्रकृतींच्या पहिल्या प्रकारचें बंधस्थान बांधील.

असंयमी लब्ध्यपर्याप्तक मनुष्याला २३, २५, २६, २९, ३० हीं पांच बंधस्थानें संभवतात. .

असंयमी पर्याप्त मनुष्यास पहिलीं सहा बंधस्थानें संभवतात. प्रथमोपशम सम्यक्त्वी किंवा प्रथमोपशम सम्यक्त्वासहित देशव्रती किंवा महाव्रती सासादन गुणस्थानांत आल्यास, २९ प्रकृतींचा चौथा, पांचवा प्रकार व तीसचा चौथा प्रकार व २८चा पहिला प्रकार हीं बंधस्थानें त्यास संभवतात.

सासादन गुणस्थानांत मरून तिर्यंच, मनुष्य किंवा देव झाल्यास जोपर्यंत सासादनांत अपर्याप्त अवस्था राहील तोंपर्यंत २९व३०चीं बंधस्थानें तो बांधील. सासादनाचा काल पूर्ण होऊन मिथ्यात्व गुणस्थानांत निर्वृत्यपर्याप्त अवस्था असे पर्यंत त्यास २८ प्रकृतींचें बंधस्थान सोडून २५, २६, २९, ३० प्रकृतींचीं बंधस्थानें संभवतात. पर्याप्त अवस्था प्राप्त झाल्यास २३, २५, २६, २८, २९, ३० हीं सहा बंधस्थानें त्यांस संभवतात.

कर्मभूमींतील किंवा भोगभूमींतील मनुष्य ३ ऱ्या, ४ थ्या, गुणस्थानांत २८ च्या पहिल्या प्रकारच्या बंधस्थानासच बांधील.

जो तीर्थंकरजीव विग्रहगतींत किंवा निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत किंवा गर्भांत किंवा जन्मांत किंवा कुमारावस्थेंत असेल त्यास चौथ्या गुणस्थानांत २९ प्रकृतींच्या सहाव्या प्रकारचें बंधस्थान असूं शकतें. तसेंच देवायूचा किंवा नरकायूचा ज्यानें पूर्वी बंध केला असेल व नंतर तीर्थंकर प्रकृतीच्या बंधांस आरंभ केला असेल, किंवा तीर्थंकर प्रकृतीची सत्ता ठेवणारा चरम शरीरी मनुष्य, चौथ्या गुणस्थानांत २९ प्रकृतींच्या सहाव्या प्रकारचें बंधस्थान बांधील.

भवनत्रिक व सौधर्म ईशान स्वर्गांतील देव जर मिथ्यादृष्टि पर्याप्त, असंयमी असतील तर त्यांना २५ प्रकृतींचा पहिला प्रकार व २६ प्रकृतींचे दोन्हीं प्रकार व २९चा चौथा पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं चार बंधस्थानें संभवतील.

तिसऱ्यापासून बाराव्या स्वर्गापर्यंतचे देव मिथ्यादृष्टि पर्याप्त असंयमी असतील तर त्यांस २९ चा चौथा पांचवा प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं दोन बंधस्थानें असूं शकतील.

तेराव्या स्वर्गापासून सोळाव्या स्वर्गापर्यंत देव व नवग्रैवेयकांतील अहमिंद्र मिथ्यादृष्टि पर्याप्त असंयमी असतील तर त्यांस २९ प्रकृतींचा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवेल.

## कोणते व कसले मिथ्यादृष्टि कशा प्रकारचे देव होतात ?

१ भोगभूमींतील मिथ्यादृष्टि व तापसी ज्यास्तींत ज्यास्त भवनत्रिकांत जन्मतात.

२ भरत, ऐरावत, विदेह यांतील मनुष्य व तिर्यंच व स्वयंभूरमण अर्धद्वीप व स्वयंभूरमणसमुद्र व लवणोदधि कालोदधि समुद्र यांतील जलचर, स्थलचर, व नभश्चर संज्ञी तिर्यंच पर्याप्त भद्र मिथ्यादृष्टि व उपशमी ( शांत परिणामी ) ब्रह्मचर्य धारक, वानप्रस्थाश्रमी व एकजटी, शतजटी, सहस्रजटी, नग्न, कांजीभक्षक, कंदमूल पत्रपुष्पफलभक्षक, अकामनिर्जरा करणारे, एकदंडी, त्रिदंडी, व बालतप करणारे हे सर्व आप आपल्या विशुद्धतेप्रमाणें भवनत्रिकापासून अच्युतस्वर्गापर्यंत जन्मतात.

३ द्रव्यलिंगी जैनमुनि ( मिथ्यादृष्टि ) नवग्रैवेयकापर्यंत जन्मतात.

## निर्वृत्त्यपर्याप्त देवांचीं बंधस्थानें.

निर्वृत्यपर्याप्त मिथ्यादृष्टि भवनत्रिक देव, कल्पवासिनी स्त्री, सौधर्म, ईशान स्वर्गांतील देव यांना २५ प्रकृतींचा पहिला प्रकार, २६ प्रकृतींचे दोन्ही प्रकार, २९ चा चौथा पांचवा प्रकार व ३० चा चौथा प्रकार अशीं चार बंधस्थानें संभवतील.

तिसऱ्या स्वर्गापासून बाराव्या स्वर्गापर्यंतचे निर्वृत्त्यपर्याप्त मिथ्यादृष्टि देव यांना २९ चा चौथा, पांचवा प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात.

तेराव्या स्वर्गापासून नवग्रैवेयकापर्यंतचे वरील प्रकारच्या देवांना २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवतें.

प्रथमोपशम व द्वितीयोपशम सम्यक्त्वधारी तिर्यंच किंवा मनुष्य आपल्या पर्यायांतील एक समय जघन्य किंवा सहा आवली उत्कृष्ट काल शिल्लक असतांना अनंतानुबंधी कोणत्या एखाद्या कषायाच्या उदयानें सासादन गुणस्थानांत येतो. त्यानें पूर्वी देवायूचा बंध केला असेल किंवा अंतसमयीं देवायूचा बंध करून मरण पावेल तर तो देव होईल; त्यावेळीं निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत सासादन गुणस्थान राहील. या अवस्थेंत भवनत्रिक देव, कल्पवासिनी स्त्री, किंवा सौधर्मद्विकांतील देव २९ चा चौथा, पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं दोन बंधस्थानें बांधील.

निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंतील दुसऱ्या गुणस्थानाचा काल संपून मिथ्यात्व गुणस्थानांत तो जीव येईल व शरीरपर्याप्ति अजून पूर्ण झाली नाहीं. ती पूर्ण होईपर्यंत त्यांस २५ चा पहिला प्रकार, २६चे दोन्ही प्रकार, २९चा चौथा पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं चार बंधस्थानें संभवतात.

याच अवस्थेंतील तिसऱ्या स्वर्गापासून बाराव्या स्वर्गापर्यंतचे देवांना २९चा चौथा पांचवा प्रकार व ३०तीसचा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात; व तेराव्या स्वर्गापासून नवग्रैवेयकापर्यंतच्या देवांना वरील अवस्थेंत २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान असतें.

भवनत्रिकापासून नवग्रैवेयकापर्यंतचे तृतीयगुणस्थानवर्ती देव व चौथ्या गुणस्थानांतील पर्याप्त भवनत्रिक देव व कल्पवासिनी स्त्री यांना २९प्रकृतीच्या पांचव्या प्रकारचें बंधस्थान होतें.

चौथ्या गुणस्थानांतील सर्व वैमानिक ( पहिल्या स्वर्गापासून सर्वार्थसिद्धिपर्यंतचे ) देवांना २९ प्रकृतींच्या पांचव्या प्रकारचें व ३० प्रकृतींच्या पांचव्या प्रकारचें बंधस्थान संभवतें.

## दर्शनमार्गणेंतील बंधस्थानें.

चक्षु अचक्षुर्दर्शनांत आठही बंधस्थानें संभवतात.

चक्षुर्दर्शनासहित नारकी जीवाला दोन बंधस्थानें असतात. [ म्हणजे २९ चा चौथा, पांचवा प्रकार व ३०चा ही चौथा पांचवा प्रकार ]

चक्षुर्दर्शनासहित चतुरिंद्रिय जीवाचीं बंधस्थानें पांच, २३, २५, २६, २९, ३०.

चक्षुर्दर्शनासहित पंचेंद्रिय तिर्यंचाचीं बंधस्थानें सहा, २३, २५, २६, २८, २९, ३०

,, ,, मनुष्याला आठही बंधस्थानें संभवतात.

,, ,, देवाचीं बंधस्थानें चार, २५, २६, २९, ३०.

## अचक्षुर्दर्शनवाल्याचीं बंधस्थानें.

नारकीचीं बंधस्थानें दोन, २९, ३०.

एकेंद्रियापासून चतुरिंद्रियापर्यंत बंधस्थानें पांच, २३, २५, २६, २९, ३०. पंचेंद्रियतिर्यंचाचीं बंधस्थानें सहा २३, २५, २६, २८, २९, ३०. मनुष्याची बंधस्थानें आठही. देवांचीं बंधस्थानें चार, २५, २६, २९, ३०.

## अवधिदर्शनधारकाचीं बंधस्थानें.

अवधिदर्शनांत अवधिज्ञानाप्रमाणें अंतिम पांच बंधस्थानें असतात म्हणजे, २८, २९, ३०, ३१, १.

**नोटः—**चतुर्थगुणस्थानवर्ती देव नारकीयांना व चतुर्थ पंचम गुणस्थानधारी संज्ञीपर्याप्त तिर्यंचांना व चौथ्यापासून बाराव्या गुणस्थानापर्यंतच्या मनुष्यांना, देशावधिज्ञान असतें. सहाव्या गुणस्थानापासून बाराव्या गुणस्थानापर्यंतच्या चरमशरीरी साधूंना परमावधि व सर्वावधि ज्ञान असूं शकतें. अवधिज्ञान असेल त्यासच अवधिदर्शन होतें.

तिसऱ्या नरकापर्यंतच्या नारकी जीवास ३० चा पांचवा प्रकार व २९ चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें असूं शकतील.

चौथ्यापासून सातव्या नरकापर्यंत २९ चा पांचवा प्रकार हें एकच बंधस्थान असतें.

तिर्यंचास २८ चा पहिला प्रकार हें एकच बंधस्थान असतें. मनुष्याला अंतिम पांच बंधस्थानें असूं शकतात. ( २८, २९, ३०, ३१, १ ) देवांना ३० चा पांचवा प्रकार व २९ चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें असतात. केवलदर्शनांत बंधस्थान नसतें.

## लेश्यामार्गणा.

**गाथा ५४९—**कृष्ण, नील, कापोत या लेश्यांत आदीचीं सहा बंधस्थानें.

तेजो ( पीत ) लेश्येंत सहा बंधस्थानें २५, २६, २८, २९, ३०, ३१.

पद्मलेश्येंत चार बंधस्थानें २८, २९, ३०, ३१.

शुक्ललेश्येंत अंतिम पांच बंधस्थानें, २८, २९, ३०, ३१, १.

**द्रव्यलेश्याः—**वर्णनामा नामकर्माच्या उदयानें शरीराचा जो वर्ण होतो त्यास द्रव्यलेश्या म्हणतात. या मार्गणेंत द्रव्यलेश्येचें वर्णन केलें नाहीं.

**भावलेश्याः**—मोहनीय कर्माच्या उदयानें, उपशमानें, क्षयानें किंवा क्षयोपशमानें जीवाची जी चंचलता होते तीस भावलेश्या म्हणतात.

## नरकांतील भावलेश्या.

पहिल्या नरकाच्या पहिल्या इंद्रकबिळांत कापोतलेश्येचा जघन्य अंश असतो.

तिसऱ्या नरकाच्या द्विचरम इंद्रक बिळांत कापोत लेश्येचा उत्कृष्ट अंश असतो.

तिसऱ्या नरकाच्या अंतिम इंद्रक बिळांत नीललेश्येचा जघन्य अंश असतो.

पांचव्या नरकाच्या द्विचरम इंद्रक बिळांत नील लेश्येचा उत्कृष्ट अंश असतो.

पांचव्या नरकाच्या अन्तिम इंद्रक बिळांत कृष्ण लेश्येचा जघन्य अंश असतो. सातव्या नरकाच्या अवधिस्थाननामक इंद्रक बिलांत कृष्णलेश्येचा उत्कृष्ट अंश असतो.

जघन्य आणि उत्कृष्ट या दोन स्थानांमधील लेश्या मध्यम अंशाची समजावी.

## कोणते जीव नरकांत जातात.

पहिल्या नरकांत—मिथ्यादृष्टि, कर्मभूमिज, सहाही संहनन धारक, १ असंज्ञी पंचेंद्रिय, २ सरीसृप ( म्हणजे सापसुरळी असावी ) ३ पक्षी ४ सर्प, ५ सिंह, ६ स्त्री, ७ मासा व ८ मनुष्य जातात.

दुसऱ्या नरकांत—असंज्ञी पंचेंद्रिय सोडून बाकीचे वरील सर्व जीव जातात.

तिसऱ्या नरकांत—असंज्ञी पंचेंद्रिय व सरीसृप सोडून बाकीचे वरील सर्व जीव जातात.

चौथ्या नरकांत—असंप्राप्तासृपाटिका संहनन सोडून बाकीचे, पांचसंहनन धारी सर्पापासून मनुष्यापर्यंतचे, जीव जातात.

पांचव्या नरकांत—सिंहापासून मनुष्यापर्यंतचे जीव जातात.

सहाव्या नरकांत—प्रथमचीं चार संहननें धारण करणारे स्त्री, मासा व मनुष्य जातात.

सातव्या नरकांत—वज्रवृषभ नाराच संहननधारी मासा व मनुष्य जातात.

## नारकी जीवांचीं बंधस्थानें.

पर्याप्त व अपर्याप्त नारकी जीवास मिथ्यात्व गुणस्थानांत २९ प्रकृतींचा चौथा, पांचवा प्रकार व ३० प्रकृतींचा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात. परंतु सातव्या नरकांत मिथ्यात्व गुणस्थानामध्यें २९ चा चौथा व ३०चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

सासादन गुणस्थानांत २९ चा चौथा पांचवा व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

तिसऱ्या व चौथ्या गुणस्थानांत २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवतें.

पहिल्या नरकांत चौथ्या गुणस्थानांतील निर्वृत्त्यपर्याप्त किंवा पर्याप्त, क्षायिक, वेदक, कृतकृत्य–वेदक, सम्यग्दृष्टि, ( ज्यांत तीर्थंकरप्रकृतीची सत्ता नाहीं. ) यांस २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान असतें; आणि त्या जीवांत तीर्थंकर प्रकृतीची सत्ता असेल, तर ३०चा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवतें.

तीर्थंकरप्रकृतीची सत्ता ज्यांत आहे असा जीव मिथ्यात्वगुणस्थानांत मरण पावेल तर तो २ ऱ्या किंवा ३ ऱ्या नरकांत जाईल; आणि तिथें पर्याप्ति पूर्ण झाल्यावर नियमानें तो सम्यग्दृष्टि होईल व त्यांत ३० प्रकृतींचा पांचवा प्रकार हें बंधस्थान प्राप्त होईल.

## तिर्यंचगतींतील लेश्या.

पर्याप्त, निर्वृत्त्यपर्याप्त व लब्ध्यपर्याप्त असे सर्व एकेंद्रिय, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, व लब्ध्यपर्याप्त व निर्वृत्त्यपर्याप्त असंज्ञी असे पंचेंद्रिय व नरकादिकांतून आलेला ( अपर्याप्त ) संज्ञी मिथ्यादृष्टि, किंवा सासादनांतील अपर्याप्त संज्ञी, या सर्वांत तीन अशुभ लेश्या असतात.

पर्याप्तमिथ्यादृष्टि असंज्ञींत कृष्ण, नील, कापोत व पीत या चार लेश्या असतात.

मिथ्यात्व, सासादन व मिश्र या तीन गुणस्थानांतील पर्याप्त संज्ञी तिर्यंच व चतुर्थ गुणस्थानांतील अपर्याप्त व पर्याप्त संज्ञी तिर्यंच या सर्वांना सहा लेश्या संभवतात.

भोगभूमींत निर्वृत्त्यपर्याप्तक असंयत तिर्यंचांत जघन्य कापोत लेश्याच असते.

भोगभूमींत पर्याप्तावस्थेमध्यें मिथ्यादृष्टि वा सम्यग्दृष्टि यांस पीतादि तीन शुभ लेश्याच संभवतात.

## तिर्यंचगतींत लेश्यांच्या अपक्षेनें बंधस्थानें.

१९ प्रकारचे तिर्यंच [ सूक्ष्म १ पृथ्वी, २ जल, ३ अग्नि, ४ वायु, ५ नित्यनिगोद ६ चतुर्गति म्हणजे इतर निगोद व बादर पृथ्व्यादि ६, १३ सप्रतिष्ठित प्रत्येक १४ अप्रतिष्ठित प्रत्येक, १५ द्वींद्रिय, १६ त्रींद्रिय, १७ चतुरिंद्रिय, १८ असंज्ञीपंचेंद्रिय, १९ संज्ञीपंचेंद्रिय ] लब्ध्यपर्याप्तक यांचीं बंधस्थानें ५ असतात. तीं २३, २५, २६. २९, ३०.

वरील १९ प्रकारच्या तिर्यंचांतून आलेल्या किंवा पर्याप्ततिर्यंचांतून वा पर्याप्त अपर्याप्त कर्मभूमींतील मनुष्यांतून आलेल्या ( हे सर्व मिथ्यात्व अवस्थेंतून आलेले असतात)

जीवांतून जे कोणी तीन अशुभ लेश्यांसह तिर्यंच उत्पन्न होतील त्यांनाही वरील पांच बंधस्थानें संभवतात; परंतु अग्निकाय व वायुकाय जीव तिर्यंचगतिसहित त्या पांच स्थानांस बांधतील.

१९ प्रकारचे वर लिहिलेले लब्ध्यपर्याप्तक तिर्यंच व याच १९ प्रकारचे पर्याप्त तिर्यंच व पर्याप्त, अपर्याप्त मनुष्य असे ४० प्रकारचे मिथ्यादृष्टि अशुभ तीन लेश्यासह मरण पावल्यास पूर्वोक्त १९ प्रकारच्या पर्याप्त तिर्यंचमिथ्यादृष्टींत उत्पन्न होतील.

अग्निकाय व वायुकाय यांत जे उत्पन्न होतील ते तीन अशुभ लेश्यांच्या मध्यमांशासह उत्पन्न होतील.

भवनत्रिक–देव, सौधर्मद्विकांतील देव[ दोन्ही मिथ्यादृष्टि ] पीतलेश्येच्या मध्यमांशांत मेलेले व तिर्यंच, अशुभ तीन लेश्यांच्या मध्यमांशांत मेलेले मनुष्य ह्या सर्वांपैकीं कोणी बादर पृथ्वीकाय व अप्रतिष्ठित प्रत्येक यांत उत्पन्न होतील.

भवनत्रिकांपासून बाराव्या स्वर्गापर्यंतचे देव व सर्व नारकी मिथ्यादृष्टि यांनीं तिर्यंचायु बांधलें असेल तर ते आप आपल्या लेश्यांसह मरून कर्मभूमिज गर्भज संज्ञी तिर्यंच उत्पन्न होतील.

चारही गतींतील आलेले पूर्वोक्त १९ प्रकारचे तिर्यंच निर्वृत्त्यपर्याप्त मिथ्यादृष्टि यांस ५ बंधस्थानें संभवतात. तीं–२३, २५, २६, २९, ३०.

तिर्यंचायूचा बंध झालेले कर्मभूमींतील तिर्यंच व मनुष्य सासादन गुणस्थानांत मरून बादर, पृथ्वी, जल, प्रत्येक वनस्पति, विकलत्रय, असंज्ञी संज्ञी पंचेंद्रियांत उत्पन्न होतील. तसेंच ईशान स्वर्गापर्यंतचे देव आप आपल्या लेश्यांसह मरून बादर, पृथ्वी, जल व प्रत्येक वनस्पतींत उत्पन्न होतील. तसेंच भवनत्रिकादि सहस्रारपर्यंतचे देव व ६ व्या नरकांपर्यंतचे नारकी हे मरून कर्मभूमिज, गर्भज संज्ञी तिर्यंचांत उत्पन्न होतात.

हे सर्व तिर्यंच सासादन गुणस्थानांत उत्पन्न होऊन त्यांस २९ प्रकृतीचा चौथा व पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात; परंतु सासादनचा काल संपल्यावर मिथ्यादृष्टि होऊन निर्वृत्त्यपर्याप्त अवस्थेंत ५ बंधस्थानें त्यांस संभवतात. तीं, २३, २५, २६, २९, ३०.

तिर्यंच-आयु बांधलेले देव, नारकी वेदक सम्यग्दृष्टि आपआपल्या लेश्यासह मरून ४थ्या गुणस्थानांत तिर्यंच उत्पन्न होतात. [ परंतु सातव्या नरकांतील नारकी जीवाचें मरण मिथ्यात्वगुणस्थानांतच होतें. ] हे तिर्यंच निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत २८प्रकृतींचा पहिला प्रकार हें बंधस्थान बांधतात. पर्याप्ति पूर्ण झाल्यानंतर हे जीव पांचव्या गुणस्थानापर्यंत जाऊं शकतात. या तिर्यंचांना चौथ्यागुणस्थानापर्यंत सहाही लेश्या व पांचव्या गुणस्थानांत तीन शुभलेश्याच असतात.

## लेश्यांत आयुर्बंध कसा होतो.

कषायांच्या अनुभागानें रंजित अशा योगप्रवृत्तीला लेश्या म्हणतात.

कषायांच्या अनुभागांचीं उदयस्थानें असंख्यात लोकप्रमाण आहेत. ( असंख्यात × असंख्यात इतकीं ), यांना यथायोग्य असंख्यात लोकानें भागल्यास भागाकार जो येईल तो भाग विशुद्धिस्थानाचा ( शुभलेश्यांचा ) समजावा व भाज्यांतून आलेला भागाकार [म्हणजे फल] वजा करून जी बाकी राहील ती संक्लेशस्थान ( अशुभलेश्यांच्या परिणामांची संख्या ) समजावी.

क्रोधाच्या अपेक्षेनें अनुभाग शक्तीचे चार भेद होतात. १ शिलाभेद, २ पृथ्वी भेद ३ धूलिरेखा, ४ जलरेखा या समान, या शक्तींत लेश्यांचीं स्थानें चौदा होतात. या लेश्यास्थानांत आयुर्बंधांचीं व अबंधांचीं वीस स्थानें होतात. [ याचें कोष्टक जीवकांड गाथा २९५ कषायमार्गणा पृष्ठ ६३९ वर आहे. ]

लेश्यांचे अंश २६ होतात. त्यांतलि मध्यम ८ अंश आयुर्बंधांचीं कारणें होतात. व बाकीच्या १८ अंशांत मरण येतें. हे १८ अंश कृष्णादि ६ लेश्यांच्या जघन्य, मध्यम, उत्कृष्ट भेदांमुळें होतात. या १८ अंशापैकीं ९ अंश तीन अशुभलेश्यांचे आहेत. या ९ अशांत जे मरतात, ते नरक किंवा तिर्यंचगतींत जन्मतात. बाकीच्या शुभ-अशुभलेश्यांचे ९ अंश आहेत; त्यांत मरण पावणारे जीव तिर्यंच, मनुष्य व देवगतींत जन्मतात. [ लेश्यांच्या संक्रमणाचें वर्णन जीवकांडांत आहे तें पहा. ]

मिथ्यात्वगुणस्थानांत तिर्यंचांना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात.

सासादन गुणस्थानांत २८–२९–३० हीं तीन बंधस्थानें संभवतात.

मिश्र, असंयत व देशसंयत या तीन गुणस्थानांत २८चें एकच बंधस्थान असतें.

मिथ्यादृष्टि मनुष्य किंवा तिर्यंच यांनीं तीन प्रकारच्या पात्रांत [ उत्तम, मध्यम, जघन्य ] दान दिलें असेल किंवा दान देण्याची अनुमोदना केली असेल व त्यांनीं तिर्यंचायु बांधलें असेल तर ते जीव तीन अशुभलेश्यासह मरून भोगभूमींत मिथ्यादृष्टि तिर्यंच उत्पन्न होतील. अशा जीवाला निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत २९चा ४–५ प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

दान देणारा मनुष्य किंवा तिर्यंच सासादन गुणस्थानांत मरून भोगभूमींत तिर्यंच उत्पन्न झाला त्यावेळीं तो सासादन गुणस्थानांत राहील. त्यांस २९ चा ४–५ प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

नरकादिकांतून सासादन गुणस्थानांत मरून कर्मभूमींत ३ अशुभलेश्यासहित तिर्यंच उत्पन्न झाला तर, त्यांसही २ ऱ्या गुणस्थानांत २९ चे ४ व ५ प्रकार व ३० चा ४ था प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

कर्मभूमींतील तिर्यंच अथवा मनुष्य ( ज्यांस तिर्यंचायूचा पूर्वीं बंध झाला आहे. ) वेदकसम्यग्दृष्टि, कृतकृत्य वेदकसम्यग्दृष्टि किंवा क्षायिकसम्यग्दृष्टि असतांना मरेल व भोगभूमींत कापोतलेश्येच्या जघन्य अंशासह तिर्यंच उत्पन्न होईल, त्यांस निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान होईल.

भोगभूमींतील जीवांस पर्याप्तावस्थेंत पहिल्या चारही गुणस्थानांत तीन शुभ-लेश्याच असतात.

भोगभूमींतील पर्याप्त तिर्यंचास पहिल्या व दुसऱ्या गुणस्थानांत २८ चा पहिला व २९चा ४–५वा व ३०चा ४था प्रकार हीं तीन बंधस्थानें संभवतात. परंतु तेच तिसऱ्या, चवथ्या गुणस्थानांत असल्यास त्यांना २८ चा पहिला प्रकार हें एकच बंधस्थान असतें. याप्रमाणें तिर्यंचाचीं बंधस्थानें सांगितलीं आहेत.

## लेश्यांच्या अपेक्षेनें मनुष्यगतीचीं बंधस्थानें.

लब्ध्यपर्याप्त मनुष्यांत तीन अशुभलेश्याच असतात. निर्वृत्त्यपर्याप्त मनुष्यांत ६ ही लेश्या संभवतात.

अपर्याप्तावस्थेंत मिथ्यात्व गुणस्थानामध्यें २३, २५, २६, २९, ३०. हीं पांच बंधस्थानें संभवतात. सासादनांत २९ व ३० हीं दोन बंधस्थानें; असंयत गुणस्थानांत २८ चा पहिला २९ चा सहावा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात. पर्याप्तावस्थेंत मनुष्यांस सहाही लेश्या असतात.

पर्याप्तावस्थेंतील मनुष्यांस पहिल्या गुणस्थानांत तेवीसादि सहा बंधस्थानें, सासादनांत २८ चा पहिला प्रकार, २९ चा चौथा व पांचवा व ३० चा चौथा हीं तीन बंधस्थानें; मिश्रगुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान; चौथ्या गुणस्थानांत किंवा ३ अशुभ लेश्यासहित पांचव्या व सहाव्या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार व २९ चा सहावा प्रकार हीं बंधस्थानें, सातव्या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार, २९ चा सहावा प्रकार व ३० चा सहावा प्रकार व ३१ अशीं चार बंधस्थानें; आठव्या गुणस्थानांत ( शुक्ललेश्याच असते ) वरील चार बंधस्थानें संभवतात; परंतु आठव्याच्या अंतिम भागांत आठवें बंधस्थान ( यशःप्रकृतीचें ) होतें. नऊ व दहा गुणस्थानांतही आठवेंच बंधस्थान ( यशः प्रकृतीचें ) असतें.

भोगभूमींतील मनुष्यांस भोगभूमींतील तिर्यंचाप्रमाणें बंधस्थानें असतात.

## देवगतींत लेश्यांच्या अपेक्षेनें बंधस्थानें.

भवनात्रिक अपर्याप्त देवांत तीन अशुभ लेश्याच असतात व पर्याप्तावस्थेंत पीत लेश्येचा जघन्य अंश असतो.

पर्याप्त व अपर्याप्त वैमानिक देवांत खालीं लिहिल्याप्रमाणें लेश्या असतात.

१ सौधर्म ईशानाच्या प्रथम इंद्रक श्रेणीबद्ध प्रकीर्णक विमानांत पीतलेश्येचा जघन्य अंश.

२ सौधर्म ईशानाच्या दुसऱ्या इंद्रकापासून सनत्कुमार माहेंद्राच्या सहावें इंद्रकापर्यंत पीतलेश्येचा मध्यम अंश.

३ सनत्कुमार माहेंद्रचा ७ वा इंद्रक व श्रेणीबद्ध विमानांत पीतलेश्येचा उत्कृष्ट व पद्मलेश्येचा जघन्य अंश असतो.

४ ब्रह्म ब्रह्मेंद्राचें ४थें इंद्रक व लांतव, कापिष्ठचें २ इंद्रक व शुक्रमहाशुक्राचें एक इंद्रक यांत पद्मलेश्येचा मध्यमांश.

५ शतार सहस्राराच्या १ इंद्रकांत पद्मलेश्येचा उत्कृष्ट व शुक्ललेश्येचा जघन्य अंश असतो.

६ आनतादि ४ स्वर्गाच्या ६ इंद्रकांत व नवग्रैवेयकांत व नवअनुदिशांत व चार श्रेणीबद्ध अनुत्तरांत शुक्ललेश्येचा मध्यमांश;

७ सर्वार्थसिद्धि स्वर्गांत शुक्ललेश्येचा उत्कृष्ट अंश असतो.

कर्मभूमींतील मिथ्यादृष्टि मनुष्य व संज्ञी गर्भज तिर्यंच ( ज्यांना कृष्णादि चार लेश्या असतील ) हे भवनात्रिकांत उत्पन्न होतील.

पीत लेश्याधारक गर्भज असंज्ञी तिर्यंच हे भवनवासि व व्यंतर यांत उत्पन्न होतील. ज्योतिषांत उत्पन्न होणार नाहींत कारण असंज्ञीतिर्यंचांना देवायूचा बंध पल्याच्या असंख्यातव्या भागा इतका असतो. व ज्योतिष देवांची जघन्य आयुर्मर्यादा पल्याच्या अष्टमांशा इतकी असते.

मानुषोत्तर पर्वत व स्वयंप्रभाचल पर्वत यांच्यामधील असंख्यातद्वीपांत उत्पन्न होणारे, जघन्य भोगभूमींतील तिर्यंच व तीन प्रकारच्या भोगभूमींतील मनुष्य व शहाण्णव कुभोगभूमींतील जीव हे सर्व पीत लेश्याधारक मरून भवनात्रिकांत उत्पन्न होतात; परंतु सम्यग्दृष्टि तेथें उत्पन्न होत नाहींत.

देवायूचा ज्यांना बंध झाला आहे असे तिर्यंच व मनुष्य कृष्णादि चार लेश्यांसहित सासादनगुणस्थानांत मरून भवनत्रिकांत उत्पन्न होतात. तेव्हां सासादन गुणस्थानांत २९चा चौथा पांचवा व ३०चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें होतात. हेंच

निर्वृत्त्यपर्याप्त अवस्थेंत मिथ्यादृष्टि असतांना त्यांस २५चा पहिला प्रकार, २६चा पहिला प्रकार, २९चा चौथा पांचवा प्रकार व ३०चा चौथा प्रकार हीं चार बंधस्थानें संभवतात.

पहिल्या दुसऱ्या स्वर्गांत मिथ्यात्व गुणस्थानामध्यें निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत २५ चा पहिला प्रकार, २६ चा पहिला दुसरा प्रकार, २९ चा चौथा, पांचवा व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

पहिल्या दुसऱ्या स्वर्गांत सासादन गुणस्थानामध्यें निर्वृत्त्यपर्याप्त अवस्थेंत २९ चा चौथा पांचवा प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात. यानांच चौथ्या गुणस्थानांत असतांना २९चा पांचवा प्रकार व ३०चा पांचवा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात.

तिसऱ्या, चौथ्या स्वर्गांत निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत मिथ्यात्व व सासादनगुणस्थानांत २९ चा चौथा पांचवा व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात आणि तोच जीव चौथ्यागुणस्थानांत असेल तर २९ चा पांचवा व ३० चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

पांच ते बारा या स्वर्गांत निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत मिथ्यात्व व सासादनगुणस्थानांत २९ चा चौथा पांचवा व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात, व चौथ्या गुणस्थानांत २९ चा पांचवा व ३० चा पांचवा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात.

तेरा ते सोळा या चार स्वर्गांत व नवग्रैवेयकांत निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत पहिल्या दुसऱ्या गुणस्थानामध्यें २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान व चौथ्या गुणस्थानांत २९ चा पांचवा व ३० चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

नवअनुदिश व पांच अनुत्तरवासि देवास निर्वृत्त्यपर्याप्तावस्थेंत चौथ्या गुणस्थानांत २९ चा पांचवा व ३० चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

अनुत्तरविमानांतून आलेले जीव नारायण व प्रतिनारायण होत नाहींत.

सौधर्म इंद्राची पट्टदेवी ( शची ) व चार लोक पाल, व सौधर्मादि दक्षिणदिशेचे इंद्र ( सहा ) लौकांतिक देव व सर्वार्थसिद्धीचे देव हे सर्व मनुष्यभव धारण करून मोक्षास जातात ( हे सर्व एकभवधारी असतात. ]

मनुष्यगति, तिर्यंचगति व भवनत्रिक यांतून च्युत झालेले जीव त्रेसष्टशलाका पुरुषांत उत्पन्न होत नाहींत.

सारांश तीन अशुभलेश्यांत तेवीसादि ६ स्थानें असतात, पीतलेश्येंत पंचवीसादि ६ स्थानें, पद्मलेश्येंत २८ आदि ४ स्थानें व शुक्ललेश्येंत २८ आदि ५ स्थानें असतात.

**लेश्याधिकार समाप्त.**

## भव्यमार्गणापेक्षया बंधस्थानें.

**गाथा ५५०**—भव्यांना आठही बंधस्थानें संभवतात.

अभव्यांना मिथ्यात्वगुणस्थानांत होणारीं २३ आदि सहा बंधस्थानें संभवतात.

## सम्यक्त्व मार्गणेंतील बंधस्थानें.

उपशम व क्षायिक सम्यक्त्वांत २८,२९,३०,३१,१हीं पांच बंधस्थानें असतात.

वेदकसम्यक्त्वांत, २८, २९, ३०, ३१ हीं चार बंधस्थानें संभवतात.

**खालील अवस्थांत जीव मरत नाहींत. ( गाथा ५६० व ६१ पहा )**

१ दर्शनमोहनीयकर्माचें क्षपक करणारे; २ क्षपक श्रेणी धारण करणारे; ३ उपशम श्रेणी चढणारे, अपूर्वकरणांतील प्रथम भागांत असणारे; ४ प्रथमोपशम सम्यक्त्वधारी; ५ सातव्या नरकांतील २, ३, ४ या गुणस्थानांत असणारे प्रथमोपशमसम्यक्त्व चारही गतींत पर्याप्तावस्थेंमध्येंच होतें.

द्वितीयोपशमसम्यक्त्व पर्याप्त मनुष्य व निर्वृत्यपर्याप्त वैमानिक देव यांनाच होतें.

क्षायिकसम्यक्त्व पहिल्या नरकांतील नारकी, भोगभूमींतील तिर्यंच, व मनुष्य, व कर्मभूमींतील मनुष्य, व वैमानिक देव, या सर्वांना पर्याप्त व अपर्याप्तावस्थेंत असूं शकतें.

वेदकसम्यक्त्व चारही गतींत पर्याप्त व निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत असूं शकतें.

चारही गतींच्या आयुर्बंधात प्रथमोपशमसम्यक्त्व होऊं शकतें परंतु मनुष्य, तिर्यंच व नारक आयूंचा बंध झाला असेल तर त्यांस अणुव्रत किंवा महाव्रत होऊं शकणार नाहीं, आणि देवायूचा बंध झाला असल्यास त्यांस अणुव्रत, महाव्रत होऊं शकतें.

पहिल्या तीन नरकांत चवथ्या गुणस्थानामध्यें २९ चा ५ वा प्रकार व ३० चा ५ वा प्रकार हीं दोन बंधस्थानें होऊं शकतात.

प्रथमोपशम सम्यग्दृष्टि तिर्यंच ४ थ्या, ५ व्या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान बांधील.

प्रथमोपशम सम्यग्दृष्टि—मनुष्यांस ४ थ्या व ५ व्या व ६ व्या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार २९ चा सहावा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात. ( प्रथमोपशम सम्यक्त्वाच्या अवस्थेंतही तीर्थंकरप्रकृतीच्या बंधाचा आरंभ होऊं शकतो. )

प्रथमोपशम सम्यक्दृष्टि मनुष्यांस ७ व्या गुणस्थानांत २८ चा पहिला, २९ चा सहावा ३० चा सहावा व ३१ हीं चार बंधस्थानें संभवतात.

देवांत नवमग्रैवेयकापर्यंत प्रथमोपशम सम्यक्त्व होऊं शकतें. अशा देवांस चौथ्या गुणस्थानांत २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान असतें.

वेदक सम्यग्दृष्टि जीव ७ व्या गुणस्थानांत द्वितीयोपशम सम्यक्त्वास ग्रहण करतो या सम्यक्त्वाचा काल अंतर्मुहूर्त आहे या अंतर्मुहूर्ताच्या पहिल्या समयांत २८, २९, ३०, ३१. हीं चार बंधस्थानें असूं शकतील. तो जीव ८ व्या गुणस्थानांत चढून ८व्या गुणस्थानाच्या सहाव्या भागापर्यंत वरील चार बंधस्थानें बांधूं शकेल. त्याच जीवास ८व्या गुणस्थानाच्या ७ व्या भागांत व ९ व्या, १० व्या गुणस्थानांत एक प्रकृतीचें आठवें बंधस्थान असूं शकतें. तोच जीव उपशम श्रेणींतून उतरून ६, ५, ४ या गुणस्थानांत आल्यास त्यास २८ चा पहिला प्रकार व २९ चा सहावा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात. तोच द्वितीयोपशमसम्यक्त्वी जीव [ जर त्यानें उपशमश्रेणी चढण्यापूर्वी देवायूचा बंध केला असेल ] उपशम श्रेणींत असतांना ( चढतांना किंवा उतरतांना ) मरण पावेल तर तो वैमानिक देव होईल. तिथें द्वितीयोपशम सम्यक्त्वांत ४ थ्या गुणस्थानामध्यें निर्वृत्यपर्याप्तावस्थेंत त्यांस २९ चा पांचवा प्रकार व ३० चा पांचवा प्रकार हीं दोन बंधस्थानें असूं शकतात.

द्वितीयोपशमसम्यक्त्व ४ ते ११ या आठ गुणस्थानांत असूं शकतें.

प्रथमोपशम व द्वितीयोपशम सम्यक्त्वांत ज्यांस ३१ नाम कर्माच्या प्रकृतीचें बंधस्थान सत्तेंत असेल तो जीव ६ व्या गुणस्थानांतून १ ल्या गुणस्थानांत येणार नाहीं.

४, ५, ६ या गुणस्थानांत, ज्या जीवांस तीर्थंकर प्रकृतीची किंवा आहारक प्रकृतीची सत्ता असेल त्यांस अनंतानुबंधीचा उदय होणार नाहीं, म्हणून तो सासादनांत येणार नाहीं.

तीर्थंकर व आहारक या दोन प्रकृतींची सत्ता असणारा जीव पहिल्या गुणस्थानांत जाऊं शकत नाहींत.

आहारकप्रकृतींची सत्ता असणारा जीव दुसऱ्या गुणस्थानांत जाऊं शकत नाहीं.

## क्षायिकसम्यक्त्व.

दर्शनमोहनीय कर्माच्या क्षपणाचा आरंभ कर्मभूमींतील मनुष्य, तीर्थंकर किंवा केवली किंवा श्रुतकेवली यांच्या पादमूलांत ( चरणापाशीं ) होतो. व निष्ठापन (पूर्णता) तेथें होईल किंवा मरण पावल्यास वैमानिक देवांत, भोगभूमींतील मनुष्य व तिर्यंच अवस्थेंत किंवा पहिल्या नरकांत होईल.

दर्शनमोहनीय कर्माच्या क्षपणाचा आरंभ करणाऱ्या जीवास कृतकृत्य—वेदक सम्यग्दृष्टि म्हणतात. व हा जीव चारही गतींत उत्पन्न होऊं शकेल.

क्षायिकसम्यग्दृष्टि जीवांस २८, २९, ३०, ३१, १ हीं पांच बंधस्थानें यथासंभव बांधली जातील.

## वेदकसम्यक्त्व.

४, ५, ६, ७ या गुणस्थानांतील द्वितीयोपशम सम्यक्त्वधारी मनुष्य मरून वैमानिक देवांत उत्पन्न होतो. व तेथें त्यांस द्वितीयोपशम सम्यक्त्वाचा काल संपल्यानंतर वेदकसम्यक्त्व प्राप्त होतें.

कर्मभूमींतील प्रथमोपशमसम्यक्त्वी मनुष्य उपशमसम्यक्त्वाचा काल संपल्यानंतर सम्यक्त्वमोहनीयाच्या उदयानें वेदकसम्यक्त्वी होतो.

कर्मभूमींतील सादिमिथ्यादृष्टि मनुष्य मिथ्यात्वाच्या उदयाचा अभाव करून सम्यक्त्व मोहनीयाच्या उदयानें असंयतादि चार गुणस्थानांत ( ४ ते ७ गुणस्थान ) वेदक सम्यग्दृष्टि होतो. वेदक किंवा कृतकृत्यवेदक सम्यग्दृष्टि जीवांस ४, ५, ६, या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार, २९ चा सहावा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात. परंतु याच जीवास अप्रमत्त गुणस्थानांत २८-२९-३०-३१ हीं चार बंधस्थानें संभवतात.

पहिल्या तीन नरकांतील वेदकसम्यग्दृष्टि जीवांस २९ चा पांचवा व ३० चा पांचवा प्रकार हीं बंधस्थानें संभवतील. बाकीच्या नरकांत २९ चा पांचवा प्रकार हें बंधस्थान संभवतें.

कर्मभूमींतील तिर्यंच व भोगभूमींतील मनुष्य व तिर्यंच हे वेदकसम्यत्वावस्थेंत असतांना व भोगभूमींतील कृतकृत्यवेदकसम्यग्दृष्टि २८ चा पहिला प्रकार बांधतील.

कृत्यकृत्यवेदकसम्यग्दृष्टि देव २९ चा ५ वा प्रकार व ३० चा पांचवा प्रकार बांधतील.

भवनत्रिकांपासून नवग्रैवेकापर्यंतचे सादि मिथ्यादृष्टि [ मिथ्यात्वांतून तीन करण केल्यावांचून ] वेदकसम्यग्दृष्टि होतील. ते वेदकसम्यग्दृष्टि देव २९चा ५वा प्रकार बांधतील.

प्रथमोपशम सम्यक्त्वी देव व देवपर्यायांत ज्यांना वेदकसम्यक्त्व झालें आहे असे देव २९ चा ५ वा प्रकार बांधतील.

**गाथा ५५१**–सासादन सम्यक्त्वांत २८, २९, ३० हीं तीन बंधस्थानें संभवतात. निर्वृत्यपर्याप्तक अवस्थेंतील बादर; पृथ्वी, जल, प्रत्येक वनस्पति त्रींद्रिय चतुरिंद्रिय, असैनी सैनी, तिर्यंच मनुष्य आणि पर्याप्त नारकी व पर्याप्त अपर्याप्त, भवनत्रिकापासून बाराव्या स्वर्गापर्यंतचे देव या सर्वांना सासादन सम्यक्त्वांत २९ चा ४–५ प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

पर्याप्त सैनी तिर्यंच व मनुष्य यांस सासादनांत २८ चा पहिला प्रकार २९ चा ४–५ वा प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

तेराव्या स्वर्गांपासून नवग्रैवेयकापर्यंत पर्याप्त, अपर्याप्त अवस्थेंत सासादनगुणस्थानामध्यें २९ चा ५ वा प्रकार हें बंधस्थान असतें.

मिश्रसम्यक्त्वांत २८ व २९ हीं दोन बंधस्थानें संभवतात.

पर्याप्त देव व नारकी यांना २९ चा ५ वा प्रकार व तिर्यंच आणि मनुष्य यांना २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान संभवतें.

मिथ्यात्वांत २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात. पहिल्यापासून सहाव्या नरकापर्यंतचे अपर्याप्त व पर्याप्तनारकी यांच्या मिथ्यात्वांत २९ चा ४–५ वा प्रकार व ३० चा चौथा प्रकार हीं बंधस्थानें संभवतात.

सातव्या नरकांत त्याच अवस्थेंत असणाऱ्या जीवांस २९ चा चौथा व ३० चा चौथा प्रकार हीं दोन बंधस्थानें संभवतात.

लब्ध्यपर्याप्त किंवा निर्वृत्त्यपर्याप्त, बादर पृथ्वी, जल, सूक्ष्म अग्नि, वायु, साधारण प्रत्येक वनस्पति, द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, असंज्ञी, संज्ञी, तिर्यंच आणि मनुष्य या सर्वांना २३, २५, २६, २९, ३० हीं पांच बंधस्थानें संभवतात; परंतु अग्नि व वायुकायिकांमध्यें २५ चा ६ वा प्रकार व २९ चा ५ वा प्रकार हीं दोन बंधस्थानें होत नाहींत.

पर्याप्त असंज्ञी व संज्ञी तिर्यंच व मनुष्य यांना मिथ्यात्वांत २३ आदि सहा बंधस्थानें संभवतात.

लब्ध्यपर्याप्त व निर्वृत्त्यपर्याप्त मनुष्यांत २८ सोडून २३ आदि पांच बंधस्थानें होतात. मिथ्यात्वांत अपर्याप्त व पर्याप्त–भवनत्रिकांपासून दुसऱ्या स्वर्गापर्यंतचे देव यांना २५, २६, २९, ३० हीं चार बंधस्थानें संभवतात.

तिसऱ्यापासून बाराव्या स्वर्गापर्यंत २९–३० हीं दोन बंधस्थानें व तेराव्या स्वर्गांपासून नवग्रैवेयकापर्यंत २९ हें एकच बंधस्थान असतें.

## गुणस्थानांतून चढण्या उतरण्याचा क्रम— प्रासंगिक गाथा [५५६]

" चदुरेक्क दुपण पंच य छत्तिग ठाणाणि अप्पमत्तंता ।

तिण्णुवसमगे संते तियतियतिय–दोण्णि गच्छंति ॥ १ ॥ पृष्ठ ७५५

**अर्थ:**—अप्रमत्तापर्यंत ४, १, २, ५,५, ६, ३ हीं स्थानें होतात. उपशमश्रेणीच्या तीन गुणस्थानांत तीन, तीन, तीन, आणि उपशान्तमोहांत दोन स्थानें होतात.

## ( कोष्टक नं. १५९ )

| कोणत्या गुणस्थानांतून | | कोणत्या गुणस्थानांत जातो. | स्थानसंख्या |
|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | | ३, ४, ५, ७ | ४ |
| २ सासादन | | १ | १ |
| ३ मिश्र | | १, ४ | २ |
| ४ असंयत | | १, २, ३, ५, ७ | ५ |
| ५ देशसंयत | | १, २, ३, ४, ७ | ५ |
| ६ प्रमत्त | | १, २, ३, ४, ५, ७ | ६ |
| ७ अप्रमत्त | | ६, ८–[ ४ मरण पावल्यास ] | ३ |
| ८ अपूर्वकरण | उपशम श्रेणी | ७, ९, ४ ,, | ३ |
| ९ अनिवृत्तिकरण | उपशम श्रेणी | ८, १०, ४ ,, | ३ |
| १० सूक्ष्मसांपराय | उपशम श्रेणी | ९, ११, ४ ,, | ३ |
| ११ उपशांतमोह | उपशम श्रेणी | १०, ४ ,, | २ |

### संज्ञिमार्गणा.

संज्ञीला सर्व [ ८ ] बंधस्थानें संभवतात. नारकींना २९--३० हीं दोन बंधस्थानें संभवतात. तिर्यंचांना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात. [ तीर्थंकर व आहारकयुत सोडून ] मनुष्यांना सर्व ( ८ ) बंधस्थानें संभवतात. देवांना २५,२६,२९,३० बंधस्थानें संभवतात. असंज्ञींना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात. [तीर्थंकर व आहारकयुत सोडून].

### आहारकमार्गणा.

आहारकांना सर्व ( ८ ) बंधस्थानें संभवतात. देवनारकींना २९–३० बंधस्थानें संभवतात. तिर्यंचांना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात. मनुष्यांना सर्व ( ८ ) बंधस्थानें संभवतात. अनाहारकांना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात, विग्रहगतींत देवनारकींना २९–३० बंधस्थानें संभवतात. विग्रहगतींत मनुष्य व तिर्यंचांना २३ आदि ६ बंधस्थानें संभवतात. तिर्यंचाच्या ४ थ्या गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार हें बंधस्थान संभवतें. याप्रमाणें मार्गणानुसार बंधस्थानांचें वर्णन संपलें.

### पुनरुक्तभंग.

**गाथा ५५२–५५३**—मिथ्यादृष्टीच्या बंधस्थानाच्या भंगांत सासादनाच्या बंधस्थानाचे भंग गर्भित समजावे. कारण, त्यांत समानता आहे. असंयताच्या बंधस्थानाच्या भंगांत मिश्र, देशसंयत व प्रमत्त या गुणस्थानाच्या बंधस्थानाचे भंग गर्भित समजावेत.

## अपुनरुक्त भंगांचें ( कोष्टक नं. १६० )

| गुणस्थान | बंधस्थान | भंग | विशेष |
|---|---|---|---|
| मिथ्यात्व | २३ तिर्यंच | १ | गाथा ५३०, ५३१ ते ५३७ व ५४४ पहा. |
| ,, | २५ ,, | ८ | |
| ,, | २५ मनुष्य | १ | |
| ,, | २६ तिर्यंच | ८ | |
| ,, | २८ नरक | १ | |
| ,, | २८ देव | ८ | |
| ,, | २९ पंचेंद्रियपर्याप्त तिर्यंच | ४६०८ | |
| ,, | २९ मनुष्यपर्याप्त | ४६०८ | |
| ,, | ३० पंचेंद्रियपर्याप्त [तिर्यंच]उद्योतसहित | ४६०८ | |
| असंयत | २९ मनुष्यपर्याप्त ...................... | ८ | |
| ,, | २९ देव, तीर्थंकर...................... | ८ | |
| ,, | ३० मनुष्य तीर्थंकर ................. | ८ | |
| ,, | २८ देव............................. | ८ | |

### सासादनाचीं बंधस्थानें व भंग.

| बंधस्थान | भंग | |
|---|---|---|
| २९ पंचेंद्रिय पर्याप्त ( तिर्यंच ) | ३२०० | मिथ्यात्वाच्या ४६०८ मध्यें गर्भित |
| ,, मनुष्य पर्याप्त | ३२०० | ,, ,, ,, |
| ३० पंचेंद्रिय पर्याप्त उद्योत | ३२०० | ,, ,, ,, |
| २८ देव | ८ | ,, मध्यें गर्भित |

### मिश्रगुणस्थानाचीं बंधस्थानें व भंग.

| बंधस्थान | भंग | |
|---|---|---|
| २९ मनुष्य पर्याप्त | ८ | चौथ्या गुणस्थानाच्या आठ भंगांत गर्भित |
| २८ देव | ८ | ,, ,, ,, |

### देशसंयत व प्रमत्तगुणस्थानांचीं बंधस्थानें व भंग.

| बंधस्थान | भंग | |
|---|---|---|
| २८ देव | ८ | चौथ्या गुणस्थानाच्या आठमध्यें गर्भित |
| २९ देव, तीर्थंकर | ८ | ,, ,, ,, |

## नामकर्माच्या बंधाचे प्रकार.

**गाथा** ५५४–१ भुजाकार, २ अल्पतर, ३ अवास्थित, ४ अवक्तव्य ( गाथा ४६८ व ४६९ यांत यांच्या व्याख्या आहेत )

या चार प्रकारच्या बंधस्थानाच्या भंगांची गणति ३ प्रकारांनीं केली जाते.

१ स्वस्थान, २ परस्थान, ३ सर्वपरस्थान.

**गाथा** ५५५–१ स्वस्थान म्हणजे आपलें गुणस्थान.

२ परस्थान म्हणजे आपल्या गुणस्थानांतून इतर गुणस्थानांत.

३ सर्वपरस्थान म्हणजे एकगतिसंबंधीं गुणस्थानांतून दुसऱ्या गतीच्या गुणस्थानांत.

**गाथा** ५५६–या गाथेचा विषय गाथा ५५१ मध्यें प्रासंगिक गाथा लिहिली आहे तींत आला आहे.

**गाथा** ५५७ । ५५८ । ५५९–या तीन गाथांचा विषय गाथा ५५१ च्या कोष्टकांत आला आहे.

**गाथा** ५५९–मध्यें संस्कृत चार श्लोक आहेत त्यांचा अर्थ:—

११ व्या गुणस्थानांत मरणारा सर्वार्थसिद्धींत अहमिंद्र होतो. पहिल्या व चौथ्या गुणस्थानांत मरणारा जीव चारही गतींत जातो.

सासादनांत मरणारा जीव नरकगतिविना बाकींच्या तीन गतींत जातो. ५ ते ११ गुणस्थानांत मरणारे जीव देवगतींत जातात.

तिसऱ्या गुणस्थानांत, क्षपकश्रेणींत व १३ व्या गुणस्थानांत मरण नाहीं. चौदाव्या गुणस्थानांतील जीव मोक्षाला जातो.

### जीव कोणत्या गुणस्थानांत मरून कोणत्या गतींत जातो.

### [ कोष्टक नं. १६१ ]

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | गुणस्थान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ गति | ३ | ० | ४ गति | देव | देव | देव | देव | देव | देव | अहमिंद्र | ० | ० | शिवगति | गति. |

**गाथा** ५६०–५६१—खालील अवस्थांतील जीव मरत नाहींत. [ गाथा ५५० पहा ] १ मिश्रगुणस्थानवर्ती, २ आहारकमिश्रकाययोगी, ३ निर्वृत्त्यपर्याप्तमिश्रकाययोगी, ४ क्षपकश्रेणीधारक, ५ उपशमश्रेणी चढणारे. [ ८ व्या गुणस्थानाच्या पहिल्या

भागांत ], ६ प्रथमोपशम सम्यक्त्वी, ७ सातव्या नरकांतील २,३,४ गुणस्थानधारी, ८ अनंतानुबंधीचें विसंयोजन केलेला जीव, मिथ्यात्वांत परतून आल्यास एक अंतर्मुहूर्त-पर्यंत, ९ दर्शनमोहक्षपक कृतकृत्यवेदक सम्यग्दृष्टि होईपर्यंत.

### बद्धायु कृतकृत्यवेदक सम्यग्दृष्टि मरुन चार गतींत कशाप्रकारें जातो ?

**गाथा ५६२**–कृतकृत्यवेदकाचा काल अंतर्मुहूर्त आहे. त्या अंतर्मुहूर्ताचे चार भाग करावे. पहिल्या भागांत मेल्यास देवगतींत जाईल. दुसऱ्या भागांत मेल्यास देव किंवा मनुष्यगतींत जाईल. तिसऱ्या भागांत मेल्यास देव, मनुष्य किंवा तिर्यंचगतींत जाईल. चौथ्या भागांत मेल्यास देव, मनुष्य, तिर्यंच किंवा नारक होईल.

**गाथा ५६३–५६४**—भुजाकारादि तीन प्रकारच्या बंधस्थानाचें स्वरूप गाथा ४६८, ४६९, ५५४ या गाथांत सांगितलें आहे.

### भुजाकारबंधस्थानाचे भंग.

**गाथा ५६५–२३** प्रकृतीचें बंधस्थान–याचा १ भंग.

अपर्याप्त असे १ पृथ्वी, १ जल, १ अग्नि, १ वायु, १ साधारणवनस्पति यांचे बादर व सूक्ष्म असे दोन भेद म्हणून १० + १ प्रत्येकवनस्पति मिळून ११. अशीं ११ प्रकारचीं एकेंद्रियप्रकृतियुत बंधस्थानें संसारीजीव बांधतील, म्हणून २३ चें बंधस्थान ११ प्रकारचें व भंग एक एक आहेत. म्हणून भंग ११=$\frac{२३}{११}$

२५ प्रकृतीचें बंधस्थान याचे भंग ८. स्थिर शुभ यश हीं
२ × २ × २ =८

बंधस्थानें बादर, पर्याप्त असे, पृथ्वी, जल, अग्नि, वायु व प्रत्येकवनस्पति असे ५ प्रकारचे एकेंद्रिययुत होतात, म्हणून ५ × ८ = ४० भंग होतात.

२५ बंधस्थानाचा दुसरा प्रकार— भंग ४. स्थिर शुभ
२ × २ = ४.

या बंधस्थानांस पर्याप्त बादर असे १ साधारण आणि सूक्ष्म असे १ पृथ्वी, १ जल, १ अग्नि, १ वायु, १ साधारण, असे १ बादर + ५ सूक्ष्म मिळून ६ प्रकारचे एकेंद्रिययुत बांधतील म्हणून ६ × ४ = २४ भंग झाले.

२५ चा तिसरा प्रकार भंग १.

या बंधस्थानांत १ अपर्याप्तद्वींद्रिययुत, २ त्रींद्रिययुत, ३ चतुरिंद्रिययुत ४ असंज्ञीयुत, ५ संज्ञीयुत, ६ मनुष्ययुत अशा ६ प्रकारांनीं जीव बांधतील म्हणून ६ × १ = ६ भंग.

२५ प्रकृतींच्या बंधस्थानाचे भंग ४० + २४ + ६ = ७० $\left(\frac{२५}{७०}\right)$

२६ च्या बंधस्थानाचे भंग ८. स्थिर शुभ यश

२ × २ × २ = ८

या बंधस्थानांस १ बादर पृथ्वीकाय आतपयुत व २ बादर पृथ्वीकाय उद्योतयुत ३ जलकाय उद्योतयुत, ४ वनस्पतिकाय उद्योतयुत असें चार प्रकारांनीं जीव बांधतील म्हणून ४ × ८ = भंग झाले. $\left(\frac{२६}{३२}\right)$

२८ च्या बंधस्थानाचे भंग ९

२८ देवगतियुत भंग ८

२८ नरकगतियुत भंग १

९ $\left(\frac{२८}{९}\right)$

२९ च्या बंधस्थानाचे भंग.

२९ चा एक प्रकार भंग ८ म्हणजे १ पर्याप्त द्वींद्रिययुत, २ त्रींद्रिययुत, ३ चतुरिंद्रिययुत, ४ पंचेंद्रिययुत असे चार प्रकारें जीव बांधतील म्हणून ४ × ८ = ३२.

२९ चा दुसरा प्रकार तिर्यंच गतियुतभंग ४६०८

२९. चा तिसरा प्रकार मनुष्यगतियुत भंग ४६०८

एकूण ३२ + ४६०८ + ४६०८ = ९२४८ $\left(\frac{२९}{९२४८}\right)$

३० च्या बंधस्थानाचे भंग.

३० चें बंधस्थान उद्योतयुत ८ भंग. १ पर्याप्त द्वींद्रिययुत, २ त्रींद्रिययुत, ३ चतुरिंद्रिययुत, ४ असंज्ञी पंचेंद्रिययुत या चार प्रकारांनीं जीव बांधतील म्हणून ४×८=३२.

३० चे बंधस्थान उद्योतयुक्त भंग संज्ञी पंचेंद्रिय तिर्यंच युत } ४६०८ / ४६४० $\left(\frac{३०}{४६४०}\right)$

वर लिहिल्याप्रमाणें मिथ्यात्वगुणस्थानांत भंग समजावेत.

## भुजाकारभग काढण्याचा विधि.

२३ चा १ भंगवाला २५ च्या ७० भंगाला बांधतो, तर २३ चा ११ भंगवाला २५ च्या किती भंगाला बांधील ? — ७० × ११ = ७७० +

याचप्रमाणें २३ चा १ भंगवाला २६ च्या ३२ ला बांधतो, तर २३ चा ११ भंगवाला २६ च्या किती भंगाला बांधील ? — ३२ × ११ = ३५२ +

२३ चा १ भंगवाला जर २८ चे ९ बांधतो, तर २३ चा ११ भंगवाला किती भंगाला बांधील? —९ × ११ = ९९ +

२३ चा १ वाला : २९ चा ९२४८ :: २३ चे ११ वाला किती? = १०१७२८ +

२३ चा १ वाला : ३० चा ४६४० :: २३ चे ११ वाला किती? = ५१०४० +

१५३९८९

२३ च्या बंधस्थानाच्या अपेक्षेनें भुजाकार बंध १५३९८९ झाले. याचप्रमाणें २५ चे भंग २६ आदीशीं व २६ चे भंग २८ आदीशीं, २८ चे भंग २९ व ३० शीं, २९ चे भंग ३० शीं काढावेत.

## मिथ्यात्व गुणस्थानांत भुजाकार भंग काढण्याचें (कोष्टक नं. १६२)

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २३<br>१ | ३०<br>४६४० | २३<br>११ | २५<br>१ | ३०<br>४६४० | २५<br>७० | २६<br>१ | ३०<br>४६४० | २६<br>३२ | २८<br>१ | ३०<br>४६४० | २८<br>९ | २९<br>१ | ३०<br>४६४० | २९<br>९२४८ |
| २३<br>१ | २९<br>९२४८ | २३<br>११ | २५<br>१ | २९<br>९२४८ | २५<br>७० | २६<br>१ | २९<br>९२४८ | २६<br>३२ | २८<br>१ | २९<br>९२४८ | २८<br>९ | प्रमाण | फल | इच्छा |
| २३<br>१ | २८<br>९ | २३<br>११ | २५<br>१ | २८<br>९ | २५<br>७० | २६<br>१ | २८<br>९ | २६<br>३२ | प्रमाण | फल | इच्छा | | | |
| २३<br>१ | २६<br>३२ | २३<br>११ | २५<br>१ | २६<br>३२ | २५<br>७० | प्रमाण | फल | इच्छा | | | | | | |
| २३<br>१ | २५<br>७० | २३<br>११ | प्रमाण | फल | इच्छा | | | | | | | | | |
| प्रमाण | फल | इच्छा | | | | | | | | | | | | |

### मिथ्यात्वगुणस्थानांतलि भुजाकारबंधस्थानाचे भंग.

२३ चे बंधस्थान ७० + ३२ + ९ + ९२४८ + ४६४० = १३९९९

१३९९९ × ११ = (१५३९८९)

२५ चें बंधस्थान ३२ + ९ + ९२४८ + ४६४० = १३९२९.

१३९२९ × ७० = (९७५०३०)

२६ चें बंधस्थान ९ + ९२४८ + ४६४० = १३८९७.

१३८९७ × ३२ = (४४४७०४)

२८ चें बंधस्थान ९२४८ + ४६४० = १३८८८ × ९ = ( १२४९९२ )
२९ चें ,, ४६४० × ९२४८ = ( ४२९१०७२० )

४४६०९४३५

**गाथा ५६६**–२३ पासून ३० पर्यंतच्या भुजाकार बंधस्थानाचा बंध मिथ्यादृष्टींला होतो; परंतु २८ चा बंध पर्याप्तपंचेंद्रिय जीवासच होतो.

**गाथा ५६७**–भोगभूमींत पर्याप्त पंचेंद्रिय सम्यग्दृष्टि किंवा मिथ्यादृष्टि व निर्वृत्यपर्याप्त सम्यग्दृष्टि यांना २८ चा पहिला प्रकार [ देवगतियुत ] हा बंध होतो. परंतु भोगभूमींतील निर्वृत्यपर्याप्त मिथ्यादृष्टीला २९ चा चौथा प्रकार [ तिर्यंचयुत ] व पांचवा प्रकार [ मनुष्ययुत ] व ३० चा चौथा प्रकार [ तिर्यंच उद्योतयुत ] यांचा बंध होईल.

**गाथा ५६८**–पूर्वी लिहिल्याप्रमाणें मिथ्यादृष्टीचे स्थान भेदः–२३ चे ११, २५ चे ७०, २६ चे ३२, २८ चे ९, २९ चे ९२४८ व ३० चे ४६४० याप्रमाणें आहेत.

**गाथा ५६९**--मिथ्यादृष्टीच्या अल्पतर बंधस्थानांच्या भंगाचें.

## ( कोष्टक नं. १६३ )

| प्रमाण | फल | इच्छा | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३०<br>१ | २३<br>११ | ३०<br>४६४० | प्र. | फ. | इ. | | | | | | | | | |
| ३०<br>१ | २५<br>७० | ३०<br>४६४० | २९<br>१ | २३<br>११ | २९<br>९२४८ | प्र. | फ. | इ. | | | | | | |
| ३०<br>१ | २६<br>३२ | ३०<br>४६४० | २९<br>१ | २५<br>७० | २९<br>९२४८ | २८<br>१ | २३<br>११ | २८<br>९ | प्र. | फ. | इ. | | | |
| ३०<br>१ | २८<br>९ | ३०<br>४६४० | २९<br>१ | २६<br>३२ | २९<br>९२४८ | २८<br>१ | २५<br>७० | २८<br>९ | २६<br>१ | २३<br>११ | २६<br>३२ | प्र. | फ. | इ. |
| ३०<br>१ | २९<br>९२४८ | ३०<br>४६४० | २९<br>१ | २८<br>९ | २९<br>९२४८ | २८<br>१ | २६<br>३२ | २८<br>९ | २६<br>१ | २५<br>७० | २६<br>३२ | २५<br>१ | २३<br>११ | २५<br>७० |

**मिथ्यात्वगुणस्थानांतील अल्पतर बंधस्थानाचे भंग.**

३० चे ९२४८ + ९ + ३२ + ७० + ११ = ९३७० × ४६४० = ४३४७६८००
२९ चे ९ + ३२ + ७० + ११ = १२२ × ९२४८ = ११२८२५६

२८ चे ३२ + ७० + ११ = ११३ × ९ = १०१७
२६ चे ७० + ११ = ८१ × ३२ = २५९२
२५ चे ११ × ७० = ७७०

४४६०९४३५

**गाथा** ५७०–भुजाकार व अल्पतरबंधाचे भंग कसे काढावेत याचा विधि या गाथेंत सांगितला आहे; परंतु मागें (गाथा ५६५ ते ५६८) याचें वर्णन आलें आहे.

**गाथा** ५७१–मिथ्यादृष्टीचे भुजाकार भंग ४४६०९४३५
,, अल्पतर भंग ४४६०९४३५

८९२१८८७० इतके

भंग अवस्थित जाणावेत.

**गाथा ५७२।५७३।५७४ चौथ्या गुणस्थानांत भुजाकार बंधस्थानाचे भंग.**

[१] २८ चा पहिला प्रकार ( देवयुत )हा बंध करून २९ चा सहावा प्रकार ( तीर्थंकरसहित ) बांधील तर प्रत्येकाचे ८।८ भंग आहेत म्हणून ८ × ८ भंग होतात. = ६४

[२] २९ चा सहावा प्रकार बांधून ३० चा पांचवा प्रकार ( तीर्थ मनुष्ययुत ) हा बंध बांधील तर प्रत्येकाचे ८।८ भंग आहेत म्हणून ८×८ = भंग होतात. ६४

[३] २९ चा पांचवा प्रकार ( मनुष्ययुत ) याचें भंग ४६०८ यांना तीर्थंकराची सत्ता असणारा नारकी मिथ्यादृष्टि अपर्याप्तावस्थेंत बांधील. पर्याप्त झाल्यानंतर सम्यग्दृष्टि होऊन ३० चा पांचवा प्रकार ( तीर्थमनुष्ययुत ) हा बंध त्यास होईल. याचे भंग ८ आहेत म्हणून ४६०८ × ८ = ३६८६४

३६९९२

चौथ्या गुणस्थानांत भुजाकार बंधस्थानाचे ३६९९२ भंग होतात.

**गाथा ५७५–चौथ्या गुणस्थानांत अल्पतर बंधस्थानाचे भंग.**

[१] नरकायूचा बंध झालेला मनुष्य सम्यग्दृष्टि होऊन तीर्थंकरप्रकृतीचा बंध त्यास सुरू होईल तर २९ चा सहावा प्रकार ( तीर्थदेवयुत ) हा बंध तो बांधील. त्याचे ८ भंग आहेत. तो जीव नरकाच्या सन्मुख असतांना मरणापूर्वी एक अंतर्मुहूर्त मिथ्यादृष्टि होऊन २८ चा दुसरा प्रकार ( नरकयुत ) हा बंध बांधील. त्याचा भंग १ आहे म्हणून ८ × १ = ८

[२] देव अथवा नारकी जीव असंयत अवस्थेंत असतांना त्यास ३० चा पांचवा प्रकार [ मनुष्यतीर्थयुत ] हा बंध होईल. त्याचे ८ भंग आहेत. तोच जीव मरून आईच्या गर्भात तीर्थंकररूपानें येईल त्यावेळीं त्यास २९ चा सहावा प्रकार [ देवतीर्थयुत ] हा बंध होईल. त्याचे भंग ८ आहेत. ८×८ = ६४
अल्पतर भंग ७२ आहेत. ७२

नोट:—२९ चा पांचवा प्रकार ( मनुष्ययुत याचे भंग ८ आहेत ) बांधून २८ चा पहिला प्रकार ( देवयुताचे भंग ८ ) हा बंध बांधील म्हणून ८×८=६४ भंग झाले. हे भंग मिथ्यादृष्टीच्या भंगात गर्भित असल्यामुळे पुनरुक्त होतात. अतः चौथ्या गुणस्थानांत हे भंग गणले नाहींत.

| | |
|---|---|
| चौथ्या गुणस्थानाचे भुजाकार भंग | ३६९९२ |
| ,, ,, अल्पतर भंग | ७२ |
| | ३७०६४ |

हे ३७०६४ भंग अवस्थित समजावेत.

## गाथा ५७६ ते ५८२ अप्रमत्तादि गुणस्थानांत बंधस्थानाचे भंग.

## भुजाकारबंधाच्या भंगाचें (कोष्टक नं. १६४)

| प्रमत्त | अप्र. | अप्र. | असंयत | अप्र. | अप्र. | अप्र. | अप्र. | अप्र. | अप्र. | पु.अप्र | पु.अप्र | पु.अप्र |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २९ | ३० | ३१ | ३० | ३१ | ३१ | २८ | २९ | ३० | ३१ | २९ | ३० | ३१ |
| ८ | १ | १ | ८ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |
| अप्र. | प्रमत्त | प्रमत्त | अप्रमत्त | प्रमत्त | अप्र. | अ.क. | अपूर्व | अपूर्व | अपूर्व | अप्र. | अप्र. | अप्र. |
| २८ | २८ | २८ | २९ | २९ | ३० | १ | १ | १ | १ | २८ | २८ | २८ |
| १ | ८ | ८ | १ | ८ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ |

### कोष्टकाचें विवरण.

( १ ) अप्रमत्तगुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार [ देवयुतभंग १ ] बांधीत होता, नंतर प्रमत्तगुणस्थानांत येऊन २९ चा सहावा प्रकार [ देवतीर्थयुत भंग ८ ] बांधील म्हणून १ × ८ = ८

[ २ ] प्रमत्तगुणस्थानांत २८चा पहिला प्रकार [ देवयुत भंग ८ सहित ] बांधीत होता. नंतर अप्रमत्तांत येऊन ३०चा सहावा प्रकार [ आहारकद्विक भंग ] बांधील म्हणून ८ × १ = ८

[ ३ ] प्रमत्तगुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार ८ भंगसहित बांधीत होता नंतर अप्रमत्तांत येऊन ३१ चा बंध ( तीर्थआहारासहित भंग १ बांधील म्हणून ८ × १ = ८

[ ४ ] अप्रमत्तगुणस्थानांत २९ चा सहावा प्रकार ( देवतीर्थयुत भंग १ सहित ) बांधीत होता. तो मरून चौथ्या गुणस्थानांत देव झाला तेव्हां ३० चा पांचवा प्रकार. ( मनुष्यतीर्थयुत ८ भंगसहित ) बांधील म्हणून १ × ८ ८

[ ५ ] प्रमत्तगुणस्थानांत २९ चा सहावा प्रकार [ दे०ती०युत ८ भंग सहित ] बांधीत होता. नंतर अप्रमत्तांत जाऊन ३१ चा १ भंग बांधील म्हणून ८ × १ = ८

[ ६ ] अप्रमत्त गुणस्थानांत ३० चा सहावा ( आहारकसहित भंग १ ) बांधीत होता. पुढें त्याच गुणस्थानांत तीर्थंकरप्रकृतीच्या बंधास प्रारंभ करून ३१ला बांधील. त्याचा भंग १ म्हणून १ × १ = १

[ ७ ] अपूर्वकरणगुणस्थानांतील अवरोहक (उतरणारा) त्या गुणस्थानांत १ प्रकृति ( यश ) एक भंगसहित बांधीत होता. तो ७ व्या गुणस्थानांत येऊन २८ चा पहिला प्रकार ( देवयुत ) १ भंगसहित बांधील म्हणूग १ × १ १

[ ८ ] तोच जीव ७ व्या गुणस्थानांत २९ चा सहावा प्रकार ( देव-तीर्थयुत भंग १ ) बांधील म्हणून १ × १ = १

[ ९ ] तोच जीव ७व्या गुणस्थानांत ३०चा ६वा प्रकार( देव आहारक युत भंग १ ) बांधील म्हणून १ × १ = १

[ १० ] तोच जीव ७ व्या गुणस्थानांत येऊन ३१ ( आहारक तीर्थ ) भंग १ सहित बांधील म्हणून १ × १ = १

४५

भुजाकार बंधस्थानाचे भंग ४५ होतात.

## पुनरुक्त भंग

(११) अप्रमत्त गुणस्थानांत २८ चा पहिला प्रकार [ देवसहित भंग १ ]बांधीत होता तेथेंच २९ चा सहावा प्रकार [ देवतीर्थयुत ] भंग १ बांधील.

(१२) त्याच गुणस्थानांत तोच जीव २८ ला बांधून नंतर ३० चा सहावा प्रकार [ आहारक देवभंग १ ] बांधील.

(१३) तोच जीव त्याच गुणस्थानांत २८ ला बांधून ३१ला [ तीर्थ.आहार.युत भंग १ सहित ] बांधील.

## अप्रमत्तादिगुणस्थानांतील अल्पतर बंधस्थानाचे भंग व अवक्तव्य भंग.

## [ कोष्टक नं. १६५ ]

| अल्पतर भंग | | | | | | | | अवक्तव्य भंग | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४गुण | प्रमत्त | प्र० | प्र० | अपूर्व | अपूर्व | अपूर्व | अपूर्व | १०गुण | ४थें गुण | ४थेंगुण |
| ३० | २९ | २९ | २८ | १ | १ | १ | १ | १ | २९ | ३० |
| ८ | ८ | ८ | ८ | १ | १ | १ | १ | १ | ८ | ८ |
| अप्र. | अप्र. | अप्र. | अप्र. | अपूर्व | अपूर्व | अपूर्व | अपूर्व | ११गुण | ११गुण | ११गुण |
| ३१ | ३१ | ३० | ३० | २८ | २९ | ३० | ३१ | ० | ० | ० |
| १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | | | |

### वरील कोष्टकाचें विवरण.

( १ ) अप्रमत्तगुणस्थानांत ३१ चा [ आहारकतीर्थसहित भंग १ ] बांधीत होता. तो मरून ४ थ्या गुणस्थानांत देव झाला. ३० चा ५ वा प्रकार ( मनुष्यतीर्थसहित भंग ८ ) बांधलि म्हणून १ × ८ = ८

( २ ) अप्रमत्तगुणस्थानांत ३१ चा बंध ( भंग १ ) होत होता. तो प्रमत्तांत येऊन २९ चा ६ वा प्रकार ( देवतीर्थयुत भंग ८ ) बांधील म्हणून १×८=८

( ३ ) अप्रमत्तगुणस्थानांत ३०चा सहावा प्रकार (आहारकसहित भंग१) बांधीत होता. तो प्रमत्तांत येऊन तीर्थंकरप्रकृति बंधाचा आरंभ करितो व २९चा ६वा [ देवतीर्थयुत भंग ८ ] प्रकार बांधतो म्हणून १ × ८ = ८

( ४ ) अप्रमत्तगुणस्थानांत ३०चा ६वा प्रकार ( आहारकसहित भंग १) बांधीत होता. तो प्रमत्तांत येऊन २८ चा १ ला प्रकार ( देवसहित भंग ८ ) बांधील म्हणून १ × ८ = ८

( ५ ) अपूर्वकरणांतील आरोहक ( श्रेणी चढणारा ) २८ चा १ ला प्रकार [ देवयुत भंग १ ] बांधीत होता. तो त्याच गुणस्थानाच्या ७ व्या भागांत १ प्रकृति ( यश, १ भंगसहित ) बांधील म्हणून १×१ = १

( ६ ) अपूर्वकरणांत २९ चा ६ वा प्रकार [ दे. ती. युत भंग १ ] बांधीत होता. तो ७ व्या भागांत येऊन यश प्रकृतीला १ भंगसहित बांधील म्हणून १×१ = १

( ७ ) तोच अपूर्वकरणांत ३० चा ६ वा प्रकार [ आहारक सहित भंग १ ] बांधीत होता. तो ७ व्या भागांत येऊन यशःप्रकृतीला [ १ भंग ] बांधिलि म्हणून १ × १ = १

( ८ ) तोच अपूर्वकरणांत ३१ ला [ आ. ती. युत भंग १ ] बांधीत होता. तो ७ व्या भागांत येऊन यशः प्रकृति बांधिलि [ भंग १ ] म्हणून १×१ = १

३

असे अल्पतर भंग ३६ झाले.

३६+४५=८१ भंग अवस्थिताचे झाले.

## अवक्तव्यभंगांचें विवरण.

( १ ) उपशांतकषाय गुणस्थानांत नामकर्माच्या कोणत्याच प्रकृतीला बांधीत नव्हता. तो १० व्या गुणस्थानांत येऊन एक यशःप्रकृतीला बांधील. [ भंग १ ] = १

( २ ) उपशांतकषाय गुणस्थानांत नामकर्माच्या कोणत्याच प्रकृतीला बांधीत नव्हता. तो मरून ४ थ्या गुणस्थानांत देव झाला. तेथें २९ चा पांचवा प्रकार [ मनुष्ययुत ८ भंग ] बांधील. = ८

( ३ ) उपशांतकषाय गुणस्थानांत नामकर्माच्या कोणत्याच प्रकृतीला बांधीत नव्हता. तो मरून ४ थ्या गुणस्थानांत देव झाला. तेथें ३० चा पांचवा प्रकार [ मनु. तीर्थ सहित भंग ८ ] बांधील. = ८

१७

असे अवक्तव्य भंग १७ झाले.

## सर्व नामकर्माच्या बंधस्थानाच्या भंगांचें ( कोष्टक नं. १६६ )

| गुणस्थान | भुजाकार | अल्पतर | अवस्थित | अवक्तव्य |
|---|---|---|---|---|
| मिथ्यात्व | ४४६०९४३५ | ४४६०९४३५ | ८९२१८८७० | |
| असंयत | ३६९९२ | ७२ | ३७०६४ | |
| अप्रमत्त | ४५ | ३६ | ८१ | |
| उपशांतमोह | | | १७ अवक्तव्य | उपशांत कषायांत १७. |
| बेरीज | ४४६४६४७२ | ४४६०९५४३ | ८९२५६०३२ | १७ |

## नामकर्माच्या बंधस्थानाचें वर्णन संपलें.

॥ घोरसंसारवाराशितरंगनिकरोपमैः । नामबंधपदैर्जीवा वेष्टितास्त्रिजगद्भवाः ॥ १ ॥

अर्थ—घोर संसारसमुद्राच्या तरंगसमूहाप्रमाणें नामकर्माच्या बंधस्थानांनीं त्रैलोक्यांतील जीव वेढलेले आहेत.

## नामकर्माचीं उदयस्थानें.

**गाथा ५८३।५८४**—नामकर्माच्या उदयस्थानाचे पांच नियतकाल आहेत.

## ( कोष्टक नं. १६७ )

| नियतकालांचें वर्णन | कालमर्यादा |
|---|---|
| [१] विग्रहगति किंवा कार्मणशरीरांत [ केवलीसमुद्घाताच्या अपेक्षेनें ] | १, २, ३ समय |
| [२] मिश्रशरीर [ शरीरपर्याप्ति पूर्ण न होईपर्यंत ] | अंतर्मुहूर्त |
| [३] शरीरपर्याप्ति ( शरीरपर्याप्ति पूर्ण झाल्यापासून श्वासोच्छ्वासपर्याप्ति पूर्ण न होईपर्यंत ) | ,, |
| [४] श्वासोच्छ्वासपर्याप्ति ( श्वासोच्छ्वासपर्याप्ति पूर्ण झाल्यापासून भाषापर्याप्ति पूर्ण न होईपर्यंत. ) | ,, |
| [५] भाषापर्याप्ति [भाषापर्याप्ति पूर्ण झाल्यापासून अवशेष आयूपर्यंत ] | भुज्यानआयु उणे-वरील चारकाल |

## पांच नियतकालांचे स्वामी

**गाथा ५८५**—लब्ध्यपर्याप्त जीवांत वरील पहिले दोन काल असतात.

एकेंद्रियांत पहिले चार काल असतात.

त्रसजीवांत वरील पांचही काल असतात.

आहारकशरीरांत पहिला काल सोडून बाकीचे ४ काल असतात.

## समुद्घातकेवलींत कालाचें प्रमाण.

**गाथा ५८६, ५८७**—समुद्घातकेवलींत अनुक्रमानें ५ काल असतात.

१ कार्मण, २ औदारिकमिश्र, ३ औदारिकशरीरपर्याप्ति, ४ श्वासोच्छ्वास-पर्याप्ति, ५ भाषापर्याप्ति.

हे पांच काल आत्मप्रदेशाच्या संकोचनसमयीं होतात व प्रसरणसमयीं खालील तीन काल असतात:—

[ १ ] दंडरूप प्रदेशांच्या प्रसरणांत व संकोचनांत औदारिकशरीरपर्याप्ति–काल असतो.

[ २ ] कपाटरूप प्रदेशाच्या प्रसरणांत व संकोचनांत औदारिकमिश्रकाल असतो.

[ ३ ] प्रतररूप प्रदेशाच्या प्रसरणांत व संकोचनांत व लोकपूरणांत कार्मण काल असतो.

याप्रमाणें शरीरपर्याप्तिकाल, मिश्रकाल व कार्मणकाल हे प्रसरणाच्या चार समयांत होतात.

आत्मप्रदेशाच्या संकोचनानंतर मूळशरिरांत प्रवेश करण्याच्या समयापासून संज्ञी पचेंद्रियाप्रमाणें अनुक्रमानें पर्याप्ति पूर्ण कराव्या लागतात. म्हणून समुद्घातकेवलीचे ५ काल संभवतात.

**समुद्घातकेवलीचे ८ समय व योग यांचें [ कोष्टक नं. १६८ ]**

| प्रसरण | योग |
|---|---|
| ( १ ) दंड | औदारिक. |
| ( २ ) कपाट | औदारिक मिश्र. |
| ( ३ ) प्रतर | कार्मण. |
| ( ४ ) लोकपूरण | कार्मण. |
| संकोचन | योग |
| ( ५ ) प्रतर | कार्मण. |
| ( ६ ) कपाट | औदारिक मिश्र. |
| ( ७ ) दंड | औदारिक. |
| ( ८ ) मूलशरीर प्रमाण | ,, |

**गाथा ५८८, ५८९, ५९०, ५९१, ५९२, ५९३, ५९४, ५९५, ५९६, ५९७, ५९८.– नामकर्माच्या उदयस्थानाचा उत्पत्तिक्रम.**

नामकर्माचीं उदयस्थानें बारा होतात.

तीं अशीं–२०, २१, २४, २५, २६, २७, २८, २९, ३०, ३१, ९, ८ त्यांचें

**( कोष्टक नं. १६९. )**

| उदयस्थान. | विवरण. |
|---|---|
| २० [ १ ] | ध्रुवोदयी ( ज्यांचा उदय सर्व जीवांना निरंतर होतो. ) १२ प्रकृति अनुक्रमें २ तैजसकार्मण, ४ वर्णादि, २ स्थिर अस्थिर, २ शुभअशुभ, १ अगुरुलघु, १ निर्माण = १२ |

| उदयस्थान | | विवरण |
|---|---|---|
| | | ४ गति, ५ जाति, २ त्रसस्थावर, २ बादरसूक्ष्म, २ पर्याप्त अपर्याप्त २ सुभगदुर्भग, २ आदेय अनादेय, २ यशस्कीर्ति, ४ गत्यानुपूर्वी.<br>विग्रहगतींत वरील ९ पिंड प्रकृतींपैकीं एक एक प्रकृतीचा उदय होईल म्हणून विग्रहगतींत १२+९=२१ प्रकृतींचा उदय होईल. परंतु सामान्य समुद्घातकेवलींच्या कार्मणयोगांत आनुपूर्वीचा उदय होत नाहीं. म्हणून २१−१=२०. |
| २१ | (२) | वरील २० प्रकृतींत १ एक आनुपूर्वीप्रकृति मिळविल्यानें २१ चें उदयस्थान होतें. त्याचा उदय विग्रहगतींत १, २, ३, समयापर्यंत होईल परंतु ऋजुगतींत २१ चें उदयस्थान नाहीं. २४ इत्यादींचें उदयस्थान ऋजुगतींत असतें.<br>तीर्थंकर केवली समुद्घाताच्या कार्मणयोगांत आनुपूर्वीप्रकृतीच्या ऐवजीं तीर्थंकरप्रकृति मिळविल्यानें २१ चें उदयस्थान होतें. |
| २४ | [३] | वरील २१ प्रकृतींतून १ आनुपूर्वी प्रकृति काढून टाकून.<br>१ सहा संस्थानांपैकीं एक,<br>१ औदारिकादि तीन शरीरांपैकीं एक<br>१ प्रत्येक साधारण पैकीं<br>१ उपघात<br>४ या चार प्रकृति जोडल्यानें २४ चें उदयस्थान होतें. या स्थानाचा उदय स्थावरजीवाच्या शरीरमिश्रकालांत होतो. |
| २५ | [४] | (१) वरील २४ प्रकृतींत १ परघातप्रकृति मिळविली म्हणजे २५ प्रकृति होतील. यांचा उदय एकेंद्रियाच्या शरीरपर्याप्ति कालांत होतो.<br>(२) वरील २४ त १ आहारक अंगोपांग मिळविल्यानें २५ प्रकृति होतील यांचा उदय आहारक शरीरधारी मुनींना आहारकमिश्रकालांत होतो.<br>[३] वरील २४ त वैक्रियिक अंगोपांग मिळविल्यानें २५ प्रकृतींचा उदय देव नारकी यांच्या शरीरमिश्रकालांत होतो.<br>विशेष—आहारक अंगोपांगाचा उदय होईल त्यावेळीं आहारक शरीराचा उदय होईल व वैक्रियिक अंगोपांगाच्या उदयकालांत वैक्रियिक शरीराचा उदय होईल. |
| २६ | [५] | [१] २५ प्रकृतींच्या पहिल्या प्रकारांत, आतप अथवा उद्योत मिळ-मिळविल्यानें २६ चा उदय एकेंद्रियाच्या शरीरपर्याप्ति कालांत होईल.<br>[२] त्याच २५ च्या पहिल्या प्रकारांत उच्छ्वासप्रकृति मिळविल्यानें २६ चा उदय एकेंद्रियाच्या उच्छ्वासपर्याप्तिकालांत होईल. |

| उदयस्थान | | विवरण |
|---|---|---|
| | | [३] २४ प्रकृतींच्या उदयस्थानांत १ औदारिक अंगोपांग व १ कोणतेंही संहनन मिळविल्यानें २६ चा उदय द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय तिर्यंच, सामान्य मनुष्य व निरतिशय सामान्य केवली [ कपाटयुगल समुद्घातांत ] या सर्वांना औदारिकमिश्रकालांत होईल. |
| २७ | [६] | (१] वरील २४ च्या स्थानांत १ आहारक अंगोपांग, १ परघात १ प्रशस्तविहायोगति या तीन प्रकृति मिळविल्यानें २७ चा उदय ६ व्या गुणस्थानांतील मुनींना आहारक शरीरपर्याप्तिकालांत होईल. |
| | | [२] २६ प्रकृतींच्या तिसऱ्या प्रकारांत समुद्घातकेवलींच्या २६ प्रकृतींत तीर्थंकर प्रकृति मिळविल्याने २७ चा उदय तीर्थंकर समुद्घात केवलींना कपाटद्वयाच्या औदारिकमिश्रकालांत होईल. |
| | | (३) वरील २४ च्या स्थानांत १ वैक्रियिक अंगोपांग, १ परघात १ अप्रशस्तविहायोगति [ नारकीयांत ] अथवा प्रशस्तविहायोगति [ देवांत ] मिळविल्यानें २७ चा उदय नारकी व देव यांना शरीरपर्याप्तिकालांत होईल. |
| | | (४) वरील २४ प्रकृतीत १ परघात, १ आतप किंवा उद्योत, १ उच्छ्वास या तीन प्रकृति मिळविल्यानें २७ चा उदय एकेंद्रियांना उच्छ्वासपर्याप्तिकालांत होईल. |
| २८ | [७] | [१] वरील २४ प्रकृतींत १ औदारिक अंगोपांग १ कोणतेंहि संहनन १परघात १प्रशस्त अथवा अप्रशस्त विहायोगति मिळविल्यानें २८ प्रकृतींचा उदय १ सामान्य मनुष्य, २ मूळ शरीरांत प्रवेश करतांना समुद्घातरूप सामान्य केवली, ३ द्वींद्रिय, ४ त्रींद्रिय, ५ चतुरिंद्रिय ६ पंचेंद्रिय तिर्यंच, या सर्वांना शरीरपर्याप्ति कालांत होईल. |
| | | [२] त्याच २४ त १ आहारक अंगोपांग, १ परघात, १ प्रशस्त विहायोगति, १ उच्छ्वास या चार प्रकृति मिळविल्यानें २८ प्रकृतींचा उदय आहारक शरीरधारी मुनींना उच्छ्वास पर्याप्तिकालांत होतो. |
| | | [३] वरील २४ त १ वैक्रियिक अंगोपांग, १ परघात, १ प्रशस्त अथवा अप्रशस्त विहायोगति, १ उच्छ्वास या चार प्रकृति मिळविल्यानें २८ चा उदय देव अथवा नारकी यांना उच्छ्वासपर्याप्तिकालांत होईल. |
| २९ | (८) | [१] २८ च्या पहिल्या प्रकारांत सामान्य मनुष्य व सामान्य समुद्घातकेवलींच्या २८ प्रकृतींच्या उदयस्थानांत उच्छ्वास प्रकृति |

| उदयस्थान | विवरण |
|---|---|
| | मिळविल्यानें २९ प्रकृतींचा उदय सामान्य मनुष्य व मूळ शरीरांत प्रवेश करणाऱ्या समुद्घात केवलीस उच्छ्वासपर्याप्तिकालांत होईल. |
| | [२] २४ च्या उदयस्थानांत १ उद्योत प्रकृति २ औदारिक अंगोपांग, ३ कोणतेंही एक संहनन, ४ परघात, ५ कोणतीही एक विहायोगति, या पांच प्रकृति मिळविल्यानें २९ प्रकृति होतात. यांचा उदय द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय, तिर्यंचाच्या शरीरपर्याप्ति कालांत होईल. |
| | [३] याच २४ त १ औदारिक अंगोपांग,२ कोणतेंही एक संहनन ३ परघात, ४ कोणतीही एक विहायोगति, ५ उच्छ्वास प्रकृति मिळविल्यानें २९ प्रकृति होतात. यांचा उदय द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय यांच्या उच्छ्वास पर्याप्तिकालांत होईल. |
| | [४] वरील २४ त १ औदारिक अंगोपांग, २ प्रथम संहनन, ३ परघात, ४ प्रशस्तविहायोगति, ५ तीर्थंकर प्रकृति या पांच प्रकृति मिळविल्यानें २९ प्रकृति होतात. यांचा उदय समुद्घात तीर्थंकर केवलींना शरीरपर्याप्तिकालांत होईल. |
| | (५) वरील २४ त १ आहारक अंगोपांग, २ परघात ३ प्रशस्त विहायोगति, ४ उच्छ्वास, ५ सुस्वर या प्रकृति मिळविल्यानें २९ प्रकृति होतात. यांचा उदय सहाव्या गुणस्थानांत आहारक शरीराच्या भाषापर्याप्तिकालांत होईल. |
| | (६) २८ च्या तिसऱ्या प्रकारच्या प्रकृतींत १ सुस्वर [ देवांत ] अथवा दुःस्वर [ नारकीयांत ] मिळविल्यानें २९ प्रकृति होतात. यांचा उदय देवांना किंवा नारकी यांना भाषापर्याप्ति कालांत होईल. |
| ३० (९) | [१] वरील २४ प्रकृतींत, १ औदारिक अंगोपांग २ कोणतेंही एक संहनन, ३ परघात, ४ कोणतीही एक विहायोगति, ५ उच्छ्वास, ६ उद्योत, या सहा प्रकृति मिळविल्यानें ३० प्रकृति होतात. यांचा उदय द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय यांच्या उच्छ्वासपर्याप्ति कालांत होईल. |

| उदयस्थान | | विवरण |
|---|---|---|
| | | [२] वरील ३० तीस प्रकृतींतून १ उद्योत प्रकृति कमी करून १ सुस्वर अथवा दुःस्वर मिळविल्यानें ३० प्रकृति होतात. यांचा उदय १ सामान्य मनुष्य, २ पंचेंद्रिय तिर्यंच, ३ विकलत्रय यांना भाषापर्याप्तिकालांत होतो. |
| | | [३] वरील २४ त १ औदारिक अंगोपांग, २ प्रथम संहनन ३ परघात, ४ प्रशस्तविहायोगति, ५ उच्छ्वास, ६ तीर्थंकर या प्रकृति मिळविल्यानें ३० प्रकृति होतात. यांचा उदय समुद्घात तीर्थंकर केवलींना उच्छ्वासपर्याप्तिकालांत होतो. |
| | | (४) तीस प्रकृतीच्या उदयस्थानांतील तिसऱ्या प्रकरांतून तीर्थंकर प्रकृति कमी करून दोन स्वरांपैकीं कोणताही एक स्वर मिळविल्यानें ३० प्रकृति होतात. यांचा उदय सामान्य समुद्घात केवलींच्या भाषापर्याप्तिकालांत होतो. |
| ३१ | (१०) | (१) ३० च्या ४ थ्या प्रकारांतील तीस प्रकृतींत तीर्थंकर प्रकृति मिळविल्यानें ३१ होतात. त्यांचा उदय तीर्थंकर केवलींना भाषापर्याप्तिकालांत होईल. |
| | | (२) वरील २४ प्रकृतींत १ औदारिक अंगोपांग, २ कोणतेंही एक संहनन, ३ परघात, ४ उद्योत ५ कोणतीही एक विहायोगति, ६ उच्छ्वास, ७ दोन स्वरांपैकीं एक अशा सात प्रकृति मिळविल्यानें ३१ प्रकृति होतात. त्यांचा उदय द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय, पंचेंद्रिय यांच्या भाषापर्याप्तिकालांत होईल. |
| ९ | (११) | १ मनुष्यगति, २ पंचेंद्रिय, ३ सुभग, ४ त्रस, ५ बादर ६ पर्याप्ति, ७ आदेय, ८ यश, ९ तीर्थंकर, या ९ प्रकृतींचा उदय तीर्थंकर अयोग केवलींना होईल. |
| ८ | (१२) | वरील प्रकृतींतून तीर्थंकर प्रकृति कमी केल्यानें ह्या आठ प्रकृति राहतात त्यांचा उदय सामान्य अयोगकेवलींना होतो. |

## नामकर्मांच्या उदयस्थानाचा काल व स्वामी यांचें [ कोष्टक नं. १७० ]

| स्वामी | एकेंद्रिय | देव | नारक | तिर्यंच | मनुष्य | सामान्य केवली | तीर्थंकर केवली | आहारक मुनि |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| काल भाषापर्याप्ति | ० | २९ प्र. ६ | २९ प्र. ६ | ३१प्र.२ ३०प्र.२ | ३०प्र.२ | ३०प्र.४ | ३१प्र १ | २९प्र.५ |
| उच्छ्वास पर्याप्ति | २७ प्रकार ४ था व २६ प्रकार २ रा | २८ प्र ३ | २८ प्र. ३ | ३० प्र. १ २९ प्र. ३ | २९ प्र. १ | २९ प्र. १ | ३० प्र. ३ | २८ प्र. २ |
| शरीरपर्याप्ति | २६चा प. प्रकार २५चा प. प्रकार | २७ प्र. ३ | २७ प्र. ३ | २९ प्र. २ २८ प्र. १ | २८ प्र. १ | २८ प्र. १ | २९ प्र. ४ | २७ प्र. १ |
| शरीरमिश्रपर्याप्ति | २४ | २५ प्र. ३ | २५ प्र. ३ | २६ प्र. ३ | २६ प्र. ३ | २६ प्र. ३ | २७ प्र. २ | २५ प्र. २ |
| विग्रहगति किंवा कार्मण | २१ | २१ | २१ | २१ | २१ | २० | २१ | ० |

### उदयस्थानाचे भंग.

**गाथा** ५९९—६ संस्थान × ६ संहनन × २ विहायोगति × २ सुभग दुर्भग × २ स्वर × २ आदेय × २ यश = ११५२ भंग संज्ञी, तिर्यंच व मनुष्यांच्या प्रकृति बदलण्यानें होऊं शकतील.

**गाथा** ६००—१ नारकी, २ साधारण वनस्पति, ३ सर्वसूक्ष्म ४ सर्वलब्ध्यपर्याप्तक या सर्वांना पांचही कालांत अप्रशस्त प्रकृतींचा उदय असतो म्हणून, यांच्या उदयस्थानांत १ एकच भंग होईल.

१ बाकीचें एकेंद्रिय, २ विकलत्रय, ३ असंज्ञी पंचेंद्रिय यांना इतर सर्व अप्रशस्त प्रकृतींचा उदय असतो; परंतु यश अयशाचा उदय विकल्पानें होतो म्हणून यांचे उदयस्थानांत भंग दोन दोन संभवतात.

**गाथा** ६०१-१ संज्ञीपंचेंद्रिय २ मनुष्य यांचे ५९९ गाथेंत सांगितल्याप्रमाणें ११५२ भंग संभवतात.

केवलज्ञानीमध्यें १ वज्रवृषभ नाराच संहनन, २ सुभग, ३ आदेय, ४ यशस्कीर्ति यांचाच उदय होतो, परंतु ६ संस्थान, २ विहायोगति, २ स्वर यांपैकीं एकेकाचा उदय विकल्पानें होतो ह्मणून ६×२×२ = २४ भंग होतात. तीर्थंकर केवलींत प्रथम शिवाय ५ संस्थान, १ अप्रशस्त विहायोगति, १ दुःस्वर यांचाही उदय होत नाहीं. सर्व प्रशस्त प्रकृतींचाच उदय होतो म्हणून यांचा उदयस्थानाचा एक एकच भंग होतो.

**गाथा** ६०२-४ प्रकारच्या देवांत व आहारकमुनींत प्रशस्त प्रकृतींचाच उदय होतो. ह्मणून यांच्या सर्वकालाच्या उदयस्थानांत एक एकच भंग होईल.

सासादन गुणस्थान व विग्रहगति यांत यथासंभव भंग समजावेत.

**गाथा** ६०३, ६०४, ६०५—

**एकेचाळीस जीवपदांच्या अपेक्षेनें २० आदि उदयस्थानाचे भंग सांगतात.**

## ( कोष्टक नं. १७१ )

| उदयस्थान | | भंगाचें विवरण | भंगसंख्या | |
|---|---|---|---|---|
| | | | आंतरभंग | सर्वभंग |
| २० | [१] | यांचा उदय सामान्य समुद्घात केवलींना प्रतरद्वय व लोकपूरण यांत कार्मणकालांत होतो. भंग एकच संभवनीय आहे. | १ | १ |
| २१ | (२) | १ देवगतीच्या विग्रहगतींत एकच १ भंग. | १ | |
| | | २ तीर्थंकर समुद्घात कार्मण कालांत भंग १ | १ | |
| | | ३ मनुष्यगतीच्या विग्रहगतींत, २ सुभग × २ आदेय × २ यश = ८ | ८ | |
| | | ४ संज्ञीपंचेंद्रिय तिर्यंचाच्या विग्रहगतींतही मनुष्याच्या प्रमाणें आठ भंग होतील. | ८ | |
| | | ५ द्वींद्रिय, त्रींद्रिय, चतुरिंद्रिय असंज्ञीपंचेंद्रिय या चौघांच्या विग्रहगतींत यश, अयशाच्या अपेक्षेनें दोन दोन भंग होतात. ह्मणून ४×२ = ८ | ८ | |
| | | ६ बादर-पृथ्वी, जल, तेज, वायु, प्रत्येकवनस्पति या पांचांचे विग्रहगतींत यशअयशाच्या अपेक्षेनें | | |

| उदयस्थान | भंगाचें विवरण | भंगसंख्या | |
|---|---|---|---|
| | | आतरभंग | सर्वभंग |
| | २–२ भंग होतात म्हणून ५×२ = १०' | १० | |
| | (७) सूक्ष्म पृथ्वी, जल, तेज, वायु, सूक्ष्म साधारण, बादर साधारण या ६ चा विग्रहगतींत एक एकच भंग होतो म्हणून ६×१ = ६ | ६ | |
| | (८) नारकीच्या विग्रहगतीत एकच भंग होतो. | १ | |
| | (९) सतरा प्रकारच्या [ पृथ्वी १ जल २ तेज ३ वायु ४ साधारण ५×२ बादर सूक्ष्म = १० + १ प्रत्येक वनस्पति ३ विकलत्रय, असंज्ञीपंचेंद्रिय १, संज्ञिपंचेंद्रिय तिर्यंच १, मनुष्य १ = १७) लब्ध्यपर्याप्तकांत एक एकच भंग आहे म्हणून १७ × १ = १७ | १७ | |
| | याप्रमाणें २१ व्या स्थानाचे ६० भंग होतात. | | ६० |
| २४ (३) | यांचा उदय खालील जीवांना शरीरमिश्रकालांत होतो. | | |
| | (१) बादर पृथ्वी, जल, तेज, वायु, प्रत्येक वनस्पती या पांचांत यश अयशाच्या विकल्पानें प्रत्येकाचे दोन भंग होतात म्हणून ५×२ = १० | १० | |
| | (२) सूक्ष्म पृथ्वी, जल, तेज, वायु, बादर साधारण, सूक्ष्म साधारण या सहा जीवांस एक एकच भंग होतो म्हणून ६ × १ = ६ | ६ | |
| | [३] लब्ध्यपर्याप्तक ११ एकेंद्रियांत एक एकच भंग होतो, म्हणून ११ × १ = ११ | ११ | २७ |
| २५ प्रकार ३<br>[४] ,, २ | [१] १ देव, २ नारक, ३ आहारकमुनि यांचा एक एकच भंग होतो. म्हणून ३×१ = ३ | ३ | |
| ,, प्रकार १ | [२] १ बादरपृथ्वी २ जल, ३ वायु, ४ प्रत्येक वनस्पति, तेज ५ या पांचाचे शरीरपर्याप्तिकालांत यश अयशाच्या विकल्पानें दोन दोन भंग होतात म्हणून ५ × २ = | १० | |
| | [३] १ सूक्ष्मपृथ्वी, २ जल, ३ तेज, ४ वायु, ५ बादर साधारण, ६ सूक्ष्मसाधारण यांचा एक | | |

| उदयस्थान | भंगाचे विवरण | भंगसंख्या आंतरभंग | सर्वभंग |
|---|---|---|---|
| | एकच भंग होतो म्हणून ६×१ — | ६ | १२ |
| २६ प्रकार ३ (५) | (१) १ द्वींद्रिय, २ त्रींद्रिय, ३ चतुरिंद्रिय, ४ असंज्ञी पंचेंद्रिय या चौघांस शरीरमिश्रकालांत यश अयशाच्या विकल्पानें दोन दोन भंग होतात म्हणून ४ × २ = | ८ | |
| | (२) १ संज्ञी तिर्यंच आणि २ मनुष्य × यांत ६ संहननें × ६ संस्थान × २ सुभग दुर्भग × २ आदेय अनादेय × २ यश अयश यांच्या अपेक्षेनें प्रत्येकाचे २८८×२ संज्ञी ति. मनुष्य= | ५७६ | |
| | [३] सामान्य समुद्घात केवलींना ६ संस्थानांच्या अपेक्षेनें = | ६ | |
| | [४] ६ लब्ध्यपर्याप्तक (३ विकलत्रय, १ असंज्ञी पंचेंद्रिय, १ संज्ञी पंचेंद्रियतिर्यंच, १ मनुष्य ) यांचा एक एक भंग होतो म्हणून ६×१ = | ६ | |
| प्र. १ | [५] शरीरपर्याप्तिकालांत बादरपृथ्वीकायांत आतप किंवा उद्योत प्रकृतीच्या अपेक्षेनें दोन उदयस्थानें आहेत. यांचे यश अयशाच्या विकल्पानें २-२ भंग होतात म्हणून २×२ | ४ | |
| | (६) बादरजलकाय आणि प्रत्येक वनस्पति यांत यश अयशाच्या अपेक्षेनें दोन दोन भंग होतात२×२= | ४ | |
| प्र. २ | [७] उच्छ्वास पर्याप्तिकालांत १ बादर पृथ्वी, २ जल ३ तेज, ४ वायु, ५ प्रत्येक वनस्पति यांत यश-अयशाच्या विकल्पनें दोन दोन भंग होतात ५×२ | १० | |
| | [८] सूक्ष्म पृथ्वी १, जल २, तेज ३, वायु ४, बादर साधारण ५, सूक्ष्म साधारण ६ या सहांचा एक एक भंग होतो म्हणून ६×१ = | ६ | ६२० |
| २७ प्र. २ [६] | [१] शरीरमिश्रकालांत तीर्थंकर समुद्घात केवलींचा एक भंग होतो. | १ | |
| प्र. १; २ | (२) देव, नारक, आहारकमुनि यांचा शरीरपर्याप्ति कालांत एक एक भंग होतो म्हणून ३×१ = | ३ | |

| उदयस्थान | भंगाचें विवरण. | भंगसंख्या. | |
|---|---|---|---|
| | | आंतरभंग | सर्वभंग |
| ३१प्र. १ (१०) | (१) भाषापर्याप्तीमध्यें तीर्थंकराचा एक भंग. | १ | |
| प्र. २ | (२) भाषापर्याप्तींत संज्ञिपंचेंद्रिय–तिर्यंचाला उद्योतसहित अवस्थेंत वर लिहिल्याप्रमाणें भंग. | ११५२ | |
| | (३) भाषापर्याप्तींत द्वींद्रियापासून असंज्ञीपंचेंद्रियापर्यंत चार जीवांचे उद्योतसहित अवस्थेंत यशअयशाच्या अपेक्षेनें दोन दोन भंग होतील म्हणून ४ × २ | ८ | ११६१ |
| ९ (११) | [१] तीर्थंकरसहित अयोगकेवलींत एक भंग होतो | १ | १ |
| ८ (१२) | [१] तीर्थंकररहित अयोगकेवलींत एक भंग होतो | १ | १ |
| | | | ७७५८ |

नामकर्माच्या बारा उदयस्थानाचे सर्वभंग ७७५८ होतात.

## नामकर्माची उदयस्थानें व प्रकृति.

| उदयस्थान | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रकृति | २० | २१ | २४ | २५ | २६ | २७ | २८ | २९ | ३० | ३१ | ९ | ८ |

**गाथा** ६०६–भाषापर्याप्तिकालांत सामान्यकेवली व समुद्घातसहित सामान्यकेवली यांच्या ३० प्रकृतींच्या उदयस्थानांत चोवीस चोवीस भंग समान होतात. आणि तीर्थंकरकेवली व समुद्घाततीर्थंकर–केवली यांच्या ३१ प्रकृतींच्या उदयस्थानांत एक एक भंग समान होतात म्हणून २४+१=२५ हे भंग पुनरुक्त होतात म्हणून मागील गणतींत ते घातले नाहीत.

**गाथा** ६०७–नारक, संज्ञी तिर्यंच, मनुष्य, देव या चौघांचे सासादनादि गुणस्थानांत जे भंग होतात ते मिथ्यात्वगुणस्थानाच्या भंगासारखेच आहेत, म्हणून ते पुनरुक्त भंग कमी करून मिथ्यात्वादिगुणस्थानाचे भंग गणतींत धरावेत.

## गुणस्थानापेक्षेनें उदयस्थानाच्या अपेक्षेनें (कोष्टक १७२)

| गुणस्थान | उदयस्थान | | भंगसंख्या | विशेष. |
|---|---|---|---|---|
| | प्रकृति | प्रकार | | |
| १ मिथ्यात्व | २१ | ० | ५९ | पूर्वी सांगितल्याप्रमाणें भंग ६० उणा १ भंग तीर्थंकर संबंधी. |
| ,, | २४ | ० | २७ | |

| गुणस्थान | उदयस्थान प्रकृति | प्रकार | भंगसंख्या | विशेष. |
|---|---|---|---|---|
| | २५ | १,२,३ | १८ | एकंदर भंग १९—१ आहारकमुनीचा शरीरमिश्रकाल संबंधीं. |
| | २६ | १,२,३ | ६१४ | एकंदर भंग ६२० उणे ६ समुद्घात-केवली संबंधीं. |
| | २७ | ३,४ | १० | एकंदर भंग १२—२ आहारकमुनि व तीर्थंकरसंबंधी. |
| | २८ | १,३ | ११६२ | एकंदर ११७५—१३ सामान्यकेवली व आहारकमुनीसंबंधीं. |
| | २९ | १,२,३,६ | १७४६ | एकंदर भंग १७६०—१४ (१२ सामान्यकेवलीचे व १ तीर्थंकर, १आहारकमुनि) |
| | ३० | १,२ | २८९६ | एकंदर २९२१—२५ ( सामान्यकेवलीचे २४ व तीर्थंकर १. ) |
| | ३१ | २ | ११६० | एकंदर ११६१—१ तीर्थंकर |
| | | | ७६९२ | |

| गुणस्थान | उदयस्थान | प्रकार | आंतरभंग | भंगसंख्या | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| २ सासादन | २१ | ० | ६ | | (१) बादरपृथ्वी, जल, ३प्रत्येकवनस्पति यांचे १यश, २अयशाच्या अपेक्षेनें ६भंग होतात. |
| | | | ८ | | (२)द्वींद्रिय ते असंज्ञीपंचेंद्रिय या चार जीवांचे यश अयशाच्या अपेक्षेनें ८ भंग होतात. |
| | | | ८ | | (३)१संज्ञीपंचेंद्रिय तिर्यंच×२सुभग×२आदेय ×२यश यांच्या अपेक्षेनें आठ भंग होतात. |
| | | | ८ | | (४) मनुष्याचेंही संज्ञीपंचेंद्रियाप्रमाणें ८ भंग होतात. |
| | | | १ | | (५) देवगतीचा भंग एक. |
| | | | ३१ | ३१ | हे सर्वभंग मिथ्यात्वगुणस्थानांत गर्भित आहेत. |
| | २४ | | | ६ | शरीर मिश्रकालांत बादरपृथ्वी, जल, प्रत्येक वनस्पति यांचे यश अयशाच्या अपेक्षेनें ६ भंग होतात. ( हे भंग मिथ्यात्व गुणस्थानांत गर्भित आहेत. ) |

| गुणस्थान | उदयस्थान प्रकृति | उदयस्थान प्रकार | अंतरभंग | भंगसंख्या | विशेष |
|---|---|---|---|---|---|
| | २५ | ३ | | १ | शरीरमिश्रकालांत देवांच्या अपेक्षेनें. |
| | २६ | ३ | ८ | | शरीरमिश्रकालांत द्वींद्रियांपासून असंज्ञीपंचेंद्रियापर्यंत २ यशाच्या अपेक्षेनें. |
| | | | ५७६ / ५८४ | ५८४ | शरीर मिश्रकालांत संज्ञीपंचेंद्रिय, तिर्यंच, व मनुष्य यांचे मिथ्यात्व गुणस्थानांत सांगितल्याप्रमाणें. |
| | २९ | ६ | | २ | देव, नारकांच्या भाषापर्याप्तिकालांत २७-२८ च्या उदयस्थानाचें भंग येथें दाखविले नाहींत. कारण, शरीर पर्याप्ति आदिकालांत एकेंद्रियांत सासादनगुणस्थान नसतें. |
| | ३० | २ | | २३०४ | भाषापर्याप्तिकालांत संज्ञीतिर्यंच व मनुष्य यांचे मिथ्यात्व गुणस्थानाप्रमाणें प्रत्येकीं ११५२ |
| | ३१ | २ | | ११५२ | भाषापर्याप्तींत संज्ञीपचेंद्रिय तिर्यंचाचे उद्योतयुत मिथ्यात्व गुणस्थानाप्रमाणें. |
| | | | | ४०८० | हे सर्व मिथ्यात्वांत गर्भित आहेत. |
| ३ मिश्र | २९ | ६ | | २ | भाषापर्याप्तिकालांत देव,नारक,यांचा १ भंग होतो. |
| | ३० | २ | | २३०४ | भाषापर्याप्तींत संज्ञीपंचेंद्रिय, तिर्यंच व मनुष्य यांचे मिथ्यात्व गुणस्थाना प्रमाणें. |
| | ३१ | २ | | ११५२ | भाषापर्याप्तींत संज्ञीपंचेंद्रिय, तिर्यंच उद्योतसहित यांचे मिथ्यात्वगुणस्थानाप्रमाणें. |
| | | | | ३४५८ | |
| असंयत | २१ | ० | | ४ | चार गतींच्या अपेक्षेनें एक एक भंग. |
| | २५ | ३ | | २ | शरीर मिश्रकालांत पहिल्या नरकांत व वैमानिकदेवांत प्रत्येकाचा एक एक भंग. |

| गुणस्थान | उदयस्थान | | आंतरभंग | भंगसंख्या | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| | प्रकृति | प्रकार | | | |
| | २६ | ३ | १ | | शरीरमिश्रकालांत भोगभूमींतील तिर्यंचाचा एक भंग. |
| | | ३ | ३६ | | कर्मभूमींतीलें संज्ञी (मनुष्य) यांचे शरीरमिश्रकालांत ६ संस्थान × ६ संहनन या अपेक्षेनें. |
| | | | ३७ | ३७ | |
| | २७ | ३ | | २ | शरीरपर्याप्तिंत पहिला नरक व वैमानिक देव यांत एक एक भंग. |
| | २८ | १ | १ | | शरीरपर्याप्तींत भोगभूमीमध्यें भंग १ |
| | | ३ | २ | | उच्छ्वासपर्याप्तींत पहिला नरक व वैमानिक देव यांत एक एक. |
| | | १ | ७२ | | शरीरपर्याप्तींत मनुष्यांचीं ६ संस्थानें व सहा संहनन व २ विहायोगति यांच्या अपेक्षेनें |
| | | | ७५ | ७५ | |
| | २९ | १,३ | २ | | उच्छ्वासपर्याप्तींत तिर्यंच आणि मनुष्य यांचा एक एक भंग होतो. [ भोगभूमींत ] |
| | | ६ | २ | | भाषापर्याप्तींत देव व नारक यांचा एक एक भंग होतो, |
| | | १ | ७२ | | उच्छ्वासपर्याप्तींत कर्मभूमींतील मनुष्याचे ६ संस्थान × ६ संहनन ×२ विहायोगति असे ७२ भंग होतात. |
| | | | ७६ | ७६ | |
| | ३० | १ | १ | | उच्छ्वासपर्याप्तींत भोगभूमींतील तिर्यंचाचा उद्योतसहित अवस्थेंत एक भंग होतो. |
| | | २ | २३०४ | | भाषापर्याप्तींत संज्ञी पंचेंद्रिय, तिर्यंच व मनुष्य यांचे वर सांगितल्याप्रमाणें प्रत्येकाचे ११५२ भंग होतात. |
| | | | २३०५ | २३०५ | |
| | ३१ | २ | | ११५२ | भाषापर्याप्तींत संज्ञी पंचेंद्रिय तिर्यंचाचे उद्योतसहित मागें लिहिल्या प्रमाणें. |
| | | | | ३६५३ | |

| गुणस्थान | उदयस्थान प्रकृति | उदयस्थान प्रकार | आंतरभंग | भंगसंख्या | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| ५ देशविरत | ३० | २ | | २८८ | भाषापर्याप्तींत संज्ञी पंचेंद्रिय तिर्यंच व मनुष्याचे ६ संस्थान × ६ संहनन × २ विहायोगति × २ स्वर मिळून प्रत्येकाचे १४४ भंग होतील. |
| | ३१ | २ | | १४४ | भाषापर्याप्तींत संज्ञी पंचेंद्रिय तिर्यंचाचे उद्योतसहित वर लिहिल्याप्रमाणें |
| | | | | ४३२ | |
| ६ प्रमत्त | २५ | २ | | १ | १ शरीरमिश्रांत आहारकमुनीचा |
| | २७ | १ | | १ | शरीरपर्याप्तींत ,, ,, |
| | २८ | २ | | १ | उच्छ्वास पर्याप्तींत ,, ,, |
| | २९ | ६ | | १ | भाषापर्याप्तींत ,, ,, |
| | ३० | २ | | १४४ | ,, सामान्यमुनींचे ६ संस्थान × ६ संहनन × २ विहायोगति × २ स्वर या अपेक्षेनें |
| | | | | १४८ | |
| ७ अप्रमत्त | ३० | २ | | १४४ | भाषापर्याप्तींत सामान्यमुनींचे ६ व्या गुणस्थानाप्रमाणें. |
| ८ अपूर्वकरण उपशमक | ३० | २ | | ७२ | भाषापर्याप्तींत मुनींचे ६ संस्थान × ३ संहनन × २ विहायोगति × २ स्वर या अपेक्षेनें |
| ९ अनि. उप. | ३० | २ | | ७२ | वरील प्रमाणें |
| १० सूक्ष्म. उप. | ३० | २ | | ७२ | ,, |
| ११ उप. मोह | ३० | २ | | ७२ | ,, |
| ८ अपूर्वक्षपक | ३० | २ | | २४ | भाषापर्याप्तींत मुनींचे ६ संस्थान × १ संहनन × २ विहायोगति × २ स्वर या अपेक्षेनें. |
| ९ अनि. क्षपक | ३० | २ | | २४ | वरील प्रमाणें |
| १० सूक्ष्म क्षपक | ३० | २ | | २४ | ,, |
| १२ क्षीणमोह | ३० | २ | | २४ | ,, |
| १३ सयोग केवली | २० | ० | ० | १ | समुद्घात सामान्यकेवलींना कार्मण योगांत. |

| गुणस्थान | उदयस्थान प्रकृति | प्रकार | आंतरभंग | भंगसंख्या. | विशेष. |
|---|---|---|---|---|---|
| | २१ | ० | | १ | समुद्घात तीर्थकर केवलीचा कार्मण योगांत. |
| | २६ | ३ | | ६ | औदारिकमिश्रांत सामान्य केवलीचे ६ संस्थानाच्या अपेक्षेनें. |
| | २७ | २ | | १ | औदारिकमिश्रकालांत तीर्थकराचा. |
| | २८ | १ | | १२ | शरीरपर्याप्तींत सामान्य केवलीचे ६ संस्थान × २ विहायोगति. |
| | २९ | ४ | १ | | शरीपर्याप्तींत तीर्थंकराचा |
| | २९ | १ | १२ | | उच्छ्वासपर्याप्तींत सामान्य केवलीचे |
| | | | १३ | १३ | ६ संस्थान × २ विहायोगति. |
| | ३० | ३ | १ | | उच्छ्वासपर्याप्तींत तीर्थंकरांचा. |
| | ३० | ४ | २४ | | भाषापर्याप्तींत सामान्यकेवलीचे ६ |
| | | | २५ | २५ | संस्थान ×२ विहायोगति×२ स्वर. |
| | ३१ | १ | | १ | भाषापर्याप्तींत तीर्थंकराचा. |
| | | | | ६० | |
| १४ अयोग- | ९ | | ० | १ | अयोगीचा |
| केवली | ८ | | | १ | |
| | | | | २ | ,, |

## अपुनरुक्तभंग

४ सहाव्या गुणस्थानांतील आहारकमुनींचे
६० तेराव्या गुणस्थानांतील सयोग केवलीचे
२ चौदाव्या गुणस्थानांतील अयोगकेवलीचे
७६९२ मिथ्यात्व गुणस्थानांतील
७७५८

याशिवाय बाकीचे गुणस्थानांत दाखविलेले भंग मिथ्यात्वगुणस्थानाच्या भंगांत गर्भित आहेत.

**गाथा** ६०८—श्रीवर्धमानस्वामीनीं नामकर्माच्या १२ उदयस्थानांत अपुनरुक्तभंग ७७५८ सांगितले आहेत.

**—— नामकर्माच्या उदयस्थानाचें प्रकरण समाप्त.**

# नामकर्माच्या सत्वस्थानाचें प्रकरण.

## सत्वस्थानाचें प्रकरण.

गाथा ६०९— नामकर्माची सत्वस्थानें १३ होतात.

| नंबर | प्रकृति | नंबर | प्रकृति |
|---|---|---|---|
| १ | ९३ | ८ | ८० |
| २ | ९२ | ९ | ७९ |
| ३ | ९१ | १० | ७८ |
| ४ | ९० | ११ | ७७ |
| ५ | ८८ | १२ | १० |
| ६ | ८४ | १३ | ९ |
| ७ | ८२ | | |

**गाथा ६१०, ६११—नामकर्माच्या १३ सत्वस्थानाचें विवरण.**

**( कोष्टक नं. १७३ )**

| नंबर | सत्वस्थानें | विवरण |
|---|---|---|
| १ | ९३ | नामकर्माच्या सर्व प्रकृति असतात. |
| २ | ९२ | ९३—१ तीर्थंकर प्रकृति. |
| ३ | ९१ | ९३—२ आहारकद्विक. |
| ४ | ९० | ९३—१ तीर्थंकर + २ आहारकद्विक. |
| ५ | ८८ | ९३—१ तीर्थंकर, २ आहारद्विक, २ देवद्विक(उद्वेलना झाल्यास) |
| ६ | ८४ | ८८—४ नारक चतुष्क (१ नरकगति, २ नरकगत्यानुपूर्वी, ३ वैक्रियिक शरीर ४ वैक्रियिक अंगोपांग] यांची उद्वेलना झाल्यास |
| ७ | ८२ | ८४—२ मनुष्यद्विक ( उद्वेलना झाल्यास ) |
| ८ | ८० | ९३—१३ [ नारकद्विक, तिर्यंचद्विक, विकलत्रय, उद्योत, आतप एकेंद्रिय, साधारण, सूक्ष्म, स्थावर यांचा क्षय ९ व्या गुणस्थानांत होतो. |
| ९ | ७९ | ८०—१ तीर्थंकर |
| १० | ७८ | ८०—२ आहारकद्विक. |
| ११ | ७७ | ८०–१ तीर्थंकर, २ आहारकद्विक. |
| १२ | १० | २ मनुष्यद्विक, १ पंचेंद्रिय, १ सुभग, १ त्रस, १ बादर, १ १ पर्याप्त १ आदेय, १ यश, १ तीर्थंकर यांची सत्ता १४ व्या गुणस्थानाच्या अंतांपर्यंत असते. |
| १३ | ९ | १०—१ तीर्थंकर. |

**गाथा ६१२–उद्वेलनेचीं स्थानें व त्यांचे काल**–( गाथा ४१३ ते ४१५ पहा )

मिथ्यात्वगुणस्थानांत १ सम्यक्त्वमोहनीय, १ सम्यङ्मिथ्यात्व २ आहारकद्विक या चार प्रकृतींची उद्वेलना होते. यांचा बंध किंवा उदय या गुणस्थानांत होत नाहीं. बाकीच्या ९ प्रकृतींचीही उद्वेलना याच गुणस्थानांत होते.

**उद्वेलनप्रकृति १३ आहेत** [ गाथा ४१५ पाहा ]

**गाथा** ६१३–आहारकद्विक ही प्रकृति प्रशस्त आहे म्हणून चारही गतींतील मिथ्यादृष्टि जीव प्रथम आहारकद्विकाची उद्वेलना करतात; नंतर, सम्यक्त्वमोहनीयाची, नंतर सम्यङ्मिथ्यात्वाची, त्यानंतर, २ देवद्विक, २ नरकद्विक, २ वैक्रियिकद्विक, १ उच्चगोत्र, २ मनुष्यद्विक या ९ प्रकृतींची उद्वेलना एकेंद्रिय, विकलत्रय किंवा पंचेंद्रिय करितात.

**गाथा** ६१४–वेदकयोग्यकालांत आहारकद्विकाची उद्वेलना होते. उपशम कालांत सम्यक्त्व प्रकृति व सम्यङ्मिथ्यात्व प्रकृतीची उद्वेलना होते. एकेंद्रिय व विकलत्रय जीव, वैक्रियिकषट्काची उद्वेलना करतात.

**गाथा** ६१५–सम्यक्त्वमोहनीय, व मिश्रमोहनीय या दोन प्रकृतींची सत्तारूप स्थिति त्रसजीवांत पृथक्त्वसागर–प्रमाण शिल्लक राहील; व एकेंद्रियांत १ सागराला पल्याचा असंख्याताचा भाग कमी इतकी शिल्लक राहील तों पर्यंतचा काल **वेदकयोग्य-काल** ह्मटला जातो; व याहून ज्याची स्थिति कमी असते त्यांस **उपशमयोग्य काळ** म्हणतात.

**गाथा** ६१६–तेजस्कायिक, वायुकायिक जीवांत २ मनुष्यद्विक व उच्चगोत्र १ या तीन प्रकृतींची उद्वेलना होते.

उद्वेलना करण्याचा काल जघन्य किंवा उत्कृष्ट पल्याच्या असंख्याताच्या भागा इतका आहे. ह्मणजे इतक्या कालांत त्या तीन प्रकृतींच्या निषेकांचें उद्वेलन होईल.

**गाथा** ६१७–पल्याच्या असंख्याताच्या भागा इतकी ज्याची स्थिति आहे त्या सत्तारूपस्थितीची उद्वेलना एक अंतर्मुहूर्तांत होते, तर संख्यात सागराइतक्या सत्तारूप स्थितीची उद्वेलना किती कालांत होईल ? असा प्रश्न केल्यास त्याचें उत्तर पल्याच्या असंख्याताच्या भागांत होईल हें होय. म्हणजे, त्या उद्वेलनास पल्याचा असंख्याताचा भाग लागेल.

**सम्यक्त्वादिकांची विराधना किती वेळां होईल.**

**गाथा** ६१८–प्रथमोपशमसम्यक्त्व, वेदकसम्यक्त्व, देशसंयम व अनंतानुबंधीचें विसंयोजन या चार अवस्थांस एकजीव उत्कृष्टपणें पल्याच्या असंख्याताच्या भागाचे जितके

समय होतात तितके वेळां सोड सोडून पुन्हां ग्रहण करूं शकेल, नंतर अवश्य सिद्धपदाची त्यास प्राप्ति होईल.

**गाथा ६१९**–एकजीव अधिकांत अधिक चारच वेळां उपशमश्रेणी चढूं शकतो नंतर, क्षपकश्रेणी चढून तो मोक्षास जाईल. एक जीव अधिकांत अधिक सकल संयम ३२ वेळांच धारण करूं शकेल. पुढें तो मोक्षास जाईल.

**विशेष गाथा १**–मिथ्यात्वगुणस्थानांत एका जीवांत तीर्थंकर प्रकृति व आहारक-द्विक यांची युगपत् सत्ता असूं शकणार नाहीं; परंतु भिन्नभिन्न जीवांत तीर्थंकर अथवा आहारकद्विक यांची सत्ता संभवनीय आहे. कारण ज्या जीवांत तीर्थंकर व आहारकद्विक यांची सत्ता युगपत् असेल तो मिथ्यात्वगुणस्थानांत जाणार नाहीं. सासादनगुणस्थानांत तीर्थंकर व आहारकद्विक या प्रकृतींची सत्ता नसते कारण ज्या जीवांत तीर्थंकर किंवा आहारकद्विकांची सत्ता असेल त्यास मिथ्यात्वरहित अनंतानुबंधीचा उदय होणार नाहीं.

मिश्रगुणस्थानांत तीर्थंकरप्रकृति व आहारकद्विक यांची सत्ता नसते.

## गाथा ६२०–६२१–६२२—चार गतींत नामकर्माचें सत्वस्थान.

## ( कोष्टक नं. १७४ )

| सत्त्वस्थानाचा नंबर. | सत्त्वस्थानाच्या प्रकृति. | कोणत्या गतींत व कोणत्या अवस्थेंत या प्रकृतींचें सत्त्व असेल. |
|---|---|---|
| १ | ९३ | देव ( असंयतसम्यग्दृष्टि ), असंयतादिसम्यग्दृष्टि मनुष्य, यांत. |
| २ | ९२ | सासादन गुणस्थान सोडून चारही गतींत. |
| ३ | ९१ | सम्यग्दृष्टिदेव, सम्यग्दृष्टि अथवा मिथ्यादृष्टि मनुष्य किंवा नरक यांत |
| ४ | ९० | ९व्या गुणस्थानांत १३ प्रकृतींचा क्षय होतो. त्यापूर्वीच्या गुणस्थानांत चार ही गतीमध्यें ९० प्रकृतींचें सत्त्व संभवतें. |
| ५ | ८८ | मिथ्यादृष्टितिर्यंच अथवा मनुष्यांत. |
| ६ | ८४ | मिथ्यादृष्टितिर्यंच अथवा मनुष्यांत. |
| ७ | ८२ | मिथ्यादृष्टितिर्यंचांत. |

| सत्त्वस्थाना-चा नंबर. | सत्त्वस्थाना-च्या प्रकृति | कोणत्या गतींत व कोणत्या अवस्थेंत या प्रकृतींचें सत्त्व असेल. |
|---|---|---|
| ८ | ८० | ९ व्या गुणस्थानांत १३ प्रकृतींचा क्षय होतो. तेथपासून अयोगकेवलीच्या द्विचरमसमयापर्यंत. |
| ९ | ७९ | |
| १० | ७८ | |
| ११ | ७७ | |
| १२ | १० | अयोगीच्या अंतसमयांत. |
| १३ | ९ | |

**गाथा** ६२३–नारकजीवांत ९२, ९१, ९० हीं तीन सत्त्वस्थानें असतात.

पृथ्वीकायादि सर्व तिर्यंचांत ९२-९०-८८-८४-८२ हीं पंचसत्त्वस्थानें असतात.

**गाथा** ६२४–मनुष्यांत ८२प्रकृतींचें सत्त्वस्थान सोडून बाकीचीं १२सत्त्वस्थानें असतात.

सयोगकेवलींत ८०-७९-७८-७७ हीं चार स्थानें असतात.

अयोगकेवलींत ८०-७९-७८-७७-१०-९ हीं ६ स्थानें असतात.

**गाथा** ६२५–तीर्थंकर–सयोगकेवलींत ८०-७८ हीं दोन स्थानें असतात.

तीर्थंकर अयोगकेवलींत ८०-७८-१० हीं ३ स्थानें असतात.

सामान्य सयोगकेवलींत ७९-७७ हीं २ स्थानें असतात.

सामान्य अयोगकेवलींत ७९-७७-९ हीं ३ स्थानें असतात.

आहारकमुनींत ९३-९२ हीं २ सत्त्वस्थानें असतात.

वैमानिक देवांत ९३-९२-९१-९० हीं चार स्थानें असतात.

**गाथा** ६२६–भवनत्रिक देवांत, सर्वभोगभूमींतील मनुष्य-तिर्यंचांत व ४-५-६-७ या नरकांत ९२-९० हीं २ सत्त्वस्थानें असतात.

सासादन गुणस्थानांतील सर्व जीवांत ९० चें सत्त्वस्थान असतें.

## [ कोष्टक नं. १७५ ]

नरकगतींत सत्त्वस्थानें

| गुणस्थान | सत्त्वस्थान |
|---|---|
| १ | ९२, ९१, ९० |
| २ | ९० |
| ३ | ९२, ९० |
| ४ | ९२–९१–९० |

## [ कोष्टक नं. १७६ ]

देवगतींत सत्त्वस्थानें

| गुणस्थान | सत्त्वस्थान |
|---|---|
| १ | ९२, ९० |
| २ | ९० |
| ३ | ९२, ९० |
| ४ | ९३, ९२, ९१, ९० |

## [ कोष्टक नं. १७७. ]

तिर्यंचगतींत सत्त्वस्थानें

| गुणस्थान | सत्त्वस्थान |
|---|---|
| १ | ९२—९०—८८ —८४—८२ |
| २ | ९० |
| ३ | ९२—९० |
| ४ | ९२—९० |
| ५ | ९२—९० |

## मनुष्यगतींत सत्त्वस्थानें ( कोष्टक नं. १७८. )

| गुणस्थान | सत्त्वस्थान |
|---|---|
| १ | ९२—९१—९०—८८—८४ |
| २ | ९० |
| ३ | ९२—९० |
| ४ | ९३—९२—९१—९० |
| ५ | ९३—९२—९१—९० |
| ६ | ९३-९२—९१-९० |
| ७ | ९३—९२—९१—९० |
| ८उपशामक | ९३—९२—९१—९० |

चारही गतीच्या सत्व-स्थानाची कोष्टकें चार वेगवेगळीं दाखविलीं; परंतु चारही गतींचीं सत्वस्थानें एके ठिकाणीं गुणस्थानापेक्षेनें दाखविल्यास मिथ्यात्व गुणस्थानांत ८२चें सत्वस्थानही दाखवावें लागेल, व

| गुणस्थान | सत्वस्थान | बाकीचीं सत्त्वस्थानें मनुष्यगतींतील सत्त्वस्थानाप्रमाणेंच राहतील. |
|---|---|---|
| ,, क्षपक | ९३-९२-९१-९० | |
| ९उपशमक | ९३-९२-९१-९० | |
| ,, क्षपक | ९३-९२-९१-९०-८०-७९-७८-७७ | |
| १०उपशम. | ९३-९२-९१-९० | |
| ,, क्षपक | ८०-७९-७८-७७ | |
| ११ | ९३-९२-९१-९० | |
| १२ | ८०-७९-७८-७७ | |
| १३ | ८०-७९-७८-७७ | |
| १४ द्विचरम | ८०-७९-७८-७७ | |
| ,, चरम | १०—९ | |

**गाथा ६२७**–मूळ व उत्तर प्रकृतींचीं बंध उदय व सत्त्वस्थानें व भंग मागें सांगितले. आतां पुढें बंध, उदय, सत्त्व या तिहींच्या संयोगांत स्थानें व भंग सांगतील.

**मूळ आठ कर्मांच्या अपेक्षेनें त्रिसंयोगांत स्थान व भंग.**

**गाथा ६२८**–जिथें ८-७ किंवा ६ प्रकृतींचा बंध होईल तिथें उदय व सत्त्व आठही प्रकृतींचें राहील.

जिथें १ प्रकृतीचा बंध होईल तिथें उदय ७ प्रकृतींचा व सत्त्व ८ प्रकृतींचें असेल किंवा उदय व सत्व ७ प्रकृतींचेंच किंवा उदय ४ चा व सत्त्व ४ चें राहील; व जिथें एकाही प्रकृतीचा बंध होणार नाहीं तिथें उदय व सत्व चार चार प्रकृतीचें राहील.

**मूळ प्रकृतीच्या बंध, उदय, सत्त्वस्थानाचें ( कोष्टक नं. १७९ )**

| बंध | ८ मूळ प्रकृतीचा | ७मूळ प्र.चा (१ आयुकमी) | ६ मूळ प्र. चा ( आयु, मोह कमी ) | मूळ प्र. चा १सातावेदनीय | मूळ प्र. चा १सातावेदनीय | मूळ प्र. चा १साता | मूळ प्र. चा ० |
|---|---|---|---|---|---|---|---|
| उदय | ८ मूळ प्र. चा | ८मूळ प्र.चा | ८मूळ प्र.चा | ७मूळ प्र. चा [मोहकमी] | ७मूळ प्र.चा (मोह नाहीं) | मूळ प्र. चा ४ अघाति | मूळ प्र. चा ४ अघाति |
| सत्व | ८ मूळ प्र.चें | ८मूळ प्र. चें | ८मूळ प्र. चें | ८मूळ प्र. चें | मूळ प्र.चें ७ (मोह विना) | मूळ प्र. चें ४ अघाति | मूळ प्र. चें ४ अघाति |

**गाथा ६२९-** **गुणस्थानापेक्षया त्रिसंयोगी भंग.**

**गुणस्थानापेक्षया ८ मूळ प्रकृतींच्या बंध उदय सत्वाचें [ कोष्टक १८० ]**

| गुणस्थान | मिथ्यात्व १ | | सासादन २ | | मिश्र ३ | असंयत ४ | | देशसंयत ५ | | प्रमत्त ६ | | अप्रमत्त ७ | | अपूर्व ८ | अनिवृत्ति ९ | सूक्ष्म १० | उपशांत ११ | क्षीण १२ | सयोग १३ | अयोग १४ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बंध | ८ | ७ | ८ | ७ | ७ | ८ | ७ | ८ | ७ | ८ | ७ | ८ | ७ | ७ | ७ | ६ | १ | १ | १ | ० |
| उदय | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ७ | ४ | ४ |
| सत्व | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ७ | ४ | ४ |

**नोटः—एका गुणस्थानांतच ८ व ७ हे दोन अंक लिहिले आहेत. त्याचा अर्थ ८ म्हणजे आयुसहित व ७ म्हणजे आयुविना.**

**उत्तर प्रकृतींच्या बंध उदयसत्त्वांचें वर्णन.**

**गाथा ६३०**-ज्ञानावरणाच्या ५ प्रकृति व अंतरायाच्या ५ प्रकृति या दोहींचा बंध, उदय व सत्त्व हीं १० व्या गुणस्थानापर्यंत राहतात.

या प्रकृतींचा बंध ११-१२ व्या गुणस्थानांत होत नाहीं; परंतु उदय व सत्व वरील १० ही प्रकृतींचें १२ व्या गुणस्थानापर्यंत असतें.

**ज्ञानावरण व अंतराय यांच्या उत्तर प्रकृतींचें गुणस्थानापेक्षेनें बंध, उदय व सत्त्व यांचें ( कोष्टक नं. १८१. )**

| गुण. | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बंध | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ० | ० |
| उदय | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |
| सत्व | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ | ५ |

**गाथा ६३१-६३२**--दर्शनावरणाच्या ९ प्रकृतींचा बंध पहिल्या व दुसऱ्या गुणस्थानांत होईल. त्यावेळीं उदय ४ किंवा ५ प्रकृतींचा व सत्त्व ९ प्रकृतींचें असतें.

४ चा उदय म्हणजे चक्षु, अचक्षु, अवधि व केवलदर्शनावरण यांचा उदय समजावा व ५ चा उदय म्हणजे १ निद्रा अधिक समजावी.

६ प्रकृतींचा [ ९--३ स्त्यानगृद्धि, प्रचलाप्रचला, निद्रानिद्रा ] बंध मिश्रगुणस्थानापासून अपूर्व करणाच्या प्रथम भागापर्यंत दोन्ही श्रेणींत होईल. त्यावेळीं उदय ४ किंवा ५ प्रकृतींचा [ वर लिहिल्याप्रमाणें ] व सत्व ९ प्रकृतींचें राहील.

४ प्रकृतींचा ( ६--१ निद्रा, १ प्रचला ) बंध अपूर्व करणाच्या दुसऱ्या भागापासून १० व्या गुणस्थानापर्यंत होईल. त्यावेळीं उपशमक सूक्ष्मसांपरायपर्यंत व १६ प्रकृतींचा क्षय ९ व्या गुणस्थानांत होतो, तेथपर्यंत उदय ४ किंवा ५ प्रकृतींचा व सत्त्व ९ प्रकृतींचें राहील; परंतु, १६ प्रकृतींचा क्षय झल्यावर ९ व्या व क्षपक १० व्या गुणस्थानांत ६ प्रकृतींचें सत्व राहील.

११ व्या व १२ व्या गुणस्थानांत दर्शनावरण प्रकृतींचा बंध होत नाहीं.

११ व्यांत १२ व्या गुणस्थानांत द्विचरमसमयांपर्यंत ४ किंवा ५ प्रकृतींचा उदय असतो व ११ व्यांत ९ प्रकृतींचें सत्व व १२ व्याच्या द्विचरमसमयांपर्यंत ६ प्रकृतींचें सत्त्व राहील.

क्षीण कषायाच्या अंतिम समयांत उदय व सत्त्व ४-४ प्रकृतींचें असतें.

## दर्शनावरण उत्तर प्रकृतींचें गुणस्थानापेक्षेनें बंध व उदय सत्वाचें

## ( कोष्टक नं. १८२ )

| गुणस्थान | मिथ्यात्व | सासादन | मिश्र | असंयत | देशसंयत | प्रमत्त | अप्रमत्त | अपूर्वकरण | | अनिवृत्ति | | सूक्ष्मसां | | उपशांत | क्षीणकषाय | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | उप. | क्षप | उप. | क्षप | उप. | क्षप | | द्वि. | चरम |
| बंध | ९ | ९ | ६ | ६ | ६ | ६ | ६ | ६,४ | ६,४ | ४ | ४ | ४ | ४ | ० | ० | ० |
| उद. | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४,५ | ४ |
| सत्व | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९ | ९,६ | ९ | ६ | ९ | ६ | ४ |

गाथा ६३३-६३४—साता व असाता प्रकृतींपैकीं कोणत्यातरी एकाच प्रकृतींचा बंध अथवा उदय होईल. सत्त्वमात्र दोन्हीं प्रकृतींचें १३ व्या गुणस्थानापर्यंत राहतें.

अयोगी गुणस्थानाच्या अंतिमसमयांत ज्या प्रकृतींचा उदय असेल तिचेंच सत्व राहील.

पहिल्या गुणस्थानांपासून ६ व्या गुणस्थानापर्यंत वेदनीय कर्माचे खालीं लिहिल्या प्रमाणें ४ भंग होतात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | बंध साताचा, | उदय साताचा | सत्त्व दोन्हींचें | [१] | अपुनरुक्त |
| २ | ,, | उदय असाताचा | ,, | [२] | ,, |
| ३ | बंध असाताचा | उदय साताचा | ,, | [३] | ,, |
| ४ | ,, | उदय असाताचा | ,, | [४] | ,, |

सातपासून १३ व्या गुणस्थानांपर्यंत खालीलप्रमाणे २ भंग होतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | बंध साताचा | उदय साताचा | सत्त्व दोन्हींचें | पुनरुक्त |
| २ | ,, | उदय असाताचा | ,, | ,, |

१४ व्या गुणस्थानांत खालीलप्रमाणें ४ भंग.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | बंध ० | उदय साताचा | सत्त्व दोन्हींचें | [५] | अपुनरुक्त |
| २ | ,, | उदय असाताचा | ,, | [६] | ,, |
| ३ | ,, | उदय साताचा | सत्त्व साताचें | [७] | ,, |
| ४ | ,, | उदय असाताचा | सत्त्व असाताचें | [८] | ,, |

वेदनीय कर्माचे अपुनरुक्त मूळ भंग आठ (८) आहेत.

**गुणस्थानापेक्षेनें वेदनीय कर्माच्या भंगांची संख्या. ( कोष्टक नं. १८३ )**

| गुणस्थान | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | एकूण भंग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भंगसंख्या | ४ | ४ | ४ | ४ | ४ | ४ | २ | २ | २ | २ | २ | २ | २ | ४ | ४४ |

**गाथा ६३५**—उच्च व नीच गोत्रांपैकीं एकाच प्रकृतीचा बंध अथवा उदय यथासंभव होतो.

दोन्ही गोत्रकर्माची सत्ता अयोगी गुणस्थानाच्या द्विचरमसमयापर्यंत राहते, पण चरमसमयांत उच्च गोत्राचेंच सत्त्व राहतें.

**गाथा ६३६, ६३७**—उच्चगोत्राची उद्वेलना ज्याची झाली असेल अशा तेजस्काय व वायुकायांत नीचगोत्राचेंच सत्व राहील व तेजस्काय व वायुकाय मरून एकेंद्रिय विकलत्रय वा पंचेंद्रिय तिर्यंच उत्पन्न होईल तेव्हां अंतर्मुहूर्तपर्यंत नीच गोत्राचेंच सत्त्व राहील. पुढें, उच्चगोत्राचा बंध झाल्यास दोहींचें सत्व राहील.

**गाथा ६३८**–गुणस्थानापेक्षेनें गोत्रकर्माचे भंग खालील प्रमाणें होतील.

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| मिथ्यात्व गुणस्थान | [१] | बंध नीच | उदय नीच | सत्त्व दोहींचें | (१) भंग | अपुनरुक्त |
| | [२] | ,, | ,, उच्च | ,, | (२) | ,, |
| | [३] | ,, उच्च | ,, उच्च | ,, | (३) | ,, |
| | [४] | ,, ,, | ,, नीच | ,, | (४) | ,, |
| | [५] | ,, नीच | ,, ,, | सत्त्व नीचाचें | (५) | ,, |

सासादन–वरील पांच भंगांपैकीं पांचवा भंग कमी करून बाकीचे चार भंग होतील.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मिश्र असंयत देशसंयत | (१) | बंध उच्च | उदय उच्च | सत्त्व दोहींचें | पुनरुक्त भंग |
| | (२) | ,, | उदय नीच | ,, | ,, |
| प्रमत्तपासून १० व्या गुणस्थानापर्यंत | (१) | बंध उच्च | उदय उच्च | सत्त्व दोहींचें | ,, |
| गु. ११-१२-१३ पर्यंत | (१) | ० | ,, | ,, | ६ अपुनरुक्त |
| गुणस्थान १४ | (१) | ० | ,, | ,, | पुनरुक्त |
| | (२) | ० | ,, | सत्त्व उच्च | [७] अपुनरुक्त |

याप्रमाणें गोत्राकर्माचे अपुनरुक्त मूलभंग सात (७) होतात.

## गुणस्थानापेक्षेनें गोत्राकर्माच्या भंगसंख्येचें ( कोष्टक नं. १८४. )

| गुणस्थान | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | एकूण भंग |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| भंगसंख्या | ५ | ४ | २ | २ | २ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | १ | २ | २५ होत. |

**गाथा ६३९-४०**--देव व नारक यांच्या भुज्यमान आयुष्यांत सहा महिने शिल्लक राहिले असतां ते ( देव व नारक ) मनुष्यायु व तिर्यंचायूचा बंध होण्यास योग्य होतात. मनुष्य व तिर्यंच यांच्या भुज्यमान आयूचा तिसरा भाग उरला म्हणजे, त्यांना यथायोग्य चारही प्रकारचा आयुर्बंध होऊं शकतो. भोगभूमींतील जीवाचें आयुष्य सहा महिने शिल्लक राहिले म्हणजे त्यांना देवायूचाच बंध होतो. एकेंद्रिय व विकलेंद्रिय जीवांना मनुष्यायु वा तिर्यंचायूचाच बंध होतो. आणि तेजस्कायिक, वातकायिक, किंवा सातव्या पृथ्वींतील नारकी यांना तिर्यंचायूचाच बंध होतो.

**गाथा ६४१**–नारकादिकांना आप आपल्या गतिसंबंधी एक आयूचा उदय असतो व परभवायूचा बंध झाला असल्यास सत्ता दोन आयूंची राहील. एक बध्यमान व एक भुज्यमान, परंतु अबद्धायु जीवांना एका भुज्यमान आयुचीच सत्ता असते.

**गाथा ६४२**–एक जीव एका भवांत एकच आयूचा [ चार आयूपैकीं ] बंध करील आणि तोही योग्यकाळीं आठ वेळां करील. भुज्यमान आयूचा तिसरा भाग अवशिष्ट राहिल्यावर आयुर्बंध होतो. याप्रमाणें पुढेंही तिसरा तिसरा भाग शिल्लक राहिला असतां एकंदर मिळून ८ वेळां आयुर्बंध होऊं शकतो.

**नोटः**—भुज्यमान आयूचा तिसरा भाग शिल्लक राहिला म्हणजे तो काल पहिल्या आयुर्बंधाला योग्य होतो. त्यावेळीं न झाल्यास पुढील त्रिभागांत होऊं शकेल. याप्रमाणें आयुर्बंधाचा अवसर आठ वेळां येतो.

**गाथा ६४३**–आयुर्बंध झाल्यानंतर पुढील अपकर्षकालांत बध्यमान आयूची स्थिति कायम राहील, किंवा, ज्यास्त होईल. किंवा कमी होईल. परिणामानुसार जीवांच्या आयुः स्थितीचें अपवर्तन होतें [ म्हणजे स्थिति कमी होते ] त्यांस **"अपवर्तनघात"** म्हणतात.

**नोटः**—जसें १६ व्या स्वर्गातील बावीस सागर स्थितीचा आयुर्बंध कोणास झाल्यास त्याच्या दुसऱ्या अपकर्षकालांत परिणामांची विशुद्धि कमी झाल्यामुळें बाराव्या स्वर्गाची १८ सागरांहून कांहीं अधिक स्थिति राहील.

## आयुःकर्माचे भंग.

**गाथा ६४४**–बंध, अबंध व उपरतबंध या अपेक्षेनें एका जीवाच्या एका पर्यायांत एका आयुसंबंधी तीन भंग होतात.

बंधः—वर्तमानकाळीं परभवाच्या आयूचा बंध होतो. तेथें बंध आगामी आयूचा, उदय भुज्यमान आयूचा, व सत्त्व भुज्यमान व बध्यमान आयूचें याप्रमाणें भंग तीन होतात. ( बंध १, उदय १, सत्त्व २ )

अबंधः—अगामी आयूचा, पूर्वीही बंध झाला नाहीं व वर्तमानकाळींही होत नाहीं म्हणून त्यास अबंध म्हणतात. येथें उदय व सत्त्व केवल एका भुज्यमान आयूचेंच असतें. ( बंध०, उदय १, सत्त्व१. )

उपरतबंधः—आगामी आयूचा पूर्वी बंध केला असून वर्तमानकाळीं बंध होत नाहीं म्हणून उपरत बंध, उदय भुज्यमानआयु १, सत्त्व पूर्वबद्ध व भुज्यमान आयु २ [ उपरत बंध, १ उदय, २ सत्त्व. ]

गाथा ६४५–नारकगतींत आयुकर्माच्या बंध उदय सत्त्वाचें कोष्टक नं. १८५

नरकगतींत बंध = १ मनुष्यायु
उदय = नरकायु
सत्त्व = १ नरकायु,
मनुष्यायु
अथवा
बंध = १ तिर्यंचायु
उदय = १ नरकायु
सत्त्व = १ नरकायु, तिर्यंचायु

} बंधापेक्षेनें २

| | तिर्यंचायु. | | | मनुष्यायु | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | बंध | अबंध | उपरत बंध | बंध | अबंध | उपरत बंध |
| बंध | ति. १ | ० | १उप | म. | ० | १उप |
| उदय | न.१ | न.१ | १न. | न. | न.१ | न.१ |
| सत्त्व | २ति. नं. | १न. | २ति. न. | २म. न. | न.१ | २म. न. |

नरकगतींत बंध = ०
,, उदय = १ नरकायु
,, सत्त्व = १ नरकायु

} अबंधापेक्षेनें १

नरकगतींत बंध = उपरत
,, उदय = नरकायु
,, सत्त्व = मनुष्यायु, नरकायु
अथवा
नरकगतींत बंध = उपरत
,, उदय = नरकायु
,, सत्त्व = तिर्यंचायु, नरकायु

} उपरत बंधापेक्षेनें २

५ एकूण

याप्रमाणें नरकगतींत ५ अपुनरुक्त भंग झाले पण अबंधापेक्षेनें मनुष्य व तिर्यंच आयु वेगवेगळे घेतल्यास अबंधापेक्षेनेंही दोन भंग होतील, म्हणजे एकंदर भंग ६ सहा होतील; परंतु पुनरुक्त १ असल्यामुळें ५ च भंग धरले आहेत. देवगतींतही याचप्रमाणें मनुष्य व तिर्यंच आयुचा बंध होत असल्यामुळें ६ भंग होतात व पुनरुक्त १ भंग कमी केल्यास ५ भंग होतात. मनुष्यगतींत चारही आयूंचा बंध होत असल्यामुळें त्याचे भंग ४×३ = १२ होतात व अपुनरुक्त भंग ९ होतात.

मनुष्यगतींत आयुकर्माच्या बंध उदयसत्वाचें [ कोष्टक नं. १८६ ]

| | नरकायु | | | तिर्यंचायु | | | मनुष्यायु | | | देवायु | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | बंध | अबंध | उ.बंध | बंध | अबंध | उ.बंध | बंध | अबंध | उ.बंध | बंध | अबंध | उ.बंध |
| बंध | न. १ | ० | उप.१ | ति. १ | ० | उप.१ | म. १ | ० | उप.१ | दे. १ | ० | उप. १ |
| उदय | म. १ | म. १ | म. १ | म. १ | म. १ | म. १ | म. १ | म. १ | म १ | म. १ | म.१ | म. १ |
| सत्त्व | न.म.२ | म. १ | न.म.२ | ति.म.२ | म. १ | ति.म.२ | म.म.२ | म. १ | म.म.२ | दे.म.२ | म. १ | दे म.२ |

याप्रमाणें १२ भंग होतात. अबंधाचे ४ ही भंग समान आहेत म्हणून ३ भंग पुनरुक्त होतात. ते वजा केले म्हणजे अपुनरुक्त भंग९ होतात. तिर्यंचगतींतही मनुष्यगतीप्रमाणें ४ही आयूंचा बंध होत असल्यामुळें मनुष्यगतीप्रमाणें १२ भंग होतात. व अपुनरुक्त भंग९ होतात.

याप्रमाणें नरकगतींत ५, देवगतींत ५, मनुष्यगतींत ९, तिर्यंचगतींत ९, मिळून २८ अपुनरुक्त भंग होतात,

मूळ गाथेचा सारांश असा आहे कीं, एक एक आयूच्या अपेक्षेनें तीन तीन भंग होतात. ज्या गतींत जितक्या आयूंचा बंध होत असेल त्या आयुर्बंधाच्या संख्येनें ३ भंगांस गुणल्यानें सर्व भंगांची संख्या निघते.

ज्या गतींत जितक्या आयूंचा बंध होत असेल त्यांत १ कमी केला म्हणजे बाकीचे पुनरुक्त रहातात. व सर्व भंगांतून पुनरुक्त भंग वजा केले म्हणजे बाकी अपुनरुक्त भंग रहातात. जसें देवायूंत मनुष्य व तिर्यंच या दोन आयूंचा बंध होतो. म्हणून २×३=६ भंग झाले. या देवगतींत २ आयूंचा बंध आहे; त्यांतून १ कमी केला म्हणजे १ पुनरुक्त भंग झाला. तो वजा केला म्हणजे ६–१=५ अपुनरुक्त भंग झाले.

**गाथा** ६४६ ते ६४९.–गुणस्थानापेक्षेनें आयुर्बंधाचे भंग.

## गुणस्थानापेक्षेनें अपुनरुक्त भंगाचें ( कोष्टक नं. १८७. )

| नं. | गुणस्थान | नरकगतींत भंग | तिर्यंचगतींत भंग | मनुष्यगतींत भंग | देवगतींत भंग | एकूण | विशेष. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मिथ्यात्व | ५ | ९ | ९ | ५ | २८ | |
| २ | सासादन | ५ | ८ | ८ | ५ | २६ | मनुष्य व तिर्यंचगतींत नरकायूचा बंध नाहीं म्हणून एक भंग कमी झाला. |
| ३ | मिश्र | ३ | ५ | ५ | ३ | १६ | या गुणस्थानांत आयुबंध होत नाहीं. म्हणून बंधाचे भंग कमी झाले. |
| ४ | असंयत | ४ | ६ | ६ | ४ | २० | देव व नरकगतींत तिर्यंचायूचा बंध होत नाहीं म्हणून एक एक भंग कमी झाला व मनुष्य तिर्यंचगतींत मनुष्य, तिर्यंच व नरक आयूंचा बंध होत नाहीं, म्हणून ३-३ भंग कमी झाले. |

| नं. | गुणस्थान | नरकगतींत भंग | तिर्यंचगतींत भंग | मनुष्यगतींत भंग | देवगतींत भंग | एकूण | विशेष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | देशसंयत | ० | ३ | ३ | ० | ६ | तिर्यंच व मनुष्यगतींत एक देवायूचाच बंध होतो म्हणून बंध, अबंध, उपरत बंध यांच्या अपेक्षेनें ३-३ भंग झाले. |
| ६ | प्रमत्त | ० | ० | ३ | ० | ३ | ,, ,, |
| ७ | अप्रमत्त | ० | ० | ३ | ० | ३ | ,, ,, |
| ८ | अपूर्वकरण उपशमश्रेणी | ० | ० | २ | ० | २ | देवायूचा अबंध व उपरत बंध मिळून २ भंग होतात. |
| ८ | अपूर्वकरण क्षपकश्रेणी | ० | ० | १ | ० | १ | हा १ भंग अबंध. अपेक्षेनें आहे |
| ९ | अनिवृत्तिउपशमश्रेणी | ० | ० | २ | ० | २ | ८व्या गुण.च्या उप०श्रेणीप्र- |
| ९ | अनिवृत्तिक्षपकश्रेणी | ० | ० | १ | ० | १ | ,, ,, क्षपक ,, ,, |
| १० | सूक्ष्मसांपराय उपशमश्रेणी | ० | ० | २ | ० | २ | ,, ,, उपशम ,, ,, |
| १० | सूक्ष्मसांपराय क्षपकश्रेणी | ० | ० | १ | ० | १ | ,, ,, क्षपक ,, ,, |
| ११ | उपशांतमोह | ० | ० | २ | ० | २ | ,, ,, उपशम ,, ,, |
| १२ | क्षीण. मोह | ० | ० | १ | ० | १ | हा १ भंग अबंधा. अपेक्षेनें आहे |
| १३ | सयोगकेवली | ० | ० | १ | ० | १ | ,, ,, ,, ,, ,, |
| १४ | अयोगकेवली | ० | ० | १ | ० | १ | ,, ,, ,, ,, ,, |
| | | | | | | ११६ | |

**वेदनीय, गोत्र, आयु या कर्मांच्या भंगांची बेरीज.**

**गाथा** ६५०–वेदनीय कर्माचे भंग ४२ ( गाथा ६३३-६३४ पहा. )

गोत्रकर्माचे भंग २५ ( गाथा ६३८ पहा. )

आयुकर्माचे भंग ११६ ( गाथा ६४६ते६४९ पहा. )

## वेदनीय, गोत्र व आयु कर्माच्या अपुनरुक्त मूलभंगांची संख्या.

**गाथा ६५१**–वेदनीय कर्माचे अपुनरुक्त मूलभंग ८ (गाथा ६३३-६३४ पहा)
गोत्रकर्माचे ,, ,, ७ ( गाथा ६३८ पहा )
आयु कर्माचे ,, ,, ५ नरकगतीच्या अपेक्षेनें.
९ तिर्यंच ,, ,,
९ मनुष्य ,, ,,
५ देव ,, ,,
[गाथा ६४६ ते ६४९ पहा]

## मोहनीय कर्माचे त्रिसंयोगी भंग

**गाथा ६५२**–मोहनीय कर्मांच्या बंध उदय सत्त्व या स्थानांचे भंग पूर्वी वेगवेगळे सांगितले आहेत. आतां बंध, उदय, सत्त्व यांचे त्रिसंयोगी भंग सांगतात.

**गाथा ६५३ ते ६५९–मोहनीय कर्माच्या बंध, उदय, सत्त्वाचे त्रिसंयोगी**

**[ गुणस्थानापेक्षया ]** **( कोष्टक नं. १८८ )**

| गुणस्थान | बंध-स्थानाची संख्या | बंधस्थानाचा तपशील | उदय-स्थानाची संख्या | उ. स्थानाचा तपशील | सत्त्व-स्थानाची संख्या | सत्त्वस्थानाचा तपशील |
|---|---|---|---|---|---|---|
| १ मिथ्यात्व | १ | २२ प्रकृतीचें | ४ | १०,९,८,७ प्र | ३ | २८,२७ २६, प्र. |
| २ सासादन | १ | २१ ,, | ३ | ९,८,७ ,, | १ | २८ प्र. चें |
| ३ मिश्र | १ | १७ ,, | ३ | ९,८,७ ,, | २ | २८,२४ प्रकृतीचें |
| ४ असंयत | १ | १७ ,, | ४ | ९,८,७,६, | ५ | २८,२४ २३,२२,२१ |
| ५ देशसंयत | १ | १३ ,, | ४ | ८,७,६,५, | ५ | २८,२४ २३,२२,२१ |
| ६ प्रमत्त | १ | ९ ,, | ४ | ७,६,५,४, | ५ | २८,२४ २३,२२,२१ |
| ७ अप्रमत्त | १ | ९ ,, | ४ | ७,६,५,४, | ५ | २८,२४ २३,२२,२१ |

| गुणस्थान | बंध स्थानाची संख्या | बंधस्थानाचा तपशील | उदय-स्थ नाची संख्या | उ. स्थानाचा तपशील | सत्त्व-स्थानाची संख्या | सत्त्वस्थानाचा तपशील |
|---|---|---|---|---|---|---|
| ८अपूर्वकरण उपशमश्रेणी | १ | ९ ,, | ३ | ६,५,४ ,, | ३ | २८,२४, २१ |
| ८अपूर्वकरण क्षपकश्रेणी | १ | ९ ,, | ३ | ६,५,४ ,, | १ | २१ |
| ९अनि.करण उप. श्रेणी | ५ | ५,४,३, २,१ ,, | २ | २,१ ,, | ३ | २८,२४, २१ |
| ९ अनि.करण क्षपकश्रेणी | ५ | ५,४,३, २,१ ,, | २ | २,१ ,, | ८ | १३,१२, ११,५,४,३ २,१ |
| १०सूक्ष्मसांपराय उ.श्रेणी | ० | ० | १ | १ | ३ | २८,२४, २१ |
| १०सू. सांपराय क्ष.श्रेणी | ० | ० | १ | १ | १ | १ |
| ११ उपशांत मोह | ० | ० | ० | ० | ३ | २८,२४, २१ |

**विशेष**—नवव्या गुणस्थानाच्या क्षपकश्रेणींत १ ल्या भागामध्यें २१ प्रकृतींचीही सत्ता असते. इथें ९व्या गुणस्थानाच्या २ ऱ्या भागाला अनुसरून कथन आहे.

**टीप:**—बंधस्थानाकरितां गाथा ४६४, उदयस्थानाकरितां ४७९ व सत्त्वस्थानाकरितां गाथा ५०८ ते ५११ पहा.

**गाथा ६६०**— यापुढें खालील गोष्टींचें विवरण येईल.

१ मोहनीयकर्माच्या बंधस्थानांत उदयस्थानें व सत्त्वस्थानें कोणतीं ?

२ ,, ,, उदयस्थानांत बंधस्थानें व सत्त्वस्थानें कोणतीं ?

३ ,, ,, सत्त्वस्थानांत बंधस्थानें व उदयस्थानें कोणतीं ?

ज्या स्थानांत इतर स्थानें असतात त्यास अधिकरण म्हणतात. व इतर स्थानांस आधेय म्हणतात.

| गुण. | प्रत्येक पद | पिंडपद | भंग काढण्याची रीति | भंग संख्या |
|---|---|---|---|---|
| | | २२ कषाय ४ | [२२] १कषायाचे भंग लिंगाच्या दुप्पट = ६५ = ×१६×२=६५ = ×३२ तीन लिंग धरून ४कषायांचे भाव १२ होतात तर सर्व कषायांचे भंग ६५ = ×३२×१२ = ६५ = ×३८४ | ६५=×४४८-१ |
| ९ अनि. सवेद | ,, ,, ,, ,, | ,, ,, ,, ,, | ,, | ६५=×४४८-१ |
| ९ अनि. अवेद | वरीलप्रमाणें २० | २१ कषाय ४ | क्षायिक सम्यक्त्वापर्यंत २० प्रत्येक पदांच्या भंगाची बेरीज = ६५=×१६-१ (२०) एका कषायाचे भंग सम्यक्त्वाचे दुप्पट ६५ = ×८×२ = ६५ = ×१६ तर ४ कषायाचे सर्वभंग ६५ = ×१६×४ = ६५ = ×६४ | ६५=×८०-१ |
| १०क्षप. सूक्ष्मसां. | २०क्षायिक सम्य०पर्यंत २१ सूक्ष्म लोभ | | सूक्ष्मलोभाचे भंग सम्यक्त्वाचे दुप्पट ६५ = ×८×२ = ६५ = ×१६ सर्व २१ प्रत्येक भंगाचा बेरीज = ६५ = ×३२-१ | ६५=×३२-१ |
| १२क्षीण कषाय | २० प्रत्येक पद क्षायिक सम्यक्त्वा-पर्यंत | | (२०) क्षायिक सम्यक्त्वाचे भंग ६५=×८ २० प्रत्येकपदाच्या भंगाची बेरीज= = ६५= × १६-१ | ६५=×१६-१ |
| | | | प्रत्येकपदाचे भंग | |
| १३सयो. केवली | १ केवलज्ञान | | (१) १ | |
| | २ ,, दर्शन | | (२) २ | |
| | ३ क्षायिक० | | (३) ४ | |
| | ४यथा.चारि | | (४) ८ | |
| | ५ क्षा.दान | | (५) १६ | |
| | ६ ,, लाभ | | (६) ३२ | |
| | ७ ,, भोग | | (७) ६४ | |
| | ८ ,,उपभो. | | (८) १२८ | |

| गुण | प्रत्येक पद | पिंडपद | भंग काढण्याची रीति | भंग संख्या |
|---|---|---|---|---|
| | ९ अनंतवीर्य | | (९) २५६ | |
| | १० असि. | | (१०) ५१२ | |
| | ११ जीवत्व | | (११) १०२४ | |
| | १२ भव्यत्व | | (१२) २०४८ | |
| | १३ मनुष्यग. | | (१३) ४०९६ | |
| | १४ शुक्ल० | | (१४) ८१९२ | |
| | | | १६३८३=६५=×१/४–१ | =२५६×३२–१·८१९१·१ =२५६×३४–१ ६५=×१/४ |
| १४अयो | १३ मनुष्य-गतिपर्यंत | | मनुष्यगतीचे भंग=४०९६ | |
| | | | १३ प्रत्येक भंगांची बेरीज=८१९१ | |
| | | | प्रत्येकपदाचे भंग | |
| सिद्ध | १ केवलज्ञान | | १ | |
| | २ ,, दर्शन | | २ | |
| | ३ क्षायिक. | | ४ | |
| | ४अनंतवीर्य | | ८ | |
| | ५ जीवत्व | | १६ | |
| | | | ३१ | ३१ |

याप्रमाणें भंगांचें वर्णन असहाय पराक्रमी वर्धमान स्वामींनीं केलें आहे.

गाथा ८७५–गुणस्थानांत स्थानभंग व पदभंग जसे दाखविले आहेत, त्याच प्रमाणें मार्गणांतही समजावे.

गाथा ८७६–३६३ एकांत मतांचें वर्णन,

(१) क्रियावादाचे प्रकार १८०

(२) अक्रियावादाचे प्रकार ८४

(३) अज्ञानवादाचे प्रकार ६७

(४) वैनयिकवादाचे प्रकार ३२

३६३

गाथा ८७७ क्रियावादाचे १८० प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें होतात.

१ अस्ति×४ स्वतः, परतः, नित्य, अनित्य× ९ जीव, अजीव, पुण्य, पाप, आस्रव, संवर, निर्जरा, बंध, मोक्ष × ५ काल, ईश्वर, आत्मा, नियति, स्वभाव = १८०

गाथा ८७८ (१) जीवादि ९ पदार्थ द्रव्य, क्षेत्र, काल, भावरूपस्वचतुष्टयानें ( स्वतः) आहेत ( अस्ति ) = ९

(२) जीवादि ९ पदार्थ परचतुष्टयानें ( परतः ) आहेत = ९

(३) जीवादि ९ पदार्थ **नित्य** आहेत = ९

(४) जीवादि ९ पदार्थ **अनित्य** आहेत = ९

३६

गाथा ८७९ कालवादः—कालच सर्वांना उत्पन्न करतो; कालच सर्वभूतांचा विनाश करतो; प्राण्यांच्या निद्रितावस्थेंतही कालच जागा असतो. कालाची वंचना करण्यास ( ठकविण्यास कोणी समर्थ नाहीं. )

गाथा ८८० ईश्वरवादः—आत्मा अज्ञानी व अनाथ आहे. त्या आत्म्याला सुख दुःख जें होतें व स्वर्ग नरकांत जें गमनागमन होतें तें सर्व ईश्वर करतो.

गाथा ८८१ आत्मवाद—एकच महात्मा आहे, तोच पुरुष आहे, देव आहे, सर्वव्यापी आहे, सर्वथा अगम्य आहे, चेतनासहित आहे, निर्गुण आहे, उत्कृष्ट आहे, अशा प्रकारचा जो आत्मा त्यापासूनच सर्व होतें असें मानणें, हा आत्मवाद होय.

गाथा ८८२ नियतिवाद—जें ज्यावेळीं ज्या द्वारें जसें ज्याला नियमानें होतें. तें त्यावेळीं त्याद्वारें तसें त्यालाच होईल, अशा नियमानें सर्वांना मानणें हा नियतिवाद होय.

गाथा ८८३ स्वभाववाद—कंटकादिकांना तीक्ष्णत्व व पशुपक्ष्यांना नानाविधत्व कोण देतें? असा प्रश्न झाल्यास याला कारण स्वभावच आहे याप्रमाणें उत्तर देऊन सर्वाला अकारण-स्वाभाविक मानणें हा **स्वभाववाद** होय. गाथा ८७८ मध्यें एकांतमताचे ३६ भेद दाखविले आहेत. त्यांना काल, ईश्वर, आत्मा, नियति व स्वभाव हे पांच लावून गणना केल्यास क्रियावादाचे १८० प्रकार होतील.

गाथा ८८४—अक्रियावादाचे ८४ प्रकार खालीं लिहिल्याप्रमाणें होतात.

१ नास्ति ×२ स्वतः, परतः × ७ जीव, अजीव, आस्रव, संवर, निर्जरा, बंध, मोक्ष × ५ काल, ईश्वर, आत्मा, नियति, स्वभाव = ७०

स्वतः जीव कालानें नाहीं.

परतः जीव कालानें नाहीं.

याप्रमाणें जीवाजीवादिक ७ पदार्थ स्वतः व परतः कालापेक्षेनें नाहींत म्हणून १ × २ × ७ = १४

त्याचप्रमाणें ईश्वरापेक्षेनें नाहींत म्हणून १ × २ × ७ = १४

,, आत्म्याच्या अपेक्षेनें नाहींत म्हणून १ × २ × ७ = १४

" नियतीच्या अपेक्षेनें " " १ × २ × ७ = १४
" स्वभावाच्या अपेक्षेनें " " १ × २ × ७ = १४.

७०

**गाथा ८८५**–१ नास्ति × ७ जीव, अजीव, आस्रव, संवर, निर्जरा, बंध, मोक्ष × २ नियति, काळ = १४ याचा अर्थ असा कीं जीवादि ७ तत्त्वें, नियति किंवा काळाच्या अपेक्षेनें नाहींत. गाथा ८८४ मधील ७० व यांतील १४ याप्रमाणें अक्रियावादाचे ८४ भेद आहेत. ८४

**गाथा ८८६, ८८७**–अज्ञानवादाचे खालीं लिहिल्याप्रमाणें ६७ प्रकार होतात. ७ भंग [१ अस्ति, २ नास्ति, ३ अस्तिनास्ति, ४ अवक्तव्य, ५ अस्ति अवक्तव्य, ६ नास्तिअवक्तव्य, ७ अस्तिनास्ति अवक्तव्य] × ९ पदार्थ ( जीवाजीवादि ) = ६३

( १ ) कोण जाणें जीवादि ९ पदार्थ आहेत ? = ९
( २ ) " " " " नाहींत ? = ९
( ३ ) " " " " आहेत नाहींत ? = ९
( ४ ) " " " " अवक्तव्य आहेत ? = ९
( ५ ) " " " " आहेत व अवक्तव्य आहेत = ९
( ६ ) " " " " नाहींत व " " = ९.
( ७ ) " " " " आहेत व नाहींत व अवक्तव्य आहेत =९

६३

१ शुद्धपदार्थ × ४ अस्ति, नास्ति, अस्तिनास्ति, अवक्तव्य = ४
[ १ ] कोण जाणे शुद्ध पदार्थ आहे = १
[ २ ] " " " " नाहीं १
[ ३ ] " " " " आहे कीं नाहीं १
[ ४ ] " " " " अवक्तव्य आहे १

४

६७

याप्रमाणें अज्ञानवादाचे ६७ प्रकार आहेत.

## वैनयिकवादाचे ३२ प्रकार आहेत.

**गाथा ८८८**–१ देव, २ नृपति, ३ ज्ञानी, ४ यति ५ वृद्ध, ६ बाल, ७माता, ८ पिता या आठांचा १ मन, २ वचन, ३ काय, ४ दान यांनीं विनय करणें याप्रमाणें

८ × ४ = ३२ प्रकार होतात. विनयवादी गुणावगुणांची परीक्षा केल्यावाचून केवळ विनयानें सिद्धि मानतात.

**गाथा ८८९**–स्वच्छंदश्रद्धान ठेवणारे ३६३ पाखंड कल्पितात. त्यांचीं वचनें जीवांच्या आकुलतेला कारणीभूत होतात व मिथ्यात्वाच्या उदयानें अज्ञानी जीवांचें मन आकर्षिलें जातें.

## इतर एकांतवाद.

**गाथा ८९० पौरुषवाद**–अळशी व निरुत्साही प्राणी कोणत्याही फलाचा उपभोग घेऊं शकत नाहीं. बालकालासुद्धां उद्यमावांचून स्तनांतील दुग्धाचें पान होऊं शकत नाहीं. पुरुषार्थावांचून कांहीं होऊं शकत नाहीं. याप्रमाणें पौरुषवादी पुरुषार्थानेंच सर्व सिद्धि मानतात.

**गाथा ८९१ दैववाद**–दैववादी म्हणतात कीं आम्ही केवळ दैवालाच मानतो. निरर्थक पुरुषार्थाला धिक्कार असो. किल्ल्याच्या तटासारखा उंच कर्णराजाही युद्धांत मारला गेला. सारांश दैववादी दैवानेंच सर्वसिद्धि मानतात.

**गाथा ८९२ संयोगवाद**–संयोगवादी संयोगानेंच कार्यसिद्धि मानतात. एका चाकानें गाडी चालूं शकत नाहीं. अंध व पंगु वनांत होते. अंधळ्याच्या खांद्यावर पंगु बसला तेव्हां ते दोघे नगरांत जाऊं शकले. याप्रमाणें संयोगवादी वस्तुसंयोगानेंच सर्वसिद्धि होते असें मानतात.

**गाथा ८९३ लोकवाद**–लोकांत एकवेळ प्रसिद्धि पावलेली गोष्ट देवादिकांनाही निवारतां येत नाहीं, जसें, द्रौपदीनें अर्जुनाच्या गळ्यांत माळ घातली परंतु लोकांत अशी प्रसिद्धि झाली कीं द्रौपदीनें पांचही पांडवांच्या गळ्यांत माळ घातली. सारांश, लोकवादी लोकांत जी प्रवृत्ति असेल तिलाच मानतात.

**गाथा ८९४**–बोलण्याचे जितके मार्ग तितकेच नयवाद व जितके नयवाद तितकेच परसमय. भावार्थः–जें कांहीं बोललें जातें तें सापेक्ष असतें. अपेक्षा हीच नय होय. अपेक्षारहित वचन ग्रहण करणें हेंच मिथ्यामत.

**गाथा ८९५** परमतांचीं वचनें सर्वथा एकांती असल्यामुळें तीं मिथ्या आहेत. जैनांचीं वचनें कथंचित ( सापेक्ष ) असल्यामुळें तीं सम्यक् ( यथार्थसत्य ) असतात.

**इति भावचूलिका नांवाचा सातवा अधिकार समाप्त.**

---

## अथ–त्रिकरणचूलिकाधिकार ८ वा प्रारंभ

**गाथा ८९६** हे गुणरत्नभूषण चामुंडराय, सिद्धान्तरूपी अमृतसमुद्रांतून उत्पन्न झालेल्या श्रेष्ठ श्रीवीरनंदि आचार्यरूपी चंद्रास व निर्मलगुण धारक इंद्रनंदि गुरूस नमस्कार कर.

**गाथा ८९७** ( हीच गाथा जीवकांडांतील गुणस्थानाधिकारांत ४७ वी **आहे.**) अनंतानुबंधि ४कषाय सोडून बाकी २१ चारित्रमोहनीय प्रकृतींचें क्षपण किंवा उपशम करण्यास कारणीभूत ३ **करणे** असतात, १ अधःप्रवृत्तकरण २ अपूर्वकरण, ३ अनिवृत्तिकरण. यापैकीं प्रथम अधःप्रवृत्तकरण सातिशय अप्रमत्त गुणस्थानवर्ती करतो.

**गाथा** ८९८ ( जीवकांडांत ४८ वी गाथा हीच आहे. )

ज्या करणांत मागील समयांतील भाव पूर्वसमयांतील भावांची बरोबरी करूं शकतात त्या करणांस अधःप्रवृत्त करण म्हणतात. जसें, एखाद्या जीवांस दुसऱ्या तिसऱ्या वगैरे समयांत करणप्रयोगानें जी शुद्धि प्राप्त झाली तीच शुद्धि दुसऱ्या जीवांस एकच समयांत करतां येते. अशा प्रकारच्या भावशुद्धि करणप्रयोगास अधःप्रवृत्त म्हणतात.

**गाथा** ८९९ अधःप्रवृत्तकरणाचा काल अंतर्मुहूर्तमात्र असतो. या कलांत होणारे विशुद्धिप्राप्त कषायपरिणाम " **असंख्यात लोका** " इतके असतात. ते परिणाम पहिल्यासमयांपासून पुढील समयांमध्यें सारख्या प्रमाणांत वाढत जातात.

**गाथा** ९०० ते ९०७—अधःकरणबोधक अंकसंदृष्टि **( कोष्टक २४३ )**

| सोळा समयाचे परिणाम | प्रथम खंड | द्वितीय खंड | तृतीय खंड | चतुर्थ खंड |
|---|---|---|---|---|
| २२२ | ५४ | ५५ | ५६ | ५७ |
| २१८ | ५३ | ५४ | ५५ | ५६ |
| २१४ | ५२ | ५३ | ५४ | ५५ |
| २१० | ५१ | ५२ | ५३ | ५४ |
| २०६ | ५० | ५१ | ५२ | ५३ |
| २०२ | ४९ | ५० | ५१ | ५२ |
| १९८ | ४८ | ४९ | ५० | ५१ |
| १९४ | ४७ | ४८ | ४९ | ५० |
| १९० | ४६ | ४७ | ४८ | ४९ |
| १८६ | ४५ | ४६ | ४७ | ४८ |
| १८२ | ४४ | ४५ | ४६ | ४७ |
| १७८ | ४३ | ४४ | ४५ | ४६ |
| १७४ | ४२ | ४३ | ४४ | ४५ |
| १७० | ४१ | ४२ | ४३ | ४४ |
| १६६ | ४० | ४१ | ४२ | ४३ |
| १६२ | ३९ | ४० | ४१ | ४२ |
| ३०७२ | | | | |

अशी कल्पना करा कीं अधःकरणाचे सर्व परिणाम ३०७२ आहेत. या संख्येस **सर्वधन** म्हणतात. अधःकरणाचा काल १६ समय समजा. याला **"ऊर्ध्व अध्वान"** किंवा **" ऊर्ध्व गच्छ "** म्हणतात. प्रत्येक समयाच्या परिणामांत ४-४ परिणामांची वृद्धि आहे. या समान वृद्धीस **"ऊर्ध्व विशेष "** किंवा **" ऊर्ध्व चय "** म्हणतात. एक एक समयाच्या परिणामांत ४, ४ खंड आहेत. या खंडांस **" तिर्यक् अध्वान "** किंवा **" तिर्यक् गच्छ "** म्हणतात. या खंडांत एक एका परिणामाची वृद्धि आहे. या वृद्धीला **" तिर्यग्विशेष "** किंवा **" तिर्यक् चय "** म्हणतात. ३ या अंकास **" संख्यात "** समजा. सर्व समयांतील चयांच्या बेरजेस **" प्रचयधन "** म्हणतात. प्रचयधनाशिवाय बाकी समयांतील धनांस **" आदिधन "** म्हणतात.

**चय काढण्याची रीति**-गच्छ (पद) चा वर्ग व संख्यात यांच्या गुणाकाराची जी संख्या येईल तिनें सर्वधनाच्या संख्येस भागावें. जो भागाकार येईल ती चयाची संख्या समजावी. जसें ऊर्ध्वगच्छाची संख्या १६ आहे. तिचा वर्ग २५६ होईल व संख्याताची संख्या ३ कल्पिली आहे म्हणून २५६×३=७६८ झाले. व सर्वधनाची संख्या ३०७२ आहे म्हणून ३०७२ ÷ ७६८=४ ही चयाची संख्या निघाली.

**प्रचय धन [ याला उत्तरधन ही म्हणतात. ] काढण्याची रीति--**

गच्छाच्या संख्येंतून १ वजा करून त्याची निमपट करावी. त्या निमपटीस चय व गच्छ यांच्या गुणाकाराच्या संख्येनें गुणावें म्हणजे प्रचयधनाची संख्या निघते. जसें, १६ ही गच्छाची संख्या आहे. तींतून १ वजा केला. १५ राहिले. त्याची निमपट ७॥ झाली. [ चय ] ४×१६ (गच्छ)=६४×७॥=४८० हें प्रचयधन.

आदिधन काढावयाचें असल्यास सर्वधनांतून प्रचयधन वजा करावें. येईल तें आदिधन. जसें ३०७२-४८०=२५९२ हें आदिधन समजावें.

## सर्वधन काढण्याची रीति.

(१) आदिधन व प्रचयधन यांची बेरीज तें सर्वधन

(२) गच्छाचा वर्ग करून त्यास संख्यात व चय यांच्या गुणाकारानें गुणावें म्हणजे सर्वधन निघेल.

जसें, १६×१६×३×४=३०७२ हें सर्वधन.

**प्रथम समयाचें एकंदर परिणाम** १६२ कल्पिले आहेत. ते काढण्याची रीति अशी आहे कीं, आदिधनास गच्छानें भागावें. येईल तो भागाकार प्रथमसमयाचे परिणाम. जसें २५९२ ÷ १६=१६२

प्रथम समयाच्या परिणामसंख्येंत ४–४ मिळवीत गेले म्हणजे बाकीच्या १५ समयांची परिणामसंख्या निघेल.

" अनुकृष्टिरचना "

एक एक समयाच्या परिणामाचे जे चार चार खंड केले आहेत त्यांत वरील व खालील परिणाम समान ही आहेत. या रचनेस " अनुकृष्टि " रचना म्हणतात. व तिर्यक्‌रचनाही म्हणतात.

या रचनेंत जे चार खंड केले आहेत त्या चार खंडांना गच्छ म्हणतात.

अनुकृष्टीचा चय= अनुकृष्टीच्या गच्छास उर्ध्वचयाचा भाग दिल्यानें अनुकृष्टिचय निघतो. अनुकृष्टिगच्छ ४ आहे त्यांस ऊर्ध्वचय ४ नीं भागिलें ह्मणजे १ येईल हा अनुकृष्टिचय म्हणावा.

**अनुकृष्टीचें प्रचयधन** अशा रीतीनें निघतें की,

$$\frac{४\ \text{गच्छ} - १}{२} \times १ \times ४ = ६$$ हें अनुकृष्टीचें प्रचयधन—

प्रथम समयाचें सर्वधन १६२ कल्पिलें आहे त्यांतून प्रचयधन ६ उणे केले म्हणजे १५६ राहतात. तें अनुकृष्टीचें आदिधन होय.

अनुकृष्टीचें आदिधन १५६ यांस अनुकृष्टिगच्छ ४ नीं भागिल्यास ३९ हे प्रथम समयाच्या पहिल्या खंडाचे परिणाम होत. यांत १–१ चय मिळविल्यानें ४० ४१–४२ हे तीन खंड पहिल्या समयाचे निघतात. याचप्रमाणें दुसऱ्या तिसऱ्या वगैरे समयाच्या परिणामांचेही चार चार खंड निघतील.

नोटः—वर अनुकृष्टीचें, प्रचयधन ६ दाखविले आहेत. तें असें कीं ३९–४०–४१–४२ या चार संख्यांत ६ चें अंतर पडतें.

जसें, ४०–३९=१
४१–३९=२
४२–३९=३

६ हें अंतर अनुकृष्टीचें प्रचयधन होय.

अधःप्रवृत्त करणाची माहिती गाथा ८९८ मध्यें सांगितली आहे. तिचा परिचय व अनुभव व्हावा म्हणून ३०७२ परिणामाचें कोष्टक दाखविलें आहे. तें पाहिल्यानें हे समजून येईल कीं पहिल्या समयांतील ४०, ४१, ४२ हे परिणाम दुसऱ्या समयांतील परिणामांतही मिळतील. त्याचप्रमाणें खालील समयांतील परिणाम वरील समयांत मिळतील. फक्त ३९ व ५७ हे दोनच परिणाम कोठें मिळत नाहींत.

**गाथा** ९०८–[ ही गाथा जीवकांडांत ५० वी आहे. ]

## अपूर्वकरण.

सातिशय अप्रमत्त संयमी अंतर्मुहूर्त कालपर्यंत समयासमयास अनंतपट विशुद्धि वाढवीत वाढवीत अधःप्रवृत्तकरण समाप्त करून अपूर्वकरणाला प्राप्त होतो.

**गाथा** ९०९, ९१० ( यांतील ९१० ही गाथा जीवकांडांतील ५३ वी आहे.)

अपूर्वकरणाचा काल अंतर्मुहूर्त आहे. एकेक समयाचे परिणाम " असंख्यात लोका " इतके असतात. प्रथमसमयाच्या परिणामांपेक्षां दुसऱ्या, तिसऱ्या वगैरे समयाचे परिणाम सारख्या प्रमाणांत ( चयरूपानें ) वाढत जातात. अधःप्रवृत्तकरणाप्रमाणें मागील पुढील परिणामांत समानता राहणार नाहीं. एकाच समयांत अनेक जीव अपूर्वकरणास प्रारंभ करतील तर त्यांचे परिणाम समान अथवा असमान असू शकतील.

" अपूर्वकरण बोधक अंकसंदृष्टि "

| अपूर्वकरणाचे परिणाम |
|---|
| ५६८ |
| ५५२ |
| ५३६ |
| ५२० |
| ५०४ |
| ४८८ |
| ४७२ |
| ४५६ |
| ४०९६ आठ समयाचे सर्व परिणाम |

अशी कल्पना करा कीं अपूर्व करणाचे सर्व परिणाम ४०९६ आहेत, व त्याचा काल ८ समयाचा आहे. या ८ समयांस **गच्छ** असें म्हणतात. प्रत्येक समयास १६।१६ परिणामांची वृद्धि होते. या समान वृद्धिस **विशेष** किंवा **चय** म्हणतात. ४ या अंकास संख्यात समजा.

गाथा ९०० ते ९०७ मध्यें चय काढण्याची जी रीति सांगितली आहे. त्याप्रमाणें याचेही चय काढतां येतात. जसें ८ गच्छ याचा वर्ग ६४×४ संख्यात = २५६.

४०९६ सर्वधन ÷ २५६ = १६ चय

त्याच गाथेंतील रीतिप्रमाणें या ४०९६ मध्यें प्रचयधन खालीं लिहिल्याप्रमाणें होईल. ८–१=७ याचे निमे ३॥×८×१६=४४८

**आदिधन**=४०९६–४४८=३६४८

**प्रथमसमयाचे परिणाम** = ३६४८ ÷ ८ = ४५६

प्रथमसमयाच्या ४५६ परिणामांत १६, १६ ची वृद्धि अंतसमयांपर्यंत करीत गेलें म्हणजे आठही समयांचे परिणाम निघतील. या कोष्टकावरून दिसून येईल कीं अपूर्वकरणाचे परिणाम समयासमयांत सारख्याप्रमाणांत वाढत जातात.

**गाथा** ९११–९१२ ( जीवकांडांत याच गाथा ५६-५७ आहेत. ]

"अनिवृत्तिकरण"

अनिवृत्तिकरणाच्या कोणत्याही एका समयांत जितके जीव असतील त्यांच्या शरीरादिकांचा आकार वगैरे वेगळा असला तरी परिणामांची विशुद्धि समान राहील व त्यांची वृद्धि ही समयासमयास सारखीच होत जाईल. याचा काल अंतर्मुहूर्त आहे. या करणाचे परिणाम शुक्लध्यानाग्नीनें निर्मळ होतात व त्यांच्या योगानें कर्मरूपीवन दग्ध होऊन जातें.

—: त्रिकरणचूलिकानामक आठवा अधिकार समाप्त. :—

## "कर्मस्थिति—रचनासद्भाव" नांवाचा नववा अधिकार प्रारंभ.

**गाथा** ९१३—आठ कर्मांचा ज्यांनीं नाश केला आहे, व ज्यांचा संसार नाहींसा झाला आहे, व ज्यांचा वास आत्मप्रदेशांत आहे अशा सिद्धांस मस्तकानें नमस्कार करून " कर्मस्थिति—रचना—सद्भावास मी सांगेन.

कर्मांच्या स्थितींत समयासमयास कार्मण द्रव्य किती किती असतें म्हणजे त्याची सत्ता किती असतें हें या "कर्मस्थितिरचना—सद्भाव" नामक अध्यायांत सांगितलें जाईल. ( या विषयाचें वर्णन जीवकांड योग अधिकार व कर्मकांड बंध उदय सत्व या अधिकारांत केलेलें आहे.

**गाथा** ९१४ते९२१—या आठ गाथा व १५५ ते १६२ या गाथा एकच आहेत.

### "निषेकक्षरणाचें" कोष्टक २४४.

| समय | गुणहानि प्रथम | गुणहानि द्वितीय | गुणहानि तृतीय | गुणहानि चतुर्थ | गुणहानि पंचम | गुणहानि षष्ठ |
|---|---|---|---|---|---|---|
| अष्टम | २८८ | १४४ | ७२ | ३६ | १८ | ९ |
| सप्तम | ३२० | १६० | ८० | ४० | २० | १० |
| षष्ठ | ३५२ | १७६ | ८८ | ४४ | २२ | ११ |
| पंचम | ३८४ | १९२ | ९६ | ४८ | २४ | १२ |
| चतुर्थ | ४१६ | २०८ | १०४ | ५२ | २६ | १३ |
| तृतीय | ४४८ | २२४ | ११२ | ५६ | २८ | १४ |
| द्वितीय | ४८० | २४० | १२० | ६० | ३० | १५ |
| प्रथम | ५१२ | २५६ | १२८ | ६४ | ३२ | १६ |
| ९ समय | ३२०० | १६०० | ८०० | ४०० | २०० | १०० |

सर्वांची बेरीज ६३००

हें कोष्टक गाथा १६२ मध्येंही दिलें आहे व तेथें याचें सविस्तर विवरणही आहे तें पहावें.

**गाथा ९२२–९२३** कर्मांच्या स्थितिरचनेंत ६ राशींची अवश्यकता असते.

१ **द्रव्य**—बंधप्राप्त कर्म–पुद्गल–समूह.

२ **स्थिति आयाम**— बंधप्राप्त कर्माच्या स्थितीचें समयप्रमाण.

३ **गुणहानि आयाम**—एक गुणहानीच्या समयाचें प्रमाण. गुणहानि म्हणजे कर्मपरमाणूंची अर्धी अर्धी वाटणी होणें.

४ **नाना गुणहानि**—एक स्थितींत जितक्या गुणहानि होऊं शकतील त्यांस नाना गुणहानि म्हणतात.

५ **निषेकहार**—दोन गुणहानि आयाम.

६ **अन्योन्याभ्यस्तराशि**–जितक्या गुणहानि असतील तितके वेळां २ या संख्येची दुप्पट दुप्पट करून जी संख्या येईल ती. वरील कोष्टकांत कर्मद्रव्य६३००कल्पून स्थिति ४८ समयाची, गुणहानि आयाम ८, नानागुणहानि ६, निषेकहार किंवा दोन गुणहानि आयाम १६, अन्योन्याभ्यस्तराशि ६४, समजा.

**गाथा ९२४**–एक समयांत " एक समयप्रबद्ध " कर्माचा बंध होतो व त्याच्या स्थितीचा काळ संख्यातपल्या इतक्या समयांचा असतो.

**गाथा ९२५–९२६**–आयुकर्म सोडून बाकीच्या सातही कर्मांत १ द्रव्य, २ स्थिति, ३ गुणहानि आयाम, व ४ निषेकहार यांची संदृष्टि सामान्यपणें समान असते. परंतु नानागुणहानि व अन्योन्याभ्यस्तराशि समान नसतात.म्हणून यांचें वर्णन केलें जातें.

मिथ्यात्वकर्माची स्थिति उत्कृष्ट ७० कोडाकोडी सागराची असते. या स्थितींत नानागुणहानि व अन्योन्याभ्यस्तराशी किती किती होतील तें पुढें दाखवितात.

**वर्गशलाका**—एखाद्या विशिष्ट संख्येचें वर्गमूळ जितके वेळां निघूं शकेल तितक्या संख्येस वर्गशलाका म्हणतात. जसें–

| ४ | ३ | २ | १ |
|---|---|---|---|
| २×२=४, | ४×४=१६, | १६×१६=२५६, | २५६×२५६=६५५३६ |

म्हणजे ६५५३६च्या वर्गशलाका ४ झाल्या.यापुढें २ चें वर्गमूळ निघणें शक्य नाही.

**अर्धच्छेद**–२ या संख्येस २ नीं जितके वेळा गुणून एखादी विशिष्ट संख्या येईल त्या संख्येचे तितके दोनचे आंकडे अर्धच्छेद होत. जसें ४ चे अर्धच्छेद [ २×२=४ ] २ दोन. १६ सोळाचे अर्धच्छेद ४ चार ( २×२×२×२=१६ )

७० कोडाकोडी सागरास एकपल्य, व पल्यास पण्णट्ठी ( ६५५३६ ) मानिलें तर पुढीलप्रमाणें गणित केल्यानें नानागुणहानि व अन्योन्याभ्यस्तराशि काढतां येतील.

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | ६५५३६ ची वर्गशलाका | ४ |
| | या ४ शलाकेचा वर्ग | १६ |
| | ६५५३६ चें प्रथम वर्गमूळ | २५६ |
| ( २ ) | ४ वर्गशलाकेचा अर्धच्छेद | २ |
| | १६ [ वर्गशलाकेचा वर्ग ] चा अर्धच्छेद | ४ |
| | २५६ चा अर्धच्छेद | ८ |
| ( ३ ) | वरील वर्गशलाका ४ ची वर्गशलाका | १ |
| | ,, १६ ची वर्गशलाका | २ |
| | ,, २५६ ची वर्गशलाका | ३ |

पहिल्या पंक्तींतील अंकां [४×१६×२५६] चा गुणाकार १६३८४ येईल. हा अन्योन्याभ्यस्तराशि समजावा.

पल्याच्या वर्गशलाकेनें पल्याच्या संख्येस भागिल्यानेंही अन्योन्याभ्यस्तराशिचें प्रमाण निघतें. येथें पल्य ६५५३६ चें मानिलें आहे याची वर्गशलाका ४ आहे म्हणून—६५५३६ ÷ ४=१६३८४ [ अन्योन्याभ्यस्तराशि ]

दुसऱ्या पंक्तींतील अंकांची बेरीज केल्यास नानागुणहानीचीं संख्या निघेल ( २+४+८=१४ ) ही नानागुणहानीचीं संख्या.

पल्याच्या वर्गशलाकेच्या अर्धच्छेदास पल्याच्या अर्धच्छेदांतून उणें केल्यानेंही नानागुणहानीची संख्या निघेल. जसें—

| | |
|---|---|
| पल्याचे अर्धच्छेद | १६ |
| पल्याची वर्गशलाका ४ त्याचे अर्धच्छेद | —२ |
| | १४ |

मिथ्यात्वकर्माच्या उत्कृष्ट स्थितीस एकपल्य मानिल्यानें व पल्याची संख्या ६५५३६ मानिली तर नानागुणहानि १४ व अन्योन्याभ्यस्तराशि १६३८४ येईल.

पंक्ति ३ मधील आंकड्याचें येथें प्रयोजन नाहीं.

**गाथा** २२७—नानागुणहानीची स्थिति अमुक होते तर एक गुणहानीची स्थिति किती होईल असें त्रैराशिक मांडून एका गुणहानीची स्थिति म्हणजे गुणहानि आयाम काढतां येतात. जसें मागील कोष्टकांत नानागुणहानि ६ आहे व स्थिति ४८ समयांची आहे तर गुणहानि आयाम ८ समयाचा होईल.

**गाथा** ९२८–कोणत्याही गुणहानीच्या पहिल्या निषेकाच्या द्रव्याला निषेकहारानें भागून त्या गुणहानीचा विशेष किंवा चय काढतां येईल. जसें मागील कोष्टकांत पहिल्या गुणहानीच्या पहिल्या निषेकाचें द्रव्य ५१२ आहे, व निषेकहार (दोन गुणहानि आयाम) १६ आहे म्हणून ५१२ ÷ १६ = ३२ ही संख्या विशेषाची म्हणजे चयाची निघेल. याचा अर्थ असा की प्रथम निषेकापासून अंतिमनिषेकांपर्यंत ३२–३२ ची हानि होईल.

**गाथा** ९२९–अन्योन्याभ्यस्तराशीच्या संख्येंतून १ कमी करून त्याचा भाग सर्व द्रव्यास दिल्यास अंतिमगुणहानीचें द्रव्य निघतें. याच्या दुप्पट दुप्पट प्रथम गुणहानीपर्यंत द्रव्य होत जातें. जसें वरील कोष्टकांत अन्योन्याभ्यस्तराशीचें द्रव्य ६४ आहे. यांत १ कमी केला ६३ उरले. त्यानें सर्व द्रव्य जें ६३०० यास भागिलें म्हणजे १०० येतात. ही अंतिमगुणहानीची संख्या होय. बाकीच्या पाच गुणहानि दुप्पट दुप्पट होत जातील. अर्थात् २००–४००–८००–१६००–३२००.

**गाथा** ९३० गुणहानि आयामाच्या म्हणजे गच्छाच्या संख्येंतून १ वजा करून जी वजाबाकी येईल त्याची निमपट करावी व ती निषेकहाराच्या संख्येंतून वजा करावी. वजाबाकी येईल तिला गुणहानि आयामाच्या संख्येनें गुणावें. येईल त्या गुणाकारानें विवक्षित गुणहानीच्या द्रव्यास भागून जो भागाकार येईल तो त्या गुणहानीचा चय किंवा विशेष समजावा. जसें मागील कोष्टकांत गुणहानि आयाम ८ आहे त्यांत १ वजा केला ७ राहिले. त्याची निमपट ३॥ हे निषेकहाराची संख्या जी १६ तींतून वजा केले म्हणजे १२॥ राहतील त्यास गुणहानि आयामाची संख्या जी ८ तिनें गुणिलें. १०० आले. या १०० नें प्रथम गुणहानीचें द्रव्य ३२०० यास भागिलें तर ३२ चय प्रथम गुणहानीचे निघतील. याचप्रमाणें दुसऱ्या गुणहानीचें द्रव्य १६००आहे. त्यास भागिल्यास १६ येतील. हें दुसऱ्या गुणहानीचे चय समजावे. याचप्रमाणें पुढेंही करीत जावें.

**गाथा** ९३१–कोणत्याही गुणहानीचें प्रचयधन त्या गुणहानीच्या सर्व द्रव्यांतून वजा केलें म्हणजे जी वजाबाकी येईल त्यास गुणहानि आयामाच्या द्रव्यानें भागून जो भागाकार येईल ती संख्या त्या गुणहानीच्या अंतिम निषेकाची समजावी. जसें–गाथा ९०० ते ९०७ यांत प्रचयधन काढण्याची रीति लिहिली आहे. त्याप्रमाणें ३२०० च्या गुणहानीचें प्रचयधन असें काढावें.

८ गच्छाची संख्या–– १=७ याची निमपट ३॥ × ३२ चय × ८ गच्छ = ८९६ हें प्रचयधन.

३२०० सर्वधन–८९६ प्रचयधन = २३०४ ÷ ८ गुणहानि आयाम=२८८ अंतिम निषेकाचें द्रव्य यांत ३२, ३२ वाढवीत गेल्यास प्रथम निषेकापर्यंतचीं द्रव्यें निघतील याचप्रमाणें १६००–८०० आदि गुणहानीचे निषेक काढतां येतील.

**गाथा** ९३२–सर्व मूल व उत्तर प्रकृतींचा निषेकहार व गुणहानि आयाम समान असतो. नानागुण-हानि स्थित्यनुसार असते म्हणून ती समान नसते. ही सांगतात.

**गाथा** ९३३–[१] पल्याचे [ ६५५३६ चें ] प्रथम वर्गमूळ २५६ त्याचे अर्धच्छेद = ८

,, ,, द्वितीय ,, १६ ,, ,, ,, = ४

,, ,, तृतीय ,, ४ ,, ,, ,, = २

= १४

१४ = पल्याचे अर्धच्छेद $\frac{१६\times७}{८}$ म्हणजे = $\frac{७ \text{ छे}}{८}$ *

( २ ) पल्याचे चतुर्थवर्गमूळ २ त्याचे अर्धच्छेद = $\frac{\text{छे}}{१६}$

,, पंचम ,, जें येईल त्याचे अर्धच्छेद = $\frac{\text{छे}}{३२}$

,, षष्ठ ,, ,, ,, ,, ,, = $\frac{\text{छे}}{६४}$

= $\frac{७ \text{ छे}}{६४}$

(३) पल्याचे सप्तम वर्गमूळ जें येईल त्याचे अर्धच्छेद = $\frac{\text{छे}}{१२८}$

,, अष्टम ,, ,, ,, ,, ,, = $\frac{\text{छे}}{२५६}$

,, नवम ,, ,, ,, ,, ,, = $\frac{\text{छे}}{५१२}$

= $\frac{७ \text{ छे}}{५१२}$

याप्रमाणें पल्याच्या तीन तीन वर्गमूळाचे अर्धच्छेद आठ आठ पटीनें कमी कमी होत जातात.

* **नोटः**—" छे " ही खूण पल्याच्या अर्धच्छेदा ( १६ ) ची आहे.

[ १ ] पल्याची ( ६५५३६ ) वर्गशलाका ४ आहे याचा आठवा वर्ग जो येईल त्याचे अर्धच्छेद हे पल्याच्या वर्गशलाकेचा अर्धच्छेद जो २ आहे त्यांस × २५६ बरोबर आहेत. = २ × २५६

त्याचप्रमाणे पल्याच्या शलाकेचा सातवा वर्ग जो येईल त्याचे अर्धच्छेद = २ × १२८

,, ,, ,, सहावा ,, ,, ,, ,, ,, = २ × ६४

= २ × ४४८

[२] त्याचप्रमाणें पांचवा वर्ग जो येईल त्याचे अर्धच्छेद = २ × ३२
,, चौथा ,, ,, ,, ,, ,, = २ × १६
,, तिसरा ,, ,, ,, ,, ,, = २ × ८

२×५६

[३] त्याचप्रमाणें दुसरा वर्ग जो येईल त्याचे अर्धच्छेद = २ × ४
,, पहिला ,, ,, ,, ,, ,, = २ × २
पल्याच्या वर्गशलाकेचा अर्धच्छेद = २ × १

२×७

याप्रमाणें पल्याच्या वर्गशलाकेच्या वर्गाचे अर्धच्छेद तीन तीन मिळून आठ आठ पटीनें वाढत जातील.

या पुढील गणित संस्कृत टीकेंत ९३७ गाथेपर्यंत आहे तें नीट समजलें नाहीं. वाचकांनीं मूळसंस्कृत टीकेंतून पहावें.

**गाथा** ९३४ ते ९३७ मिथ्यात्वकर्माची उत्कृष्ट स्थिति ७० कोडाकोडीसागर आहे त्यास एक पल्य मानून पल्याची संख्या ६५५३६ कल्पिली आहे. तिची नाना-गुणहानि १४ होते. हें गाथा ९२५–९२६ मध्यें दाखविलें आहे.

पल्याचे ( ६५५३६ चे ) अर्धच्छेद १६ होतात.

या १६ सोळास ( छे ) ही संक्षिप्त खूण योजिली आहे—

१४ नानागुणहानि = $\frac{७ छे}{८}$

जर ७० कोडाकोडी सागर स्थितीची १४ नानागुणहानि होते तर १० कोडा-कोडी सागराची नानागुणहानि किती होईल ? याचें उत्तर = २

२= = $\frac{७ छे}{५६}$

याचप्रमाणें २० कोडाकोडी सागर स्थितीची नानागुणहानी = ४ = $\frac{७छे}{२८}$

,, ३० ,, ,, ,, ,, = ६ = $\frac{३छे}{८}$

,, ४० ,, ,, ,, ,, = ८ = $\frac{१छे}{२}$

,, ५० ,, ,, ,, ,, = १० = $\frac{५छे}{८}$

,, ६० ,, ,, ,, ,, = १२ = $\frac{३छे}{४}$

,, ७० ,, ,, ,, ,, = १४ = $\frac{७छे}{८}$

ज्या स्थितीची जितकी नानागुणहानि असेल तितकेवेळां २ चा अंक लिहून परस्पर त्यांचा गुणकार करून जी संख्या येईल ती अन्योन्याभ्यस्तराशि समजावी.

**गाथा ९३८**–ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय व अंतराय यांची उत्कृष्टस्थिति ३० कोडाकोडीसागराची आहे; म्हणून वरील प्रत्येक कर्माची अन्योन्याभ्यस्तराशि खालीं लिहिलेल्या रीतीनें निघेल.

१ पल्याचे द्वितीय वर्गमूळ काढून त्यास पल्याच्या तृतीय वर्गमूलाच्या असंख्यात पटीनें गुणावें.

नाम व गोत्रकर्माची उत्कृष्ट स्थिति २० कोडाकोडीसागरांची असते. यापैकीं प्रत्येक कर्माचा अन्योन्याभ्यस्तराशि १ पल्याच्या द्वितीय वर्गमूलाच्या असंख्यात पट होईल.

**गाथा ९३९**–आयुःकर्माच्या स्थितीची नानागुणहानि स्थितीच्या वाटणीप्रमाणें होईल.

७० कोडाकोडीसागराची स्थिति असल्यास तिची नानागुणहानि पल्याच्या अर्धच्छेदांतून पल्याच्या वर्गशलाकेचे अर्धच्छेद उणे केल्यानें निघेल तर ३३ सागर आयुःकर्माच्या उत्कृष्ट स्थितीची नानागुणहानि जितकी निघेल ती ३३ सागर उत्कृष्ट आयुःकर्माची नानागुणहानि समजावी.

**गाथा ९४०**–कोणत्याही प्रकृतीचा उत्कृष्ट स्थितिबंध होईल त्याच समयीं उत्कृष्ट आबाधाकाल व सर्व स्थितींची रचना दिसून येते. त्या स्थितीच्या अंतिम निषेकाची स्थिति सर्व होईल म्हणजे जी स्थिति पडली असेल ती अंतिमनिषेकाची समजावी व त्या पूर्वीच्या निषेकांची स्थिति प्रथम निषेकापर्यंत एक एक समय कमी कमी होईल.

या गाथेचा अर्थ लक्षांत येण्याकरितां गाथा ९१४ ते ९२१ मधील ६३०० चें कोष्टक पुढें ठेवावें. त्यावरून कळून येईल कीं त्या कोष्टकांत ४८ समयांची स्थिति कल्पिली आहे. त्यांतील ९ परमाणु ४८ व्या समयांत क्षरण पावतील. म्हणून ९ परमाणूंची स्थिति ४८ समयांची आहे. १० परमाणूंची स्थिति ४७ समयांची आहे. याचप्रमाणें एक एक समयाची स्थिति कमी कमी होत जाऊन प्रथम निषेक जो ५१२ आहे त्याची स्थिति १ समयाची होईल. म्हणजे पहिल्या समयांत ५१२ परमाणूंचे, दुसऱ्या समयांत ४८० परमाणूंचें क्षरण होईल व याचप्रमाणें क्षरण होत होत ४८ व्या समयांत ९ परमाणूंचें क्षरण होऊन ६३०० प्रकृतींची निर्जरा होऊन जाईल.

**गाथा ९४१**—कर्मप्रकृतींचा बंध झाल्यापासून आबाधाकालाला आरंभ होतो. आबाधाकाल समाप्त झाल्यानंतर पुढील प्रथम समयांत प्रथम निषेक, द्वितीय समयांत

द्वितीय निषेक, तृतीय समयांत तृतीय निषेक याप्रमाणें क्रमानें स्थितीच्या अंतसमयांत अन्त्य निषेकाचा उदय होऊन कर्मपरमाणु आपल्या कर्मस्वभावाला सोडून देतो.

**गाथा ९४२**–गाथा २६० मध्यें त्रिकोणात्मक जें कोष्टक दिलें आहे त्यावरून समजून येईल कीं एका समयांत 'एक समयप्रबद्ध' कर्मांचा बंध होतो व एक समयप्रबद्ध कर्मांचा उदय होतो.

**गाथा ९४३**—समयप्रबद्धाच्या संख्येला दीड गुणहानि आयामांनीं गुणून जी संख्या येईल त्यांहून थोडी कमी संख्या सत्तेंतील कर्मवर्गणांची प्रतिसमयास असते. जर ६३०० चा समयप्रबद्ध मानिला व गुणहानि आयाम ८ मानिला तर ६३०० × १२ ( दीड गुणहानि ) = ७५६०० ही संख्या येते. त्यांहून किंचित् कमी म्हणजे ४२९६ कमी केल्यास ७१३०४ ही सत्तेंतील कर्मांची संख्या निघेल. गाथा २६० मध्यें याचें विवरण सविस्तर केलें आहे तें पहावें.

**गाथा ९४४**—गाथा २६० मध्यें त्रिकोण रचना केली आहे. तीत ४८ पंक्ति आहेत. आठ आठ पंक्तींची एक एक गुणहानि मानिल्यास ६ गुणहानि होतील. पहिल्या गुणहानींत ज्या ८ पंक्ति आहेत त्यांत चयांच्या प्रमाणानें संख्या कमी कमी होत गेली आहे. ती कमी न धरितां सर्व पंक्तींतील संख्या सारखी मानिल्यास प्रथम गुणहानीच्या आठही पंक्तींची बेरीज = ६३०० × ८ होईल.

दुसऱ्या गुणहानीच्या आठ पंक्तींची बेरीज करण्याची रीति अशी आहे कीं प्रथम गुणहानीच्या बेरजेंत शेवटील गुणहानीची बेरीज १०० × ८ वजा करावी म्हणजे ६३०० × ८ – १०० × ८ = ६२०० × ८ यांच्या निम्यानें दुसऱ्या गुणहानीची बेरीज होईल म्हणजे = ३१०० × ८

याचप्रमाणें तिसऱ्या गुणहानीची बेरीज $\frac{३१०० \times ८ - १०० \times ८}{२}$ = १५०० × ८

याचप्रमाणें चौथ्या गुणहानीची बेरीज $\frac{१५०० \times ८ - १०० \times ८}{२}$ = ७०० × ८

,, पांचव्या ,, ,, $\frac{७०० \times ८ - १०० \times ८}{२}$ = ३०० × ८

,, अंतिम सहाव्या ,, ,, $\frac{३०० \times ८ - १०० \times ८}{२}$ = १०० × ८

१२००० × ८

या सहा गुणहानींत चयांच्या प्रमाणानें जितकी संख्या कमी आहे त्यांची बेरीज करून १२००० × ८ या संख्येंत वजा केल्यानें त्रिकोणरचनेच्या सर्व संख्यांची बेरीज होईल.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रथम | गुणहानींत | ५१२ | ही संख्या | ७ | वेळां | कमी | झाली | = ५१२×७=३५८४ |
| ,, | ,, | ४८० | ,, ,, | ६ | ,, | ,, | ,, | = ४८०×६=२८८० |
| ,, | ,, | ४४८ | ,, ,, | ५ | ,, | ,, | ,, | = ४४८×५=२२४० |
| ,, | ,, | ४१६ | ,, ,, | ४ | ,, | ,, | ,, | = ४१६×४=१६६४ |
| ,, | ,, | ३८४ | ,, ,, | ३ | ,, | ,, | ,, | = ३८४×३=११५२ |
| ,, | ,, | ३५२ | ,, ,, | २ | ,, | ,, | ,, | = ३५२×२=७०४ |
| ,, | ,, | ३२० | ,, ,, | १ | ,, | ,, | ,, | = ३२०×१=३२० |
| | | | | | | | | १२५४४ |

| | |
|---|---|
| प्रथम गुणहानींत कमी | १२५४४ |
| दुसऱ्या गुणहानींत निंमी कमी | ६२७२ |
| तिसऱ्या ,, ,, ,, | ३१३६ |
| चौथ्या ,, ,, ,, | १५६८ |
| पांचव्या ,, ,, ,, | ७८४ |
| सहाव्या ,, ,, ,, | ३९२ |
| | २४६९६ |

१२०००×८=९६०००−२४६९६ = ७१३०४ ही संख्या त्रिकोणरचनेची आहे. गाथा २६० मध्यें किंचित् ऊन ४२९६ ही संख्या दाखविली आहे. ती कशी येते हें पुढें दाखवितात.

वर २४६९६ हें ऋण दाखविलें आहे. यांत अंतिम गुणहानीचें द्रव्य १००×८ ६ वेळां कमी केलें होतें तें मिळवावें म्हणजे—

२४६९६ + ४८०० ( १०० × ८ × ६ , = २९४९६ हें ऋण ६३००समयप्रबद्ध संख्या × ४ अर्धगुणहानि आयाम = २५२००

२९४९६ − २५२०० = ४२९६

६३०० × १२ ( दीड गुणहानि ) = ७५६००
यांत किंचित् ऊन ४२९६
७१३०४

तिसरी रीत−६३०० समयप्रबद्धास १६ [ दोन गुणहानि आयाम ] नीं गुणल्यास १००८०० यांत २९४९६ ऋण वजा केल्यास ७१३०४ ही संख्या येईल.

**गाथा** ९४५−आयु:कर्म सोडून बाकीच्या सात कर्मांच्या उत्कृष्ट स्थितीपासून अंत:कोडाकोडी सागरप्रमाण जघन्य स्थितिपर्यंत एक एक समय कमी कमी होत

निरंतर स्थितीचे भेद संख्यात पल्याइतके होतात. हे भेद संज्ञी पंचेंद्रिय जीवांचेच होतात.

**गाथा ९४६—सांतर स्थितीचे भेद**—एक एक समय कमी कमी असा स्थितीचा क्रम न होतां अधिक अधिक समयाची स्थिति जींत कमी असेल त्या स्थितीला सांतर स्थिति म्हणावें, व या स्थितिभेदास सांतर स्थितिभेद म्हणतात. असे सांतर स्थितीचे भेद संख्यात हजार होतात.

हे सांतर स्थितिभेद खालील जीवांत असतात.

१ सम्यग्दर्शनाच्या सन्मुख असलेले मिथ्यादृष्टि जीव.

२ देशसंयमाच्या सन्मुख असलेले असंयत सम्यग्दृष्टि जीव.

३ सकलसंयमाच्या सन्मुख असलेले देशसंयमी जीव.

४ श्रेणीच्या सन्मुख असलेले अप्रमत्त गुणस्थानवर्ती जीव.

५ उपशमश्रेणींत आरूढ झालेले अपूर्वकरण, अनिवृत्तिकरण व सूक्ष्मसांपरायवर्ती जीव.

६ क्षपकश्रेणींत आरूढ झालेले ८-९-१० गुणस्थानांतील जीव.

याचें उदाहरण—अधःप्रवृत्तिकरणांत जीव पहिल्यासमयापासून अंतर्मुहूर्तपर्यंत ज्ञानावरणादि प्रकृतींची स्थिति यथायोग्य अंतःकोडाकोडी सागराइतकी बांधतात. पुढें त्याच करणांत अंतर्मुहूर्तपर्यंत अंतःकोडाकोडी सागरास पल्याच्या असंख्यातावा भाग कमी इतकी स्थिति बांधतात. पुढें त्याच करणांत एक अंतर्मुहूर्तपर्यंत त्या स्थितीहून पल्याचा असंख्यातावा भाग कमी इतकी स्थिति बांधतात. याचप्रमाणें याच करणांत इतकीच स्थिति संख्यात हजारवेळां कमी कमी करीत हें करण पूर्ण करतात. पुढें अपूर्व करण गुणस्थानांत नंतर अनिवृत्तिकरण गुणस्थानांत व नंतर सूक्ष्मसांपराय गुणस्थानांत चढतात. या तिन्ही गुणस्थानांतलि प्रत्येकांत संख्यात हजारवेळां यथायोग्य स्थिति कमी कमी बांधीत सूक्ष्मसांपराय गुणस्थानांत वेदनीयाची जघन्यस्थिति १२ मुहूर्त, नाम व गोत्रकर्माची जघन्यस्थिति ८ मुहूर्त, ज्ञानावरण, दर्शनावरण व अंतरायाची एक अंतर्मुहूर्त स्थिति बांधतात.

संज्ञीपर्याप्त व अपर्याप्त सोडून बाकीच्या १२ जीवसमासांत उत्कृष्ट व जघन्य स्थिति किती असते तें गाथा १४४ पासून गाथा १४८ पर्यंत दाखविलें आहे. या १२ जीवसमासांत उत्कृष्ट स्थितीपासून जघन्यस्थितीपर्यंत एक एक समय क्रमानें कमी कमी होत जाऊन जे भेद होतात ते निरंतर स्थितीचे भेद समजावेत.

**गाथा ९४७–९४८** ज्या कषायांच्या अंशांनीं कर्मांची कमी अधिक स्थिति पडते त्यास स्थितिबंधाऽध्यवसायस्थान म्हणतात.

# आठही कर्मांचीं स्थिति-बंधाऽध्यवसायस्थानें.

(१) आयुःकर्माचीं स्थानें सर्वांहून कमी आहेत म्हणजे यथायोग्य "असंख्यात-लोकां" इतकीं असतात.

(२-३) नामकर्म व गोत्रकर्मांचीं स्थितिबंधाध्यवसायस्थानें समान आहेत म्हणजे आयुःकर्माचीं जितकीं स्थानें सांगितलीं त्यांना पल्याच्या असंख्याताव्या भागानें गुणून जी संख्या येईल तितकीं.

(४-५-६-७)ज्ञानावरण, दर्शनावरण वेदनीय व अंतराय या चार कर्मांचीं स्थिति-बंधाध्यवसायस्थानें समान आहेत. म्हणजे नाम-कर्मांचीं जितकीं स्थानें सांगितलीं त्यांस पल्याच्या असंख्याताव्या भागानें गुणून जीं स्थानें येतील तितकीं.

(८) मोहनीय कर्माचीं स्थानें सर्वांहून अधिक आहेत. म्हणजे ज्ञानावरण कर्माचीं जितकीं स्थानें सांगितलीं त्यांस पल्याच्या असंख्याताव्या भागानें गुणून जी संख्या येईल तितकीं.

**गाथा** ९४९–जघन्य स्थितिबंधाकरतां स्थितिबंधाध्यवसायस्थानें असंख्यात लोकां इतकीं असतात.

जघन्यस्थितिपेक्षां एक समय अधिक स्थितिकरितां स्थिति बंधाध्यवसायस्थानें एक-चयाच्या स्थानांनीं अधिक होतील म्हणजे जघन्यस्थितीचीं जितकीं स्थानें असतील त्यांत एकचयाचीं स्थानें मिळवून जितकीं स्थानें होतील तितकीं. याचप्रमाणें समयासमयानें वाढणाऱ्या स्थितीकरितां ( उत्कृष्ट स्थितीपर्यंत ) स्थितिबंधाध्यवसायस्थानें एक एक चयानें वाढत जातील. जसें मोहनीय कर्माची जघन्यस्थिति ( संज्ञी पंचेंद्रियांची ) अंतःकोडा-कोडी सागरा इतकी आहे. म्हणजे, संख्यात पल्याइतकी आहे. मोहनीयाची उत्कृष्टस्थिति सत्तर कोडाकोडी सागराइतकीं आहे, म्हणजे, जघन्य स्थितीच्या संख्यातपट आहे. उत्कृष्ट स्थितीच्या समयांतून जघन्य स्थितीचे समय कमी करून, तींत १ मिळवून जी संख्या येईल तितके स्थितीचे भेद होतील. यांतून जघन्य स्थितिबंधाला कारणभूत असणारी स्थिति-बंधाध्यवसायस्थानें " असंख्यात लोकां " इतकीं असतील. यापुढें उत्कृष्ट स्थितीपर्यंत स्थितिभेदाला कारणभूत अध्यवसायस्थानें चय प्रमाणानें वाढत जातील.

**गाथा** ९५०–स्थितिबंधाध्यवसायस्थानांत चयप्रमाणवृद्धि सांगितली आहे. त्या चयाचें प्रमाण काढण्याकरितां विवक्षित गुणहानींतील अंताच्या निषेकाला दोन गुणहानि आयामांनीं भागानें किंवा त्या गुणहानीच्या प्रथम निषेकाला १ + गुणहानि आयामांनीं भागीलें म्हणजे येईल तो भागाकार चयाचें प्रमाण समजला जाईल. जसें गाथा ९१४

ते ९२१ मध्यें ६३०० चें कोष्टक दिलें आहे.त्यांत सहाव्या गुणहानीचे अंतिम निषेक १६ आहेत, व गुणहानि आयाम ८ आहेत. दोन गुणहानीचे आयाम १६ झाले. या १६ नीं १६ निषेकाला भागिल्यास १ येईल. हीच चयाची संख्या किंवा प्रमाण समजावें, किंवा दुसरी रीत म्हणजे या सहाव्या गुणहानीचा प्रथम निषेक ९ आहे. त्यास १ + गुणहानि आयाम ८ = ९ नीं भागिल्यासही १ हेंच चयाचें प्रमाण निघेल.याच प्रमाणें मागील मागील गुणहानींत दुप्पट दुप्पट चयाचें प्रमाण वाढत जाईल.

**गाथा** ९५१–कर्मस्थितीची रचना गाथा ९१४ ते ९२१ मध्यें दाखविली आहे. त्याचप्रमाणें स्थितिबंधाध्यवसायस्थानांचीही रचना होईल. त्याच रचनेप्रमाणें गुणहानि आयाम होतील; परंतु नानागुणहानि कर्मस्थितीच्या रचनेंत जितक्या होतील त्याच्या असंख्याताव्या भागा इतक्या नानागुणहानि या स्थितिबंधाध्यवसायस्थानांच्या रचनेंत होतील. मोहनीय कर्माच्या स्थिति रचनेंत नानागुणहानीचें प्रमाण, पल्याच्या अर्धच्छेदांत पल्याच्या वर्गशलाकेचे अर्धच्छेद कमी करून जी संख्या येईल तितकें सांगितलें आहे. ( गाथा ९२५–९२६ पहा. ) या प्रमाणास असंख्यातानीं भागून जें प्रमाण येईल तितक्या नानागुणहानि स्थितिबंधाध्यवसाय–रचनेंत समजाव्यात.

**गाथा** ९५२–आयुःकर्म सोडून बाकीच्या सात मूळप्रकृतींची जीं स्थितिबंधाध्यवसायस्थानें असतात, त्यांत सर्व गुणहानि संबंधीचे जे चय असतील, त्यांपैकीं प्रथम गुणहानिसंबंधी जी जघन्यवृद्धि ( चय ) असेल, त्या चयांत परिणामाच्या अविभाग प्रतिच्छेदाच्या [ शक्तीच्या ] अपेक्षेनें असंख्यात लोकप्रमाणवेळां षट्स्थान पतितवृद्धि होते. ( षट्स्थानपतित वृद्धीचें वर्णन गोमटसार जीवकांड ज्ञानमार्गणा गाथा ३२३ ते ३२८ मध्यें आहे तें पहा. ]

**गाथा** ९५३–आयुःकर्माच्या जघन्यस्थितिबंधाला योग्य स्थितिबंधाध्यवसायस्थानें असंख्यात लोका इतकीं असतात. जघन्य स्थितिपेक्षां एक समयाची अधिक स्थिति असेल तर त्याचीं स्थितिबंधाध्यवसायस्थानें असंख्यातलोकाच्या संख्येला आवलीच्या असंख्याताव्या भागानें गुणून जी संख्या येईल तितकीं होतील. याचप्रमाणें एक एक समयाच्या अधिकस्थितिकरितां ( उत्कृष्ट स्थितिपर्यंत ) पूर्व पूर्व बंधाध्यवसायस्थान संख्येस आवलीच्या असंख्याताव्या भागानें गुणून स्थितिबंधाध्यवसायस्थानें काढतां येतील.

नानाजीवांच्या अपेक्षेनें कमी स्थितिला कारणभूत जीं स्थितिबंधाध्यवसायस्थानें असतील व त्याहून अधिक स्थितीला कारणभूत जीं बंधाध्यवसायस्थानें असतील त्या दोहोंत समानताही असूं शकते. यामुळें गाथा ९०० ते ९०७ मध्यें दिलेल्या अधःकर-

णाऱ्या कोष्टकाप्रमाणें अनुकृष्टिविधान येथें संभवनीय आहे; परंतु त्या कोष्टकांशीं थोडा फरक आहे. तो खालीं दाखवितात.

आयुःकर्माच्या स्थितिबंधाध्यवसायस्थानांत अनुकृष्टिविधानाची अंकसंदृष्टि—

आयुःकर्माच्या स्थितीचे भेद संख्यात पल्या इतके आहेत त्यांना आपण १६मानूं.

जघन्यस्थितिबंधाला कारणभूत अध्यवसायस्थानें असंख्यात लोकाइतकीं असतात. त्यांना आपण २२ मानूं व आवलीच्या असंख्याताव्या भागास ( म्हणजे गुणकारांस ) ४ मानूं.

अनुकृष्टीचे गच्छ किंवा खंड ४ मानिल्यास खालीं लिहिल्याप्रमाणें कोष्टक बनेल.

## [ कोष्टक नं. २४५ ]

| स्थिति | अध्यवसायस्थानें. | अनुकृष्टि खंड. | | | |
|---|---|---|---|---|---|
| (१) जघन्य | २२ | ४ | ५ | ६ | ७ |
| (२) जघन्य + १ समय | ८८ | ५ | ६ | ७ | ७० |
| (३) जघन्य + २ समय | ३५२ | ६ | ७ | ७० | २६९ |
| (४) जघन्य + ३ समय | १४०८ | ७ | ७० | २६९ | १०६२ |

स्पष्टीकरण—जघन्य स्थितीचीं बंधाध्यवसायस्थानें २२ मानिली आहेत. चार ठिकाणीं याची वाटणी करण्याकरितां १ चय व चयधन ६ मानिल्यास २२ तून ६ कमी केले तर १६ राहतील. या १६ स ४ गच्छसंख्येनें भागिल्यास पहिला खंड ४ चा निघाला, मग एक एक चय अधिक ५–६–७ चे दुसरे तीन खंड झाले. याप्रमाणें २२ चे ४-५-६-७ हे चार खंड झाले.

दुसऱ्या स्थितिभेदांत परिणाम २२×४=८८ होतील. यांची वाटणी ४ खंडांत केल्यास पहिल्या खंडांतील शेवटचे तीन अंक ( ५-६-७ ) हे दुसऱ्या स्थितिभेदांत प्रथमच्या तीन खंडांत लिहून उरलेली संख्या चौथ्या खंडांत लिहावी. याचप्रमाणें चौपट चौपट परिणाम व त्याचे खंड काढतां येतील. या कोष्टकावरून हें समजून येईल कीं जघन्यस्थितिबंधाला कारण जे परिणाम ( ५-६-७ ) आहेत. त्यायोगानें जघन्यस्थिति + १ समयाचाही बंध होईल.

जघन्यस्थिति + १ समय या स्थितिबंधाला कारण ७० परिणाम आहेत. त्या परिणामांनीं जघन्यस्थिति + २ किंवा जघन्यस्थिति + ३ समयाचाही बंध होईल.

## " मोहनीयकर्माच्या स्थितिबंधाध्यवसायस्थानांच्या रचनेचें विवरण ."

मोहनीयकर्माची जघन्य स्थिति संज्ञी मिथ्यात्वी जीवाच्या अपेक्षेनें संख्यात पल्याइतकी आहे. त्यांत एक एक समय अधिक स्थिति होत गेल्यास उत्कृष्ट स्थितिपर्यंत स्थितीचे भेद जघन्य स्थितीच्या संख्यातपट होतील. इतक्या स्थितीच्या भेदांस मोहनीय कर्माच्या स्थितिबंधाध्यवसाय–रचनेंत स्थितीचें परिमाण मानावें.

पल्याच्या वर्गशलाकेच्या अर्धच्छेदांस पल्याच्या अर्धच्छेदांतून कमी करून जी संख्या येईल तिच्या असंख्याताव्या भागास नानागुणहानि समजावें.

या नानागुणहानि–शलाकेनें स्थितीच्या प्रमाणास भाग देऊन जी संख्या येईल तीस गुणहानि आयाम समजावें. दोन गुणहानि आयामास निषेकहार किंवा दोन गुणहानि समजावें.

नानागुणहानीच्या शलाके इतके २ चे अंक लिहून, त्यांचा परस्पर गुणाकार करून जी संख्या येईल ती अन्योन्याभ्यस्तराशि समजावा. तो पल्याच्या असंख्याताव्या भागा इतका होईल.

असंख्यात लोकांस तीन वेळां असंख्याताव्या भागानें गुणून जें प्रमाण निघेल तें स्थितिबंधाध्यवसायस्थानांच्या परिणामाचें द्रव्य समजावें.

या द्रव्यास अन्योन्याभ्यस्तराशि उणा १ यानें भागून जें प्रमाण येईल तें प्रथम गुणहानीचें द्रव्य समजावें. द्वितीयादि–गुणहानींत अंतिमगुणहानिपर्यंत द्रव्य दुप्पट दुप्पट होत जाईल.

गाथा ९१४ तें ९२१ मध्यें ६३०० चें जें कोष्टक दिलें आहे त्यांतील प्रथम गुणहानीस येथें अंतिम गुणहानि मानावें व तेथील अंतिमगुणहानीस येथें प्रथम गुणहानि मानावें. तिथें गुणहानीचें द्रव्य निम्में निम्में होत गेलें आहे आणि इथें दुप्पट दुप्पट होत गेलें आहे. बाकीची रचना त्यासारखीच आहे.

मोहनीय कर्मांतही अनुकृष्टिविधान होतें. जितक्या अध्यवसायांनीं कोणी एखादा जीव कमी स्थिति बांधील तितक्याच अध्यवसायांनीं दुसरा एखादा जीव त्याहून ज्यात स्थिति बांधूं शकतो. हें अनुकृष्टिविधान पुढें सांगतात.

**गाथा** ९५४ ते ९६० स्थिति बंधाध्यवसायस्थानांत गुणहानिआयामाचें जें प्रमाण सांगितलें आहे त्यास संख्याताचा भाग दिल्यानें जो भागाकार येईल तो पल्याचा असंख्याताचा भाग असेल. तितकेच अनुकृष्टिरचनेंत गच्छ म्हणजे खंड समजावे. हे खंड एका पुढें एक असे आडव्या ओळींत लिहावेत. एका खंडाहून दुसरा खंड चयप्रमाणानें अंतखंडापर्यंत अधिक अधिक असतो. दुप्पट तिप्पट नसतो.

प्रथम खंडाहून द्वितीयादिखंड एक एक चयानें अधिक अधिक असतात. ते चय असंख्यात लोक इतके असतात. त्या सर्वांची बेरीज असंख्यात लोकांपेक्षां ज्यास्त होणार नाहीं, कारण असंख्यात लोकाचे भेद ही असंख्यात लोकांइतके असतात.

अनुकृष्टीच्या गच्छांत गुणहानीची रचना नसते. येथें ही अनुकृष्टिविधानाची अंकसंदृष्टि अधःकरणबोधक अंकसंदृष्टिप्रमाणें समजावी. [ गाथा ९०० ते ९०७ मधील ३०७२ चें कोष्टक पहावें. ] तें कोष्टक पाहिल्यास असें दिसून येईल कीं पहिल्या पंक्तींत १६२ पासून २२२ पर्यंत जे अंक आहेत ते प्रथम गुणहानीच्या सोळा १६ निषेकाचे अंक आहेत. या १६ निषेकांतील प्रथमचे १६ खंड विसदृश आहेत, म्हणजे एक एक चयानें अधिक अधिक आहेत. शक्तीच्या अपेक्षेनेंही प्रथम खंडांतील सर्वांहून लहान जो ३९ वा खंड आहे त्याच्या उत्कृष्टस्थानांत जी शक्ति आहे त्याच्या अनंतपट शक्ति त्यावरील ४० व्या खंडाच्या जघन्यस्थानांत आहे.

द्वितीय खंडांतही जे १६ अंक आहेत त्यांतही एक एक चय अधिक अधिक असल्यानें ते विसदृश आहेत. व शक्तीच्या अपेक्षेनेंही द्वितीय खंडांतील सर्वांहून लहान जो ४० चा खंड आहे त्याच्या उत्कृष्टस्थानांत जी शक्ति आहे त्याच्या अनंतपट शक्ति त्यावरील ४१ व्या खंडाच्या जघन्यस्थानांत आहे. याचप्रमाणें तृतीय, चतुर्थ खंडांतही असमानता व विसदृशता समजावी.

प्रत्येक खंडांत जें उत्कृष्ट अध्यवसायस्थान आहे तें स्थान आपल्या पूर्वस्थानापेक्षां अनंतभागवृद्धि [ उर्वंक ] नें अधिक आहे. वरील वरील खंडाचें जघन्य अध्यवसाय स्थान खालील खंडाच्या उत्कृष्ट स्थानाहून अनंतगुणवृद्धि ( अष्टांक ) नें अधिक आहे.

जघन्यस्थितीला कारणभूत प्रथम निषेकाचा जघन्य पहिला खंड जो ३९ व उत्कृष्ट स्थितीला कारणभूत अंत निषेकाचा जो अंतिमखंड ५७ हे दोन्ही खंड कोणत्याही खंडाशीं समान नाहींत. अन्यसर्व खंड ऊर्ध्व रचनेंत इतर खंडाशीं समान आहेत. या प्रथम गुणहानींत जें ३०७२ द्रव्य आहे व ४ चा चय व अनुकृष्टि गच्छ ४ आहे व अनुकृष्टीचा चय १ आहे त्याच्या दुप्पट दुप्पट द्वितीयादि गुणहानींत द्रव्य, चय, अनुकृष्टिगच्छ व अनुकृष्टि चय होतील.

**गाथा ९६१–९६२** आठही कर्मांची स्थितिबंधाध्यवसायस्थान–रचना समान आहे. मोहनीय कर्माची रचना वर दाखविली आहे. त्याचप्रमाणें ज्ञानावरणादि कर्मांची समजावी. विशेष एवढाच आहे कीं आयुःकर्माच्या अनुकृष्टींत जे खंड आहेत त्यांतून जघन्य स्थितींतील अंतिम खंडापर्यंत चयप्रमाणानें वाढ आहे. या जघन्य स्थितीच्या उत्कृष्ट खंडापासून पुढील स्थितीच्या उत्कृष्टखंडापर्यंत व बाकीच्या स्थितीच्या आपआपल्या जघन्य खंडापासून आपआपल्या उत्कृष्ट खंडापर्यंत सर्वखंड क्रमानें असंख्यातपट आहेत.

**गाथा** ९६३ ते ९६४—कषायांच्या ज्या अंशांनीं कर्मांत अनुभाग पडतो. त्यास अनुभागाध्यवसायस्थान म्हणतात. हीं अनुभागाध्यवसायस्थानें असंख्यात लोकगुणित असंख्यात लोका इतकीं असंख्यात लोकप्रमाण आहेत.

जघन्य स्थितिसंबंधी जितकीं स्थितिबंधाध्यवसायस्थानें आहेत त्यांच्या असंख्यात लोकपट अनुभागाध्यवसायस्थानें आहेत. तथापि जघन्येतरस्थितीच्या अनुभागाध्यवसाय-स्थान पेक्षां हीं कमी आहेत.

जघन्य स्थितिसंबंधीं अनुभागाध्यवसायस्थानांची रचना पुढीलप्रमाणें सांगतात.

जघन्य स्थितिसंबंधीं स्थितिबंधाध्यवसायस्थानाच्या संख्येहून असंख्यात लोकपट अनुभागाध्यवसायस्थानांचें प्रमाण आहे. यास द्रव्याचें प्रमाण समजावें.

जघन्य स्थितिसंबंधीं स्थितिबंधाध्यवसायस्थानाचें जें प्रमाण आहे तें या ठिकाणीं स्थितीचें प्रमाण समजावें.

आवलीला दोन वेळां असंख्याताचा भाग देऊन जें प्रमाण येईल तें येथें नाना-गुणहानिशलाकांचें प्रमाण समजावें.

स्थितीच्या प्रमाणाला नानागुणहानीनें भागून जें प्रमाण येईल तें गुणहानि-आयामाचें प्रमाण समजावें.

दोन गुणहानिआयामाचें जें प्रमाण तो एक निषेकहार किंवा दोन गुणहानीचें प्रमाण समजावें.

आवलीच्या असंख्याताच्या भागाइतका अन्योन्याभ्यस्तराशि असतां द्रव्यास अन्योन्याभ्यस्तराशि उणा १ यानें भागून जें प्रमाण येईल तें प्रथम गुणहानीचें द्रव्य समजावें.

याच्या दुप्पट दुप्पट द्वितीयादि गुणहानीचें द्रव्य समजावें. प्रथम गुणहानीच्या द्रव्यास गुणहानिआयामाचा भाग दिल्यानें मध्यमधनाचें प्रमाण निघतें.

गुणहानिआयामांत १ कमी करून उरेल त्याची निमपट करावी व ती दोन गुणहानीच्या संख्येंतून वजा करावी. बाकी राहील त्यानें मध्यमधनास भागून जो भागाकार येईल तें चयाचें प्रमाण समजावें.

या चयास १ अधिक + गुणहानिआयामांनीं गुणून जें प्रमाण निघेल तें प्रथम निषेकाचें प्रमाण समजावें.

जघन्य स्थितीच्या प्रथम निषेकासंबंधीं जीं अनुभागाध्यवसायस्थानें असतात त्यांहून त्याच स्थितीच्या द्वितीयादि निषेकांची अनुभागाध्यवसायस्थानें प्रथम गुणहानिच्या अंत-निषेकापर्यंत चय प्रमाणानें वाढत जातात.

सर्व द्रव्यास असंख्यात लोकाचा भाग दिल्यानें जो भागाकार येईल तें चयाचें प्रमाण समजावें.

द्वितीयादि गुणहानीत द्रव्य व चय यांचें प्रमाण दुप्पट दुप्पट समजावें.

जघन्य स्थितींच्या रचनेप्रमाणेंच अन्य स्थितींची रचना उत्कृष्टस्थितिपर्यंत समजावी.

**गाथा ९६५**–नय आणि प्रमाण यांनीं ज्याचें ज्ञान होऊं शकतें असें हें गोम्मटसार संग्रहसूत्र श्रीगोम्मटदेव म्हणजे श्रीवर्धमान तीर्थंकर यांनीं तत्त्वार्थाचा निश्चय करतां यावा म्हणून व कर्मांची निर्जरा व्हावी म्हणून रचिलें आहे.

**गाथा ९६६**–ऋद्धिप्राप्त गणधर देवादिकांचे गुण ज्यांच्या ठिकाणीं वास करतात असे अजितसेनाचार्य ज्या राजाचे गुरु आहेत तो राजा [ चामुण्डराय ] जयवंत असो.

**गाथा ९६७**–सिद्धांतरूपी उदयाचलावर उदय पावलेले निर्मल व उत्कृष्ट नेमिनाथरूपी चंद्र अथवा नेमिचंद्र आचार्यरूपी चंद्र यांच्या वचनरूपी किरणांनीं वृद्धि पावलेल्या गुणरत्नभूषित चामुण्डरायरूपी समुद्राच्या बुद्धिरूपी लाटा त्रिभुवनाला व्यापून टाकोत.

**गाथा ९६८**–हें गोम्मटसार संग्रहसूत्र जयवंत राहो. गोम्मट शिखरावर गोम्मटाजिन म्हणजे चामुण्डरायराजे यांनीं केलेल्या जिनमंदिरांत विराजमान असलेलें एक हात उंचीचें इंद्रनील माणिमय नेमिनाथ तीर्थंकराचें प्रतिबिंब जयवंत राहो.

चामुण्डरायराजांनीं निर्माण केलेलें जगत्प्रसिद्ध दक्षिणकुक्कुटजिनाचें [ बाहुबली स्वामीचें प्रतिबिंब जयवंत राहो.

**गाथा ९६९**–ज्यांनीं निर्मापित केलेल्या जिनप्रतिमेचें मुख सर्वार्थसिद्धींतील देवांनीं आणि सर्वावधि व परमावधिधारक योगीश्वरांनीं पाहिलें ते चामुण्डराय राजे जयवन्त राहोत.

**गाथा ९७०**–ज्याचें पीठ वज्रासारखें आहे, ज्याचें नांव ईषत्प्राग्भार आहे. ज्यावर सुवर्णाचा कलश आहे व जें त्रिभुवनामध्यें उपमेय आहे असें जिन–मंदिर ज्यानें निर्माण केलें तो चामुण्डराय राजा जयवंत राहो.

**गाथा ९७१**–ज्यानें चैत्यालयांत निर्माण केलेल्या स्तंभावर यक्षांच्या मूर्ति आहेत व त्यांच्या मुकुटांवरील अग्रभागाच्या किरणरूपीजलांनीं सिद्धपरमेष्ठींचें शुद्धचरण प्रक्षालित केले गेले आहेत तो चामुण्डराजा जयवन्त राहो.

**गाथा ९७२**–गोम्मटसार सूत्रोलखनावर चामुण्डरायराजानें देश (कर्णाटक) भाषेंत वृत्ति लिहिली तो वीरमार्तण्ड नांवानें प्रसिद्ध असलेला राजा जयवन्त राहो.

**शुभं भूयात् ।**

# गोम्मटसारः ।

## ( कर्मकाण्डम् )

पणमिय सिरसा णेमिं गुणरयणविभूसणं महावीरं । सम्मत्तरयणणिलयं पयडिसमुक्कित्तणं वोच्छं ॥ १ ॥ पयडी सील सहावो जीवंगाणं अणाइसंबंधो । कणयोवले मलं वा ताणत्थित्तं सयं सिद्धं ॥ २ ॥ देहोदयेण सहिओ जीवो आहरदि कम्म णोकम्मं । पडिसमयं सव्वंगं तत्तायसपिंडओव्व जलं ॥ ३ ॥ सिद्धाणंतिमभागं अभव्वसिद्धादणंतगुणमेव । समयपबद्धं बंधदि जोगवसादो दु विसरित्थं ॥ ४ ॥ जीरदि समयपबद्धं पओगदो णेगसमयबद्धं वा । गुणहाणीण दिवड्ढं समयपबद्धं हवे सत्तं ॥ ५ ॥ कम्मत्तणेण एक्कं दव्वं भावोत्ति होदि दुविहं तु । पोग्गलपिंडो दव्वं तस्सत्ती भावकम्मं तु ॥ ६ ॥ तं पुण अट्ठविहं वा अडदालसयं असंखलोमं वा । ताणं पुण घादित्ति अ- घादित्ति य होंति सण्णाओ ॥ ७ ॥ णाणस्स दंसणस्स य आवरणं वेयणीयमोहणियं । आउगणामं गोदंतरायमिदि अट्ठ पयडीओ ॥ ८ ॥ आवरणमोहविग्घं घादी जी-वगुणघादणत्तादो । आउगणामं गोदं वेयणियं तह अघादित्ति ॥ ९ ॥ केवलणाणं दंसणमणंतविरियं च खयियसम्मं च । खयियगुणे मदियादी खओवसमिए य घादी दु ॥ १० ॥ कम्मकयमोहवड्ढियसंसारम्हि य अणादिजुत्तम्हि । जीवस्स अवट्ठाणं करेदि आऊ हलिव्वं णरं ॥ ११ ॥ गदिआदि जीवभेदं देहादी पोग्गलाण भेदं च । गदियंतरपरिणमनं करेदि णामं अणेयविहं ॥ १२ ॥ संताणकमेणागयजीवायरणस्स गोदमिदि सण्णा । उच्चं णीचं चरणं उच्चं णीचं हवे गोदं ॥ १३ ॥ अक्खाणं अणुभवणं वेयणियं सुहसरूवयं सादं । दुक्खसरूवमसादं तं वेदयदीदि वेदाणियं ॥ १४ ॥ अत्थं देक्खिय जाणदि पच्छा सद्दहदि सत्तभंगीहिं । इदि दंसणं च णाणं सम्मत्तं होंति जीवगुणा ॥ १५ ॥ अब्भरहिदादु पुव्वं णाणं तत्तो हि दंसणं होदि ॥ सम्मत्तमदो विरियं जीवाजीवगदमिदि चरिमे॥ १६ ॥ घादीवि अघादिं वा णिस्सेसं घादणे असक्कादो । णामतियणिमित्तादो विग्धं पडिदं अघादिचरिमम्हि ॥ १७ ॥ आउबलेण अवट्ठिदि भवस्स इदि णाममाउपुव्वं तु ॥ भवमस्सिय णीचुच्चं इदि गोदं णामपुव्वं तु ॥ १८ ॥ घादिंव वेयणीयं मोहस्स बलेण घाददे जीवं । इदि घादीणं मज्झे मोहस्सादिम्हि पढिदं तु ॥ १९ ॥ णाणस्स दंसणस्स य आवरणं वेयणीयमोहणियं । आउगणामं गोदंतरायमिदि पढिदमिदि सिद्धं ॥ २० ॥ पडपडिहारसिमज्जाहलिचित्तकुलालभंडयारीणं । जह एदेसिं भावा तहवि य कम्मा मुणेयव्वा ॥ २१ ॥ पंच णव दोण्णि अट्ठावीसं

चउरो कमेण तेणउदी । तेउत्तरं सयं वा दुगपणगं उत्तरा होंति ॥ २२ ॥ थीणुदयेणुट्ठविदे सोवदि कम्मं करेदि जप्पदि य । णिद्दाणिद्दुदयेण य ण दिट्ठिमुग्घाडिदुं सक्को ॥ २३ ॥ पयलापयलुदयेण य वहेदि लाला चलंति अंगाइं । णिद्दुदये गच्छंतो ठाइ पुणो वइसइ पडेई ॥ २४ ॥ पयलुदयेण य जीवो ईसुम्मीलिय सुवेइ सुत्तोवि । ईसं ईसं जाणदि मुहुं मुहुं सोवदे मंदं ॥ २५ ॥ जंतेण कोद्दवं वा पढमुवसमसम्मभावजंतेण । मिच्छं दव्वं तु तिधा असंखगुणहीणदव्वकमा ॥ २६ ॥ तेजाकम्मेहिं तिए तेजा कम्मेण कम्मणा कम्मं । कयसंजोगे चदुचदुचदुदुग एक्कं च पयडीओ ॥ २७ ॥ णलया बाहू य तहा णियंबपुट्ठी उरो य सीसो य । अट्ठेव दु अंगाइं देहे सेसा उवंगाइं ॥ २८ ॥ सेवट्टेण य गम्मइ आदीदो चदुसु कप्पजुगलोत्ति । तत्तो दुजुगलजुगले खीलियणारायणद्धोत्ति २९ णवगेविज्जाणुद्दिसणुत्तरवासीसु जांति ते णियमा । तिदुगेगे संघडणे णारायणमादिगे कमसो ॥ ३० ॥ सण्णी छस्संहडणो वज्जदि मेघं तदो परं चावि । सेवट्टादीरहिदो पणपणचदुरेगसंघडणो ॥ ३१ ॥ अंतिमतियसंहडणस्सुदओ पुण कम्मभूमिमहिलाणं । आदिमतिगसंहडणं णत्थित्ति जिणेहिं णिद्दिट्ठं ॥ ३२ ॥ मूलुण्हपहा अग्गी आदावो होदि उण्हसहियपहा । आइच्चे तेरिच्छे उण्हूणपहा हु उज्जोओ ॥ ३३ ॥ देहे अविणाभावी बंधणसंघाद इदि अबंधुदया । वण्णचउक्केऽभिण्णे गहिदे चत्तारि बंधुदये ॥ ३४ ॥ पंच णव दोण्णि छव्वीसमवि य चउरो कमेण सत्तट्ठी । दोण्णि य पंच य भणिया एदाओ बंधपयडीओ ॥ ३५ ॥ पंच णव दोण्णि अट्ठावीसं चउरो कमेण सत्तट्ठी । दोण्णि य पंच य भणिया एदाओ उदयपयडिओ ॥ ३६ ॥ भेदे छादालसयं इदरे बंधे हवंति वीससयं । भेदे सव्वे उदये बावीससयं अभेदम्हि ॥ ३७ ॥ पंच णव दोण्णि अट्ठावीसं चउरो कमेण तेणउदी । दोण्णि य पंच य भणिया एदाओ सत्तपयडीओ ॥ ३८ ॥ केवलणाणावरणं दंसणछक्कं कसायबारसयं । मिच्छं च सव्वघादी सम्मामिच्छं अबंधम्हि ॥ ३९ ॥ णाणावरणचउक्कं तिदंसणं सम्मगं च संजलणं । णव णोकसाय विग्घं छव्वीसा देसघादीओ ॥ ४० ॥ सादं तिण्णेवाऊ उच्चं णरसुरदुगं च पंचिंदी । देहा बंधणसंघादंगोवंगाइं वण्णचओ ॥ ४१ ॥ समचउरवज्जरिसहं उवघादूणगुरुछक्क सग्गमणं । तसबारसट्ठसट्ठी बादालमभेददो सत्था ॥ ४२ ॥ जुम्मं । घादी णीचमसादं णिरयाऊ णिरयतिरियदुग जादी-संठाणसंहदीणं चदुपणपणगं च वण्णचओ ॥ ४३ ॥ उवघादमसग्गमणं थावरदसयं च अप्पसत्था हु । बंधुदयं पडिभेदे अडणउदि सयं दु चदुरसीदिदरे ॥ ४४ ॥ जुम्मं । पढमादिया कसाया सम्मत्तं देससयलचारित्तं । जहखादं घादंति य गुणणामा होंति सेसावि ॥ ४५ ॥ अंतोमुहुत्त पक्खं छम्मासं

संखऽसंखणंतभवं । संजलणमादियाणं वासणकालो दु णियमेण ॥ ४६ ॥ देहादी फासंता पण्णासा णिमिणतावजुगलं च । थिरसुहपत्तेयदुगं अगुरुतियं पोग्गलविवाई ॥ ४७ ॥ आऊणि भवविवाई खेत्तविवाई य आणुपुव्वीओ । अट्ठत्तरि अवसेसा जीवविवाई मुणेयव्वा ॥ ४८ ॥ वेदणियगोदघादीणेकावण्णं तु णामपयडीणं । सत्तावीसं चेदे अट्ठत्तरि जीवविवाई ( ओ ) ॥ ४९ ॥ तित्थयरं उस्सासं बादरपज्जत्तसुस्सरादेज्जं । जसतसविहायसुभगदु चउ गइ पण जाइ सगवीसं ॥ ५० ॥ गदि जादी उस्सासं विहायगदि तसतियाण जुगलं च । सुभगादिचउज्जुगलं तित्थयरं चेदि सगवीसं ॥ ५१ ॥ णामं ठवणा दवियं भावोत्ति चउव्विहं हवे कम्मं । पयडी पावं कम्मं मलंति सण्णा हु णाममलं ॥ ५२ ॥ सरिसासरिसे दव्वे मदिणा जीवट्ठियं खु जं कम्मं । तं एदंत्ति पदिट्ठा ठवणा तं ठावणाकम्मं ॥ ५३ ॥ दव्वे कम्मं दुविहं आगमणोआगमंति तप्पढमं । कम्मागमपरिजाणुगजीवो उवजोगपरिहीणो ॥ ५४ ॥ जाणुगसरीर भवियं तव्वदिरित्तं तु होदि जं विदियं । तत्थ सरीरं तिविहं तियकालगयंति दो सुगमा ॥ ५५ ॥ भूदं तु चुदं चइदं चदंति तेधा चुदं सपाकेण । पडिदं कदलीघादपरिच्चागेणूणयं होदि ॥ ५६ ॥ विसवेयणरत्तक्खयभयसत्थग्गहणसंकिलेसेहिं । उस्सासाहाराणं णिरोहदो छिज्जदे आऊ ॥ ५७ ॥ कदलीघादसमेदं चागविहीणं तु चइदमिदि होदि । घादेण अघादेण व पडिदं चागेण चत्तमिदि ॥५८॥ भत्तपइण्णाइंगिणिपाउग्गविधीहिं चत्तमिदि तिविहं । भत्तपइण्णा तिविहा जहण्णमज्झिमवरा य तहा ॥ ५९ ॥ भत्तपइण्णाइविही जहण्णमंतोमुहुत्तयं होदि । बारसवरिसा जेट्ठा तम्मज्झे होदि मज्झिमया ॥ ६० ॥ अप्पोवयारवेक्खं परोवयारूणमिंगिणीमरणं । सपरोवयारहीणं मरणं पाओवगमणमिदि ॥ ६१ ॥ भावियंति भवियकाले कम्मागमजाणगो स जो जीवो । जाणुगसरीरभवियं एवं होदित्ति णिद्दिट्ठं ॥ ६२ ॥ तव्वदिरित्तं दुविहं कम्मं णोकम्ममिदि तहिं कम्मं । कम्मसरूवेणागय कम्मं दव्वं हवे णियमा ॥ ६३ कम्मद्दव्वादण्णं दव्वं णोकम्मदव्वमिदि होदि । भावे कम्मं दुविहं आगमणोआगमंति हवे ॥ ६४ ॥ कम्मागमपरिजाणगजीवो कम्मागमम्हि उवजुत्तो । भावागमकम्मोत्ति य तस्स य सण्णा हवे णियमा ॥ ६५ ॥ णोआगमभावो पुण कम्मफलं भुंजमाणगो जीवो । इदि सामण्णं कम्मं चउव्विहं होदि णियमेण ॥ ६६ ॥ मूलुत्तरपयडीणं णामादी एवमेव णवरिं तु । सगणामेण य णामं ठवणा दवियं हवे भावो ॥ ६७ ॥ मूलुत्तरपयडीणं णामादि चउव्विहं हवे सुगमं । वज्जित्ता णोकम्मं णोआगमभावकम्मं च ॥ ६८ ॥ पडपडिहारसिमज्जा आहारं देह उच्चणीचंगं । भंडारी मूलाणं णोकम्मं दवियकम्मं तु ॥ ६९ ॥

